# मुखवटे

गजानन त्र्यंबक माडखोलकर






ोव्हेंबर १९४०

किंमत ३॥ रुपये

प्रकाशक

**ब. गो. गर्गे**, एम्. ए.
वीणा–प्रकाशन,
सीताबर्डी, नागपूर

संपादक

**ब. गो. गर्गे**, एम्. ए.
**द्वा. वा. घाटे**,
बी. ए., एल्एल्. बी.



मुखपृष्ठावरील चित्र **श्री. दलाल**, मुंबई.

मुद्रक

**पांडुरंग नारायण बनहट्टी**, बी. एस्सी.,
नारायण मुद्रणालय, धनतोली, नागपूर.

माझे गुरुबंधु

श्री. भाऊसाहेब

आणि

सौ. उषावहिनी खांडेकर

यांना प्रेमादरपूर्वक समर्पण

# माडखोलकरांचीं पुस्तकें

## प्रबंध

(१) आधुनिक कविपंचक
(२) विष्णु कृष्ण चिपळूणकर
(३) विलापिका
(४) वाङ्मयविलास
(५) स्वैरविचार
(६) माझे आवडते लेखक

(आगामी)

(७) अवशेष
(८) माझे आवडते कवि
(९) माझी नभोवाणी

## कादंबऱ्या

(१) मुक्तात्मा
(२) भंगलेलें देऊळ
(३) शाप
(४) कांता
(५) दुहेरी जीवन
(६) मुखवटे
(७) नवे संसार
(८) डाक बंगला

## कथासंग्रह

(१) शुक्राचें चांदणें
(२) रातराणीचीं फुलें

# निवेदन

ही नवी कादंबरी म्हणजे 'कांते'प्रमाणेंच केवळ एक कल्पनाचित्र आहे. विद्यमान व्यक्ति, संस्था किंवा स्थळें यांचे उल्लेख जरी या कादंबरींत विपुल आलेले असले, तरी तिच्यांतील सारीं पात्रें, प्रसंग आणि परिस्थिति सर्वथैव कल्पित आहे. वास्तवाशीं त्यांचें बादरायणहि नातें नाहीं.

'कांता' कादंबरींतील कथानकाचा हा उत्तरार्ध आहे. त्या दृष्टीनें 'प्रियदर्शन' हें नांवच खरोखरी या कादंबरीला शोभून दिसलें असतें. पण स्वतःच्या कादंबरीला नांवें ठेवणें हें आपल्या हातीं थोडेंच असतें? 'प्रियदर्शन' आणि 'जयसिंग' यांच्या उत्तरचरित्रावर पुढें मागें तिसरी कादंबरी लिहिण्याचा विचार आहे.

ही कादंबरी लिहावयाला ता. १० फेब्रुवारी १९४० रोजीं मी प्रारंभ केला आणि गेल्या विजयादशमीच्या उत्तररात्रीं जेव्हां तिचें शेवटचें प्रकरण संपवून मी बाहेर आलों, तेव्हां पूर्वक्षितिजावर शुक्राचा तारा तळपत होता. गेल्या सहा महिन्यांतील माझ्या मागच्या निरनिराळ्या व्यापामुळें कादंबरी वेळेवर पूर्ण करणें मला शक्य झालें नाहीं; व तिची पृष्ठसंख्याहि अंदाज वाढली. वीणा प्रकाशनाच्या चालकांनीं उदार मनानें हा उपद्रव सहन केला, याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. त्याचप्रमाणें श्री. पां. ना. बनहट्टी यांनीं प्रुफें तपासण्याच्या बाबतींतील माझा आग्रह चालू देण्यांत जो सोशीकपणा दाखविला, त्याबद्दल त्यांचेहि मी आभार मानतों.

या कादंबरीची मुद्रणप्रत तयार करण्याच्या कामीं माझे तरुण मित्र श्री. शंकरराव भातखंडकर आणि श्री. ग. श्री. परांजपे यांचें जें तत्पर साहाय्य झालें, त्याचाहि साभार उल्लेख करणें अवश्य आहे.

ता. १७ आक्टोबर १९४०
शांतानिवास, नागपूर

**ग. त्र्यं. माडखोलकर**

# चुकीची दुरुस्ती

(१) पृष्ठ ११५, ओळ ३ येथें 'आज आपल्या' असे शब्द पडले आहेत. त्याच्या ऐवजीं 'आप आपल्या' असें वाचावें.

(२) पृष्ठ १९१ वर ओळ १६ येथें 'पंधरा मैलावर' असे शब्द पडले आहेत. त्याच्या ऐवजीं 'सात आठ मैलांवर' असें वाचावें.

(३) पृष्ठ २९३ वर, ओळ ९ येथें 'प्रांतिक सरकारच्या' असे शब्द पडले आहेत. त्याच्या ऐवजीं 'प्रांतिक कारभारांतल्या' असें वाचावें.

# वीणा प्रकाशन

## आतांपर्यंत प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें



| | | | |
|---|---|---|---|
| (१) | समरभूमि* | प्रो. फडके | १॥ रु. |
| (२) | स्वैर विचार | माडखोलकर | १॥ रु. |
| (३) | दोन मनें* | खांडेकर | २ रु. |
| (४) | कांता* | माडखोलकर | २ रु. |
| (५) | आविष्कार* | गीता साने | १॥ रु. |
| (६) | हेमलता | द्वा. वा. घाटे | १ रु. |
| (७) | पांढरे ढग* | खांडेकर | २ रु. |
| (८) | निष्कलंक* | कमल दीक्षित | १। रु. |
| (९) | विशाल जीवन* | पी. वाय. देशपांडे | २ रु. |
| (१०) | उषःप्रभा* | मांजरेकर | १। रु. |
| (११) | झंझावात* | बोकील | २ रु. |
| (१२) | पहिली लाट | खांडेकर | १॥ रु. |
| (१३) | साकी | बी. रघुनाथ | १ रु. |
| (१४) | मुखवटे | माडखोलकर | २॥ रु. |
| (१५) | काळी राणी | पी. वाय. देशपांडे | १ डिसेंबर |
| (१६) | ? (कादंबरी) | उमाकांत भेंडे | |
| (१७) | डाकबंगला | माडखोलकर | |
| (१८) | चार भिंती | खांडेकर | |

* हीं पुस्तकें मध्यप्रांत–वऱ्हाड विद्याखात्यानें बक्षिसें व लायब्रऱ्या यांच्यासाठीं मंजूर केलीं आहेत.

# प्रार्थनेनंतर

प्रार्थना संपतांच महात्माजी आश्रमाकडे जावयाला निघाले.

तोंच त्यांच्या भोंवतालच्या मंडळींतून एक तरुण पुढें येऊन हळूच म्हणाला, "बापू, माझी एक मैत्रीण आपल्या दर्शनाला आली आहे."

त्याच्या शेजारीं उभ्या असलेल्या तरुणीनें महात्माजींना विनम्र-भावानें वंदन केलें.

"तुझी मैत्रीण? – पण, मोहन, तुझ्या खादीच्या वेडानं अद्याप पछाडलेलं दिसत नाहीं हिला!"

तिच्याकडे नमस्कारपूर्वक न्याहाळून पहात महात्माजींनीं हंसत हंसत म्हटलें.

ते शब्द कानांवर पडतांच विस्मयानें आणि उत्कंठेनें त्यांच्याकडे पहात असलेल्या त्या तरुणीचा चेहरा एकदम लाल होऊन गेला.

आषाढाच्या पहिल्या आठवड्यांतली ती रमणीय सायंकाळ होती. ढगांची प्रारंभींची घनगर्दी ओसरून गेल्यामुळें आकाशाचा नीलिमा अगदीं नितळ होऊन गेला होता; व पावसानें धुऊन निघालेली उत्फुल्ल सृष्टि हिरवीगार दिसत होती. पुष्कळ दिवसांनीं पडलेल्या कडक उन्हामुळें हवेंत उत्पन्न झालेला दमट उष्मा आणि मिसळलेले नाना प्रकारचे गंध! —त्यांनीं वातावरण किंचित् कुंद पण सुखकर करून सोडलें होतें.

त्या मंदावत चाललेल्या संधिप्रकाशांत तिच्या साडीचा अस्मानी रंग, जंपरचा निळा रंग आणि सँडल्सचा जांभळा रंग किती खुलून दिसत होता!

पण महात्माजींचें लक्ष क्रमाक्रमानें गर्द होत गेलेल्या तिच्या वेषभूषेंतील त्या रंगसंगतीच्या सौंदर्याकडे गेलें नाहीं. तिनें खादी पेहरली नव्हती, एवढी एकच एक गोष्ट त्यांच्या नजरेंत भरली.

"आज नागपूरहून येतांना खादीच्या अर्थशास्त्राविषयींच बोलत होतों मी साऱ्या रस्त्यानं हिच्या जवळ! नागपूरचे सरकारी इंजिनीयर रायबहादुर सिरिल गुप्ता यांची ही मुलगी. हिचं नांव 'रोज'—"

महात्माजी एक एक पाऊल पुढें टाकीत होते आणि मुरलीमोहन तिची ओळख त्यांना करून देत होता—

"हिला आपलं दर्शन घेण्याची फार इच्छा होती—"

"माझ्या पपांची जीजसइतकीच आपल्यावरहि भक्ति आहे—"

रोजनें मोहनचें वाक्य पूर्ण केलें.

"जीजसचा धर्म प्रेमाचा आणि सेवेचा आहे. रोज, तूं त्या धर्माचं पालन कशा रीतीनं करतेस?"

"मी काय सेवा करणार? यंदांचं माझं शेवटचं वर्ष आहे बी. ए. चं—"

"नुसती लीनता ही सुद्धां सेवा आहे एक प्रकारची!—'They al o serve who only stand and wait'"

पण, लीनता अंगीं बाणायची, म्हणजे आपल्या भोंवतालचं दैन्य दिसलं पाहिजे, त्याची आंच आपल्या अंतःकरणाला जाणवली पाहिजे, रोज! दिवसांतून एक तासमुद्धां सूत कांतायला वेळ नाहीं होणार कां तुला? पुढच्या वेळेला जेव्हां तूं मला भेटायला येशील तेव्हां सूत कांतून दाखवलं पाहिजेस मला चरख्यावर—"

महात्माजी पुन्हा हंसून उद्गारले; व लगेच मोहनकडे वळून म्हणाले, "तुझा मुक्काम आज इथंच आहे, मोहन?"

"नाहीं. मी परत जाणार आतांच नागपूरला—"

"या रात्रीच्या वेळीं?—"

"हो. आज पावसाचं कांहीं चिन्ह नाहीं. चांदणंहि आहे थोडंसं! दीड दोन तासांत सहज पोंचूं आम्हीं.—हिला आश्रम पाहायचा होता न् प्रार्थनेलाहि हजर राहायचं होतं आपल्या—"

आणि तीं दोघें नमस्कार करून बाजूला झालीं.

आश्रमाच्या आवारांतून बाहेर पडून रस्त्यावर येतांच मोहन तिला म्हणाला, "रजनी, तूं बोलत का नाहींस?"

"मोहन, तुम्ही सांगायला हवं होतं मला खादीची साडी नेसून यायला!—"

तिनें ओशाळलेल्या रोषपूर्ण दृष्टीनें त्याच्याकडे पहात म्हटलें.

"वेडी आहेस तूं, रजनी! आतां पुढच्या खेपेला तूं खादीची साडी नेसून बापूंच्या दर्शनाला आलीस, म्हणजे केवढं कौतुक वाटेल त्यांना माझ्याविषयीं!—"

"न् तुम्ही माझं 'रोज' हें इंग्रजी नांव कां सांगितलंत त्यांना? कायदेभंगाच्या चळवळीनंतर मम्मीनं आम्हां सगळ्या भावंडांना इंग्रजी नांवांच्या जोडीला हिंदी नावं ठेवलीं न् तींच आम्ही सांगत असतों लोकांना तेव्हांपासून! तुम्ही स्वतः सुद्धां 'रजनी' म्हणतां मला केव्हां केव्हां! आणि महात्माजींशीं ओळख करून देतांना मात्र माझं इंग्रजी नांव सांगितलंत त्यांना!—"

"खरं सांगू ? तुझं 'रोज' हें नांवच तुझ्या 'रजनी' या नांवापेक्षां जास्त आवडतं मला ! न् म्हणून तेंच चटदिशीं निघून गेलं माझ्या तोंडून !—"

"तुम्ही अगदीं करायला नकोत त्या गोष्टी केल्यात आज, मोहन !—"

"आणि त्या करण्यासाठींच मी आज तुला इथं आणली असली तर ?—–"

त्यानें एकदम तिचा हात आपल्या हातांत घेऊन तो आपल्या तोंडाजवळ नेत म्हटलें.

"असलं कांहीं चालायचं नाहीं हां, मोहन ! तुम्ही वचन दिलं यं नागपूरहून निघतांना मला—–"

"आतां आश्रमाच्या हद्दींतून बाहेर पडलों आहोंत आपण. तेव्हां माझ्या हातून जर वचनभंग झाला, तर तें पातक नाहीं ठरायचं फारसं !—"

त्यानें तिचा हात सोडून दिला आणि सिगारेट शिलगावून हंसत हंसत म्हटलें.

"तुमच्या या असल्या बोलण्यामुळेंच मला भीति वाटते अलिकडे तुमची !—"

"तुझी भीति अनाठायीं आहे, रोज ! तूं आणखी सात आठ महिन्यांनीं बी. ए. होणार. पण मनानं मात्र मध्ययुगीन काळांत आहेस तूं !—"

"पण तुम्ही स्वतः सुद्धां नाहीं का मध्ययुगीन काळांत ? हा अंगावरला खादीचा पोशाख, पिशवींतला तो कापूस न् ती टकळी आणि ही महिन्यांतून एकदां तरी होणारी आश्रमयात्रा काय यंत्रयुगाला शोभणारी आहे का ?—–"

"चुकतेस तूं, रोज ! ही यंत्रयुगाला शोभणारी नाहीं, पण

मध्ययुगीनहि म्हणतां येणार नाहीं तिला. माझा हा खादीचा पोषाख, टकली न् आश्रमयात्रा हीं सत्ययुगाला शोभणारीं आहेत!—"

"पण वर्तन मात्र सत्ययुगाला शोभणारं नाहीं!"

"कां बरं? तेंहि सत्ययुगालाच शोभणारं आहे, रोज! मनांत येईल तें स्पष्टपणानं बोलून दाखवायचं न् इच्छेस येईल तसं तात्बडतोब करायचं हा तर बाणा होता आमच्या सत्ययुगांतल्या ऋषींचा न् राजांचा! आपले सत्ययुगांतले तपस्वी मनोविकार दाबून टाकीत नसत कधीं स्वतःचे! नाहीं तर द्रोणांतून न् कुंभांतून मुलं उत्पन्न झालीं नसतीं वाटेल तेव्हां!—"

"मोहन, तुमच्या तोंडीं शोभत नाहीं असला बाष्कळपणा! आश्रमापासून कांहीं फार दूर आलों नाहीं आपण अजून!—"

"पण मी तुला सांगितलं ना बापूंच्या तत्त्वज्ञानावरला माझा विश्वास आतां साफ उडालाय म्हणून! ऐन पंचविशीच्या भरांत त्यांच्याबरोबर दांडीयात्रेला गेलेला मोहन निराळा न् आज समाजवादाचा पुरस्कार करीत असलेला मोहन निराळा! बापूंना माहित आहे;— मी कॉंग्रेस सोशॅलिस्ट पक्षाच्या स्थापनेच्या कामीं का पुढाकार घेतला याची त्यांना जाणीव आहे. तूं मात्र गेले चारपांच महिने माझ्या हाताखालीं समाजवादाचा अभ्यास करीत असूनसुद्धां मध्ययुगीन राहिली आहेस अजून!—"

त्यानें पुन्हा तिचा हात आपल्या हातांत घेतला.

ती स्तब्ध होती.

आश्रमाच्या आवाराच्या बाहेर बऱ्याच अंतरावर उभ्या केलेल्या मोटारीजवळ तीं दोघें आतां येऊन पोंचलीं होतीं. सप्तमीची चंद्रकला क्षितिजावर तळपत होती. पण, उदी रंगाच्या धुक्याचे थर सर्वत्र पसरलेले असल्यामुळें, आकाश स्वच्छ असूनहि चांदणें जमिनीपर्यंत

पोंचलेलें नव्हतें. हवेंत थोडा गारवाहि आला होता. मोटारीपाशीं पोंचतांच, दार उघडण्यापूर्वीं, त्यानें आपला हात रोजच्या कटिबंधाभोंवतीं लपेटून तिला जवळ घेण्याचा प्रयत्न केला–

"मत्स्यगंधेला आलिंगन देण्यासाटीं जें धुकं पराशरानं पाडलं, तें कांहीं इतकं रमणीय नव्हतं खास! भूमीला स्पर्श करण्यासाटीं धडपडणारे चंद्राचे आतुर किरण या धुक्याच्या निळसर आवरणानं मधल्या मध्यें थोपवून धरले आहेत—"

पण मोहनचे हे काव्यमय उद्गार लक्षांत न घेतां रोज रोषानें उद्गारली—

"मोहन, मी पुन्हा कधीं येणार नाहीं तुमच्या बरोबर यापुढं–"

त्याबरोबर त्यानें आपला हात झटकन मागें घेतला आणि मोटारीचें दार उघडून म्हटलें—

"रोज, मी तुला वचन दिलंय हें खरं. पण तूं जरासुद्धां मोकळेपणानं वागूं देणार नाहींस का मला?—"

"तुम्हांला जो मोकळेपणा वाटतो, ती मला अमर्यादा वाटते, मोहन!"

"पण, समज, अमर्यादा असली, तरी ती कांहीं एका मर्यादेपर्यंत करायला काय हरकत आहे? असा रम्य एकांत पुन्हा कधीं तरी लाभणार आहे का आपल्याला?"

"तुम्ही जो विश्वास दाखवून मला एकटीला इतक्या लांब आणलंत तो जर तुम्ही पाळलात तर हवे तितके प्रसंग येतील असले पुन्हा—"

"होय, पण प्रसंगच म्हणावे लागतील ते खरोखरी! माझं प्रेम व्यक्त करण्याची एकहि संधि जर तूं मला देणार नसशील, तर असला एकांत लाभून तरी त्याचा काय उपयोग? आणि मग पवनारच्या

बंगल्यावर जाऊन थोडा वेळ राहायचं तें तरी कशासाठीं? रजनी, तूं निर्दय आहेस अगदीं!—"

त्यानें आपले हात एकावर एक जोरानें चोळीत म्हटलें.

"मोहन, तुम्ही अशा रीतीनं बोलूं लागलांत म्हणजे तुमच्याशीं कसं वागावं हें समजत नाहीं मला! तुम्ही माझं अंतःकरण ओळखलं नाहीं अजून!—"

"ओळखलंय! आणि म्हणूनच म्हणतों कीं, कांहीं एका मर्यादे-पर्यंत अमर्याद झाल्यानं आपल्याला दोघांनाहि अतिशय सुख, अनि-र्वचनीय आनंद होईल! स्वाभाविक वासनांचा कोंडमारा पावित्र्याच्या नांवाखालीं करण्याची मध्ययुगीन ख्रिस्ती कल्पना केव्हां सोडून देणार तूं?—"

तो तिच्या शेजारीं बसून मोटारीला गति देतांना म्हणाला.

शेगांवपासून पवनारपर्यंतचा त्यांचा प्रवास निःशब्द झाला.

पण त्यांचीं क्षुब्ध मनें मात्र परस्परांविषयीं उत्कटतेनें विचार करीत होतीं.

त्याला आपण नाराज केलें असल्याची जाणीव तिच्या मनांत तीव्रतेनें डांचत होती; व आपण तिचें मन चाळवलें असल्याच्या समा-धानांत तो गर्क होता.

रस्ता बहुतेक निर्मनुष्य होता. एकाददुसरी बैलगाडी रस्त्यानें जातांना मोटारीला वाट देण्यासाठीं थोपवून धरलेली काय दिसेल, तेवढीच. नांगरलेल्या काळ्याभोर शेतजमिनींतून लांबवर गेलेल्या पांढुरक्या पाऊलवाटा एकाद्या वन्य तरुणीनें आपल्या काळ्या अंगावर काढलेल्या पांढऱ्या रंगाच्या पट्ट्यांसारख्या दिसत होत्या. पावसाळ्याच्या आरंभीं सृष्टीची अवस्था रमणाशीं नुकत्याच परिचित झालेल्या सोत्कंठ वधूसारखी असते. त्या परिचयाचे पुलक तिच्या तप्त तनूवर उठलेले असले, तरी तिच्या भावना बव्हंशीं अविकसित स्थितींत, लाजतलाजत

उमलण्याच्या बेतांत असतात. नांगरलेल्या जमिनीचा सूक्ष्म गंध, रात-किड्यांची अविरत किरकिर, काजव्यांची मधून मधून होणारी चमचम आणि पाण्याच्या न दिसणाऱ्या ओहळांचा कानांवर पडणारा गोड आवाज—पहिल्या निर्भर वर्षावाच्या सगळ्या सुखस्मृति जणुं सृष्टीच्या हृदयांत निनदित होत होत्या. एका बाजूचें धुकें आतां ओसरलें होतें. त्यामुळें अंगावरलें वस्त्र अर्धवट दूर फेकून दिलेल्या स्त्रीसारखी चांदण्यानें उजळलेली धूसर सृष्टि दिसत होती.

त्या निर्मनुष्य रस्त्यानें भरधांव गाडी चालवीत असलेल्या मोहनच्या डोळ्यांपुढून गेल्या सहा महिन्यांतील किती तरी प्रसंग वेगानें निघून गेले.

रोजला त्यानें सहा महिन्यांपूर्वी अकस्मात् पाहिली, तो दिवस!—तो दिवस विसरणें त्याला कधीं तरी शक्य होतें का? कायदेभंगाच्या दुसऱ्या चळवळीनंतर बंदिवासांतून सुटून आल्यावर असोसिएटेड ट्रेडिंग कंबाईनचा मुख्य एजंट म्हणून तो नागपुरास स्थायिक झाला. तेव्हांपासून आपल्या धंदेवाईक भटक्या आयुष्यक्रमांत निरनिराळ्या प्रकारच्या स्त्रियांच्या सहवासाची मजा त्यानें मनसोक्त अनुभवली होती. तरी सुद्धां टाकळी रस्त्यावरील त्या एका बाजूच्या बंगल्यांत रहावयाला आल्यानंतर समोरच्या बंगल्यांतील टेनिसकोर्टवर जेव्हां रोजला सकाळच्या वेळीं खेळतांना त्यानें बघितली, तेव्हां त्याच्या मनांत तिच्याविषयीं विलक्षण आकर्षण उत्पन्न झालें. किंचित् गुलाबी झांक असलेला टेनिसशर्ट आणि मोतिया रंगाचा पायजमा पेहरलेली रोज टेनिस खेळत असतांना तिच्या हातांतील रॅकेटच्या हेलकाव्यांबरोबर होणारें तिच्या रेखीव अवयवांचें आंदोलन आणि कापलेल्या केसांच्या पिंगट झुलपांची हालचाल—तिच्या अव्याज सौंदर्याचें तें चलच्चित्र त्याच्या डोळ्यांपुढून नंतर कधींहि हललें नाहीं.

अनेक स्त्रियांच्या बौद्धिक आणि वासनिक प्रेमाचा यथेच्छ आस्वाद घेतलेलें त्याचें मन त्या क्षणापासून अंतर्मुख झालें. सकाळ

संध्याकाळ नियमानें टेनिस खेळतांना दृष्टीस पडणाऱ्या रोजच्या मूर्तींतलें नजर ठरूं न देणारें चांचल्य आणि डोळ्यांतलें मनाला ओढ लावणारें माधुर्य—त्यांची प्रतीति आजवर आपण घेतलेल्या विविध अनुभूतींत आपल्याला कधींहि आली नव्हती असें त्याला पुनःपुन्हा वाटे.

यौवन आणि प्रीति ! त्यानें यौवन कवटाळलें होतें, कुस्करलें होतें; प्रीति उपभोगली होती, अव्हेरली होती. पण मनमुराद कवटाळूनहि हातीं न लागल्यासारखें वाटणारें यौवन आणि यथेच्छ सेवन करूनहि वीट न आणणारी प्रीति—त्यांची चंचलता आणि माधुरी मात्र त्यानें अनुभवली नव्हती. ती चंचलता आणि ती माधुरी यांचा साक्षात्कार त्याला रोज दृष्टीस पडतांक्षणींच प्रथम झाला. आणि स्त्रीसुखाविषयीं अलिकडे अनुत्सुक आणि बेपर्वा झालेलें त्याचें मन त्या क्षणापासून झपाटल्यासारखें झालें.

अखेर, रोजच्या धाकट्या भावाशीं दोस्ती लावून, सनीचा आवडता खेळगडी म्हणून, त्यानें लवकरच गुप्तांच्या कुटुंबांत प्रवेश करून घेतला.

त्याचा तो खादीचा शुभ्र वेष, अभिजात श्रीमंती रहाणी, सफाईदार इंग्रजी बोलणें आणि त्याच्या बंगल्यावर होणारी प्रमुख काँग्रेस कार्यकर्त्यांची वर्दळ—गुप्ता कुटुंबाचा लोभ आणि विश्वास त्याच्यावर तत्क्षणींच बसला. रोजला समाजवादाची गोडी लावण्यासाठीं त्यानें एक ग्रंथसंग्रहालयच आपल्या अभ्यासिकेंत उघडलें; व सनीचें खेळांचें वेड पुरविण्यासाठीं त्यानें आपल्या बगीच्यांत एक जिमखानाहि काढला.

त्याची अपेक्षा होती कीं, या उमलत्या गुलाबकळीचा सौरभ आपण पहिल्या स्पर्शालाच लुटूं शकूं. पण, रोज त्याच्या प्रेमपाशांत सांपडूनहि, खिस्ती पावित्र्याच्या कल्पनांनीं भारलेल्या तिच्या मनाची गांठ सहजासहजीं उकलणें त्याला शक्य झालें नाहीं.

तिच्या सहवासांतील एकांताचा प्रत्येक क्षण त्याला प्रथम जितका लोभनीय तितकाच पुढें दाहक वाटत असे.

आज एवढ्या सायासानें जुळवून आणलेला हा अभिलषणीय एकांतयोग–हाहि विफल ठरणार का ?—

—हा विचार त्याच्या मनाला वारंवार दंश करीत असतांनाच मोटार नदीचा पूल ओलांडून पलिकडे आली.

चंद्र आतां पुष्कळच खालीं आला होता. नारिंगी रंगाचें सुंदर खळें त्याच्या त्या मोठ्या झालेल्या कोरीभोंवतीं पडलें होतें; व नदीच्या विलोल प्रवाहावर त्याच्या सुदीर्घ किरणांचा नाच चालला होता. पुराचा पहिला भर ओसरून गेल्यामुळें नदीच्या पात्रांतील खडकांची रांग कांहीं ठिकाणीं उघडी पडली होती. त्या खडकांवरून हत्तीच्या सोंडेसारख्या पाण्याच्या शेकडों धारा खालच्या प्रवाहांत उडी घेत होत्या. त्या धारांचा अखंड होणारा गंभीर घोष!—त्या घोषांत रात्रीच्या वेळीं होणारे इतर सारे क्षुद्र नाद विलीन होऊन नदीकांठची ती सशब्द शांतता विशाल आणि उदात्त वाटत होती. वर चांदण्यानें उजळलेलें तारका-मंडित आकाश आणि खालीं चमचम करणारा नदीचा पांढरा शुभ्र फेंसाळ प्रवाह!–तो उसळता फेस पाहून वाटे कीं, चंद्राच्या आकर्षणानें उन्मत्त झालेली नदी खदखदा हंसत आहे! क्षितिजाच्या कडेला जिथे आरक्त चंद्रकोर प्रवाहावर तरंगल्यासारखी भासत होती, तिथें आकाश आणि पाणी यांचा सतेज नीलिमा एकमेकांत मिसळून गेला होता.

"किती मनोहर दृश्य आहे हें!–"

"म्हणून तर मी आणली तुला इथं! बंगल्याच्या गच्चीवर उभी राहून जेव्हां तूं हा देखावा पहाशील, तेव्हां तिथून हलावंसं वाटणार नाहीं तुला, रोज!–"

"पण, मोहन, माझ्या मनांत एक कल्पना आली आहे—"

"कसली कल्पना ?"

"नदीच्या पात्रांतल्या खडकावर बसून त्या धारांचे तुषार अंगावर घ्यायचे !–"

"पागल आहेस तूं ! हे काय पात्रांत उतरायचे दिवस आहेत का ? प्रत्येक खडक या वेळीं शेवाळानं बुळबुळीत झालेला असेल–"

"पण तुम्ही बरोबर असतांना काय हरकत आहे पात्रांत उतरायला थोडा वेळ ? असली धारांची मजा पुन्हा कधीं पहायला मिळणार आहे, मोहन ? तुम्ही नाहीं म्हणूं नका गडे ! अगदीं थोडा वेळ–सात, आठ मिनिटं आपण एकाद्या खडकावर जाऊन बसूं या–"

तिनें इतक्या आर्जवानें ते शब्द उच्चारले कीं, तो मुकाट्यानें बंगल्याकडे जाणारी पाऊलवाट सोडून देऊन तिच्या मागोमाग नदीच्या पात्राकडे वळला.

"तुला अपघात करून घ्यायचा नसेल, तर माझ्या दोन गोष्टी ऐकल्या पाहिजेस तूं, रजनी !–"

"कोणत्या ?"

"पायांतल्या त्या उंच टांचांच्या सँडल्स काढायच्या न् माझा हात घट्ट धरून चालायचं––"

"मी दोन्ही गोष्टी करणार नाहीं, मोहन ! पांच सहा मिनिटांसाठीं कोण काढतो सँडल्स ? शिवाय खरोखरीच पडलें, तर आहांतच तुम्ही सांवरायला !––"

तिनें मागें पाहून हंसत हंसत म्हटलें.

पण त्याच क्षणीं तिचा पाय घसरून ती त्या ओल्सर रुंद कातळावर दणकन आपटली––

तिनें घसरतां घसरतां स्वतःला सांवरलें. त्यामुळें ती पडली नाहीं. पण खडकावर जोरानें आपटल्यामुळें तिच्या नितंबभागाला आणि

आधारासाठीं खालीं ठेवलेल्या हातांना मुका मार बसून झिणझिण्या आल्या.

"तरी मी म्हटलं तुला पायांतल्या सँडल्स काढून टाक म्हणून—"

मोहन घाईघाईनें तिच्याजवळ येऊन उद्गारला.

"तसं लागलं नाहीं फारसं—"

तिनें उठण्याचा प्रयत्न करीत म्हटलें.

पण जोरानें आदळल्यामुळें अंग अवघडल्यासारखें होऊन तिला चटकन उठतां येईना. शिवाय कदाचित् आपण पुन्हा पडूं अशीहि भीति तिला वाटली——

तेव्हां त्यानें तिचे दोन्ही दंड घट्ट धरून तिला अलगत् उठवून उभी केली——

आणि तिच्या श्वासकंपित ओठांवर झटकन आपले ओठ टेंकून तिला हृदयाशीं धरलें.

# गिरणीबाहेर निघालेला माणूस

वॉकर रोडवरील तें जुनाट पडकें घर म्हणजे नागपुरांतील कम्युनिस्ट चळवळीचें केंद्र होतें.

त्या घरावर कोणत्याहि प्रकारचा बावटा फडकत नव्हता किंवा कसलीहि पाटी झळकत नव्हती. वॉकररोडच्या टोंकाला असलेल्या एका चाळीवर ते सगळे बावटे आणि त्या सगळ्या पाट्या दृष्टीस पडत असत. पण गुप्त पोलिस आणि वृत्तपत्रांचे बातमीदार यांची निगराणी मात्र त्या चाळीपेक्षां नालीच्या कांठीं खलाटांत असलेल्या या पडक्या घरावरच जास्त असे. दारूच्या गुत्त्यापेक्षां त्याच्या शेजारींच जरा बाजूला असलेल्या एखाद्या घरांत जमा होणाऱ्या दर्दी पिणाऱ्यांचा अड्डा असावा, तशी वॉकर रोडवरील या घरांत नागपुरांतील कडव्या जवान कम्युनिस्टांची बैठक होती.

वॉकर रोडला वर्तमानपत्रांचे बातमीदार थट्टेनें ‘लाल रस्ता’

(Red Road) म्हणत असत. कारण या रस्त्यावर जास्वंदीच्या भडक रंगापासून तों कण्हेरीच्या फिक्या रंगापर्यंत सगळ्या प्रकारचे 'लाल' कार्यकर्ते रहात होते. रुईकर, पागे आणि फुले या नागपुरांतील तीन प्रमुख कामगार पुढाऱ्यांचें वास्तव्य याच रस्त्यावर आहे; व किसान सभेपासून तों विडी कामगारसंघापर्यंत साऱ्या 'लाल' संस्थांच्या कचेऱ्याहि याच रस्त्यावर आहेत. पेशवाईतल्या सरदारांची अशी आख्यायिका सांगतात कीं, हे सरदार एकाच मैदानावर तळ देऊन बसले, म्हणजे त्यांचे अनुयायी परक्या शत्रूच्या अभावीं आपसांत चकमकी उडवून स्वतःच्या शौर्याचें प्रदर्शन करीत असत. वॉकर रोडवर जे हे तीन कामगार पुढारी रहात होते, त्यांच्या अनुयायी वर्गांतहि अशा प्रकारची उलट सुलट कारस्थानें नेहमीं चालत; व त्यांच्यांतील या चुरशीचे दुष्परिणाम आजवर अनेक संपांना भोंवले होते.

पण वॉकर रोडवरील हें पडकें घर मात्र असें होतें कीं, जिथें रुईकर, पागे आणि फुले हे तिघेही पुढारी पुष्कळदां एका बैठकीवर आलेले दृष्टीस पडत असत.

ही बैठक म्हणजे एक ठिकठिकाणीं फाटलेली जुनी मळकी सतरंजी. पण अरेबियन नाइट्समधील उडत्या सतरंजीप्रमाणें या फाटक्या सतरंजीनें कामगार चळवळींत अनेक चमत्कार घडवून आणले होते.

या सतरंजीवर चार माणसें या वेळीं बसलेलीं होतीं. लाल सुपारीचीं खांडें, काळसर हिरवीं पानें आणि विडीचा कट्टा असलेलें तबक त्यांच्यापुढें पडलेलें होतें; व बैठकीच्या टोंकाला एक कंदील धूर उत्पन्न करीत पाजळत होता. बाहेर रस्त्यावर पडलेल्या धुक्याला लाजविणारें धुराचें विरळ छत त्या बैठकीवर पसरलें होतें. या छताच्या सजावटींत विविधता होती; व डोळ्यांइतकीच नाकालाही ती जाणवत असे. स्वैंपाकघरांतला धूर, कंदिलाचा धूर, सिगारेटचा धूर आणि विडीचा धूर या साऱ्यांच्या मिश्रणानें हें छत बनलेलें होतें. फक्त कम्युनिस्टांच्या

जिव्हाग्राला चेतना देणारा गिरण्यांच्या चिमणीचा धूर तेवढा त्यांत मिसळलेला नसावा !

"हें पहा विठोबाजी, ही वेळ आहे ! ही वेळ जर आपण गमावली, तर पुन्हा अशी सोन्याची संधि येणार नाहीं कधीं ! तुमच्यासारख्या माणसांनीं ज्या खस्ता खाल्ल्या न् जे हाल काढले, त्यांचें सार्थक होण्याचा योग आला आहे आज ! तो वायां नाहीं जाऊं देतां कामा तुम्ही लोकांनीं !"

त्यानें हातांतल्या सिगारेटवरील राख झटकीत आर्जवानें म्हटलें.

क्षणमात्र कोणीच कांहीं बोललें नाहीं.

तेव्हां तोच पुन्हा बोलूं लागला—

"कां ? बोलत का नाहीं तुम्ही, विठोबा ? संप घडवून आणण्याच्या बाबतींत आमची सारी भिस्त तुमच्यावर आहे. तुम्ही संघाचे अध्यक्ष आहांत; दोन्ही गिरण्यांत तुमच्या शब्दाला जो मान आहे, तो नागपुरांत आज दुसऱ्या कोणाच्याही शब्दाला नाहीं. तुम्ही जर संप घडवून आणण्याचा प्रश्न उपस्थित केलात, तर नागपुरांतील कोणत्याही कार्यकर्त्याची तुमच्याविरुद्ध जाण्याची प्राज्ञा नाहीं ! हं, तें विडीचं थोटूक द्या आतां फेकून. ही घ्या—"

त्यानें आपली गोल्ड फ्लेकची डबी सतरंजीवर हातापायांची जुडी करून बसलेल्या विठोबापुढें करून म्हटलें.

विठोबानें विडीचें थोटूक सतरंजीवरच दाबून विझविलें; व त्यानें पुढें केलेल्या डबींतील सिगारेट घेतली. ती त्याच्या सिगारेटवर शिलगावून एक झुरका घेतल्यावर विठोबा म्हणाला—

"तुम्ही म्हणतां तें खरं आहे, अण्णासाहेब ! मी संपाला माघार घेणारा माणूस नाहीं हें माहितच आहे तुम्हाला. पण काँग्रेस मंत्रिमंडळ अधिकारारूढ होऊन अद्याप दोन महिने सुद्धां झालेले नाहींत पुरते. शिवाय आपण ज्या वेळीं संघातर्फे मंत्रिमंडळाचं अभिनंदन केलं, तेव्हां

ठाकूरसाहेबांनीं आपल्या मागण्यांचा न् गाऱ्हाण्यांचा विचार करण्याचं आश्वासन दिलं आपल्याला हेंहि विसरून चालणार नाहीं. त्याप्रमाणं त्यांनीं लगेच कामगारांवरील खटले काढूनहि घेतले—"

"अहो, मी स्वतः दहा खेटे घातले तेव्हां खटले परत घेण्याचा हुकूम दिला प्रियदर्शननं! तुमचा खरोखरीच इतका विश्वास आहे का त्याच्यावर, विठोबाजी?——अहो, कॉलेजांत आम्ही बरोबर होतों दोघें; तेव्हांपासून ओळखतोंय मी त्याला! मिठ्ठास बोलण्यांत हार जायचा नाहीं तो; पण आपल्या मुद्द्यालाहि कधीं चुकायचा नाहीं! पण त्याच्या या सौजन्याच्या देखाव्यांना फसून जातां कामा नये आपण! सर महादेवांसारख्या इरसाल नोकरशहाच्या तालमींत तो तयार झालेला आहे! नुसत्या आश्वासनावर झुलवीत ठेवलंय त्यानं आपल्याला—"

अण्णासाहेब आपल्या वक्तृत्वाचा परिणाम विठोबाच्या चेहऱ्यावर काय होतो हें पहात उद्गारले.

पण विठोबा खालीं मान घालून मुकाट्यानें सिगारेट पीत होता. त्याच्या नाकांतून निघणाऱ्या धूम्रवलयांखेरीज दुसरें कांहींही अण्णासाहेबांना दिसलें नाहीं.

पलिकडल्या खोलींतून मुलांची रडारड आणि आदळआपट सारखी कानांवर येत होती. पण विठोबाचें धूम्रपान शांत चित्तानें चाललें होतें.

"तुम्हांला काय वाटतं, शेळके?"

"आपलं म्हणणं अगदीं बरोबर आहे, अण्णासाहेब! अभिनंदनाची सभा झाल्याला दीड महिना होऊन गेला आतां. ठाकूरसाहेबांना जर खरोखरीच कांहीं करायचं असतं, तर तें करतां आलं असतं त्यांना एवढ्या मुदतींत—"

"अहो, हा प्रियदर्शन किती वस्ताद आहे याची कल्पना नाहीं तुम्हांला! मी कॉलेजांत असल्यापासून कामं केलीं आहेत त्याच्या

बरोबर! गोड बोलणं न् वागणं हें तर भांडवल आहे सगळं त्याचं! या भांडवलाच्या जोरावर त्यानं कॉंग्रेसमध्यें जम बसवला आपला! नाहीं तर विचारीत कोण होतं या गृहमंत्र्याच्या पुतण्याला!—"

"असं कसं म्हणतां आपण, अण्णासाहेब? कॉंग्रेसच्या चळवळींत भाग घेऊन त्यांनीं सर्व प्रकारचा स्वार्थत्याग केला, म्हणून आज मुख्य प्रधानपद मिळालं आहे त्यांना! कायदेभंगाच्या चळवळींत त्यांना दोनदां शिक्षा झाली, त्यांनीं तीन वर्षं बंदिवास भोगला आणि त्यांच्या-इतका जबर दंड अभ्यंकरांशिवाय प्रांतांतील दुसऱ्या कोणत्याहि पुढाऱ्याला झाला नाहीं. राज्यकारभार हातीं घेतल्यावरहि त्यांनीं इतर प्रांतांत न घडलेल्या गोष्टी आपल्या प्रांतांत करून दाखविल्या. अत्याचाराच्या आरोपावरून शिक्षा झालेले कैदी पहिल्या तडाक्याला सोडले न् जप्त वाङ्मयावरील बंदी उठविली——"

"अहो, सरकारच्या तिजोरीला तोशीस न बसतां करतां येण्या-सारख्या गोष्टी होत्या या साऱ्या! मला तुम्ही असं एक उदाहरण दाखवा कीं, जिथं सरकार किंवा त्याचे पाठिराखे वर्ग यांना नुकसानींत आणून त्यानं लोकहिताचं एकादं कृत्य केलंय? काय सारामाफी दिलीय किंवा पगारकपात रद्द केलीय? जुन्या काळीं राजे लोक गादीवर आले, म्हणजे कैदी सोडीत असत. त्यांतलींच हीं तुम्ही वर्णन केलेलीं कृत्यं! सरकारचा तुरुंगखर्च तितकाच कमी झाला! काय काळे, मी म्हणतों त्यांत गैर आहे का कांहीं?—"

"वा अण्णासाहेब! आपण अगदीं नामी पृथक्करण केलं प्रिय दर्शनच्या निष्क्रिय कारभाराचं! त्यानं केलेल्या दिखाऊ कृत्यांना सामान्य माणसं दिपून जावींत याचं नवल वाटत नाहीं मला! पण विठोबाजींनींसुद्धां त्याचं इतकं कौतुक करावं हें मात्र आश्चर्य आहे! आपण कामगारांचं सांगतां. पण परवां उमेरडला किसानांच्या सभेबरोबरच कोष्टयांची सभा भरवली आम्ही, तर ते लोकहि सत्याग्रहाची भाषा बोलायला लागले! खरोखरी, शहरं तयार नाहींत लढयाला इतकी

तयारी आहे खेडयांची आज !—"

काळ्यांचं वक्तृत्व रंगांत आलं असतांनाच आंत दोघा तिघां मुलांनीं एकदम मोठ्यानें भोकाड पसरलें. त्यांत काळ्यांच्या वक्तृत्वाचा पूर गडप होऊन गेला.

तेव्हां विठोबा तोंडांतील सिगारेट सतरंजीवर दाबून विझवीत ओरडला, "वशा, अरे वशा—"

त्याच्या दुसऱ्या हाकेबरोबर माडीवरून एक पंधरा सोळा वर्षांचा काळासांवळा मुलगा खालीं आला. खादीच्या निळ्या हाफ पँटशिवाय दुसरें कांहींहि त्याच्या दुबळ्या पण कांटक शरीरावर नव्हतें. त्यानें एकवार आपली शोधक दृष्टि सतरंजीवर बसलेल्या त्या तीन इसमांकडे टाकली; व अगदीं सौम्य आवाजांत तो विठोबाकडे बघून म्हणाला—

"मला कशाला हांक मारलीत बाबा ?"

"अरे, आंत त्या पोरांनीं रडून सारं घर डोक्यावर घेतलंय ! एक शब्द बोलूं देत नाहींत बाहेर आम्हांला ! त्यांना एक एक धपाटा देऊन गप्प कर पहिले न् मग समोरच्या हॉटेलांतून चार कप चहा बोलाव—"

"वसंता, एक सिगारेटचं पाकीटहि आण येतांना," अण्णासाहेब त्याच्या अंगावर रुपया फेंकून उद्गारले.

"वशा, आपल्या जागोबाच्या ठेल्यावरून पाकिट आण एक गोल्डफ्लेकचं ! अण्णासाहेबांचा रुपया दे त्यांना परत !—"

"नको, नको वसंता ! तूं विकतच आण एक पाकिट ! तुम्ही स्वतः कांहीं सिगारेट ओढीत नाहीं, विठोबा ! मग तुम्हांला कशाला आमच्या चैनीपायीं खर्च ?—"

"त्यांत खर्च कसला आहे, अण्णासाहेब ! चार माणसं आपल्याकडे येतात. त्यांची त्यांच्या दर्जाप्रमाणं बरदास्त ठेवणं हें कामच आहे माणसाचं ! हं वशा, दे तो त्यांचा रुपया त्यांना परत !—"

वसंतानें मुकाट्यानें अण्णासाहेबांचा रुपया त्यांना परत दिला आणि तो आंत गेला.

विठोबा जोशी ही नागपूरच्या कामगार वर्गांतील अत्यंत प्रसिद्ध व्यक्ति होती.

घरच्या गरिबीमुळें इंग्रजी चवथ्या वर्गांत असतांनाच विठोबाला शाळा सोडून गिरणींत नोकरी धरावी लागली; व आपल्या हुषारीमुळें तो थोड्याच वर्षांत जॉबर झाला. त्याच्या गोड आणि मेहनती स्वभावामुळें गिरणीच्या मॅनेजरांचा त्याच्यावर लोभ जडला. कामगारवर्ग आणि गिरणीचे व्यवस्थापक यांच्यांत ज्या ज्या वेळीं तेढ येण्याचा प्रसंग उद्भवत असे, त्या त्या वेळीं कामगारांची समजूत घालण्याच्या कामीं विठोबाचा उपयोग करून घ्यावयाला मॅनेजर चुकत नसत. त्यामुळें गिरणीकामगारसंघाच्या चळवळीपासून तो सामान्यतः अलिप्त असे. आपल्या पगारांत बचत करून त्यानें वॉकररोडवरील एक लहानसें जुनें घर खरेदी केलें. तें घर आणि त्या घरांतील त्याचा झपाट्यानें वाढणारा चिमुकला संसार यांच्यापलिकडे त्याला जग नव्हतें. घर घेतल्यावर जो सत्यनारायण त्यानें केला, त्या वेळीं गिरणीचे व्यवस्थापक आणि रुईकर वगैरे संघाचे कार्यकर्ते या दोघांनाही त्यानें पानसुपारीला बोलावलें होतें. त्या प्रसंगीं रुईकरांनीं त्याला संघांत येण्याची विनंती केली असतां, स्वतःच्या संघटनेपेक्षां व्यवस्थापकांच्या सहृदयतेवर अवलंबून रहाण्यांतच कामगारांचें जास्त हित आहे, असें उत्तर त्यानें रुईकरांना दिलें होतें.

पण ही स्थिति फार दिवस टिकली नाहीं.

मंदीची सबब सांगून जेव्हां व्यवस्थापकांनीं पगार आणि माणसें हीं दोन्ही हळूहळू कमी करावयाला सुरुवात केली, तेव्हां व्यवस्थापक वर्गाच्या सहृदयतेवरील विठोबाच्या श्रद्धेला पहिला धक्का बसला. युद्धाच्या काळांत अलोट नफा मिळत असतां संप पुकारल्याशिवाय

व्यवस्थापकांनीं कामगारांच्या पगारांत वाढ केली नव्हती, याचा त्यानें प्रत्यक्ष अनुभव घेतलेला होता. पण त्या अनुभवाविषयीं त्यानें अशी समजूत करून घेतली होती कीं, कामगारांच्या अडचणींची कल्पना व्यवस्थापक वर्गाला आपोआप येणें शक्य नसल्यामुळें, त्यांच्या कल्पना-शक्तीला आंच बसण्याइतपत असंतोष प्रकट झाला, म्हणजे ते लगेच सावध होऊन कामगारांच्या हिताला जागतात. ही त्याची समजूत नव्या अनुभवानें खोटी ठरविली. भरमसाट नफा मिळत असतां ज्या व्यवस्था-पकांना स्वतः होऊन कामगारांचा पगार वाढविण्याची बुद्धि झाली नाहीं, त्यांनीं मंदीला प्रारंभ होतांच एकदम कामगारांच्या पगाराकडे वक्र दृष्टि वळवावी, याचें त्याला आश्चर्य वाटलें.

पण खरें आश्चर्य पुढेंच होतें.

ज्या विठोबाच्या लोकप्रियतेचा उपयोग गिरणीच्या व्यवस्थापकांनीं आजवर कामगारांची मनें वळविण्यासाठीं आणि संघाच्या चळवळीला शह देण्यासाठीं करून घेतला होता, तोच विठोबा कामगारांच्या वतीनें जेव्हां माणसें आणि पगार कमी न करण्याबद्दल रदबदली करावयाला व्यवस्थापकांकडे गेला, तेव्हां त्याला असें स्पष्ट दर्शविण्यांत आलें कीं, तो आपली पायरी सोडून अमर्यादेनें वागत आहे. त्या दिवशीं गिरणीं-तून विठोबा जो परत आला, तो तडक रुईकरांच्या घरीं जाऊन संघाचा सभासद झाला. रुईकर त्याच्या संघांत येण्याची वाटच पाहात होते. त्यांनीं लगेच त्याला संघाचा चिटणीस नेमून घेतलें; व त्याच्या सहका-रितेनें संप अर्धाअधिक यशस्वीहि करून दाखविला.

पण विठोबाला लवकरच या यशाची जबर किंमत द्यावी लागली.

आपल्या एका काळच्या एकनिष्ठ नोकरानें संपाचें नेतृत्व स्वीकारून आपल्यावर बाजू उलटवावी, ही गोष्ट व्यवस्थापकांना सहन झाली नाहीं; व पुन्हा दोन वर्षांनीं जेव्हां संप झाला, तेव्हां विठोबाला निरोधनाबद्दल दोन महिन्यांची शिक्षा होऊन, शिवाय तो नोकरीलाहि

मुकला. त्याला पुन्हा कामावर घ्यावें, म्हणून रुईकरांनीं आपल्याकडून पुष्कळ खटपट केली. पण, निरोधनाबद्दल शिक्षा झालेल्या इतर कांहीं कामगारांना जरी व्यवस्थापकांनीं पुन्हा कामावर घेतलें, तरी विठोबाला मात्र त्यांनीं कामावर घेतलें नाहीं.

येथून विठोबाच्या दुर्दशेला प्रारंभ झाला.

गिरणींतील नोकरी पुन्हा मिळण्याची आशा खुंटल्यावर त्यानें किराणामालाचें दुकान काढलें. पण, कामगार हेंच मुख्यतः त्याचें गिऱ्हाईक असल्यामुळें, दुकानदारी बव्हंशीं उधारीनें चालून शेवटीं तो त्यांत ठार बुडाला. संसार दिवसेंदिवस वाढता आणि उत्पन्न तर कांहीं नाहीं. त्यामुळें त्याची स्थिति झपाट्यानें खालावत गेली. संत्रा मार्केटांत दलाली करण्याचा त्यानें प्रयत्न केला. पण तेथील मुसलमान दलालांनीं त्याचा पाय तेथें रुजूं दिला नाहीं. अखेर दुकानापायीं झालेलें देणें फेडण्यासाठीं विठोबानें आपलें आवडतें घर संघाच्या त्या वेळचे उपाध्यक्ष अण्णासाहेब पुराणिक यांच्याकडे गहाण टाकलें.

अण्णासाहेब पुराणिक ही नागपूरच्या जहाल राजकारणांतली एक घालमेली व्यक्ति होती.

ते स्वतःला कडवे समाजवादी म्हणवीत असत. पण नागपुरांतील अनेक कोष्टयांचीं आणि कामगारांचीं घरें त्यांच्याकडे गहाण पडलेलीं होतीं. पूर येण्याच्या सुमारास नदीच्या पात्रांत जाळीं लावून ठेवणाऱ्या मच्छीमारासारखें त्यांचें धोरण असे. नागपुरांत कोणताही संप होतांच जी रिलीफ कमिटी नेमली जात असे, तिचें अध्यक्षपद बहुधा अण्णासाहेबांकडे असावयाचें; व त्यामुळें प्रत्येक संपागणिक त्यांच्याकडे गहाण असलेल्या घरांची संख्या वाढत होती. पण या सावकारींतही त्यांची सहृदयता प्रतीत होत असे. ती अशी कीं, गहाणाची मुदत संपून घर ताब्यांत आल्यावरही अण्णासाहेब नांवाला भाडें घेऊन आपल्या ऋणकोला त्या घरांत राहूं देत असत. विठोबाकडून तर त्यांनीं भाड्याची

एक पैहि न घेतां त्याच्या नांवानें नुसत्या पावत्या फाडल्या होत्या. या उपकारामुळें रुईकर आणि पुराणिक यांच्यांत पुढारीपणाबद्दल जी अंत:स्थ स्पर्धा होती, तींत पडण्याची इच्छा नसतांना सुद्धां विठोबाला केव्हां केव्हां अण्णासाहेबांच्या तंत्रानें वागावें लागे.

"हें पहा विठोबा, मी तुमच्यापुढं सरळ एक सवाल टाकतों. कॉंग्रेस मंत्रिमंडळ हें आपलं आहे, याची जाणीव तुमच्याइतकीच मलाहि आहे. पण, त्याबरोबरच मला असंहि वाटतं कीं, हें मंत्रिमंडळ जोंपर्यंत अधिकारारूढ आहे, तोंपर्यंत कामगारांसंबंधींचे कांहीं प्रश्न जरूर तर थोडासा धाकदपटशा दाखवून त्याच्याकडून मनाजोगे सोडवून घ्यावे. कॉंग्रेस मंत्रिमंडळ हें कांहीं झालं तरी कामगारांचा संप नोकरशाहीच्या अत्याचारी पद्धतीनं दडपून टाकूं शकत नाहीं. तेव्हां या संधीचा फायदा घेऊन जीवनवेतनाची किमान मर्यादा, कामगारसंघांना मान्यता देण्याचं मालकवर्गावर बंधन आणि कामगारांना सर्व सरकारी सुट्टया भरपगारी मिळण्याची व्यवस्था एवढ्या तीन गोष्टी तरी पदरांत पाडून घ्याव्यात असा विचार आहे माझा. आपल्या संपामुळं मंत्रिमंडळाला थोडासा त्रास होईल खरा. पण तेवढ्या एका गोष्टीसाठीं ही संधि वाया जाऊं द्यायला तयार आहांत कां तुम्ही? बोला! तुमच्यासारख्या कार्यकर्त्यांच्या आत्मयज्ञाचं फळ पदरांत पाडून घेण्याची पर्वणी आली आहे ही. ती काय वायां दवडायची कां कॉंग्रेसवरील भक्तीविषयींच्या चुकीच्या कल्पनांमुळं?—"

"आपलं म्हणणं मला पटतं अण्णासाहेब! पण जरा दमानं घ्यावं असं वाटतं मला. सहा महिने राज्यकारभार हातीं राहूनहि जर ते कामगारांसाठीं कांहीं करणार नाहींत, तर मग संप करणं भागच आहे!—"

"सहा महिने थांबण्याची कल्पना आपल्याला पसंत नाहीं, विठोबा! अहो, हे केव्हां राजीनामा देतील याचा काय नेम?——"

"हा भ्रम आहे अण्णासाहेब तुमचा! हे पांच वर्षे सोडीत नाहींत आतां मंत्रिपदं! मंत्रिपदांनींच यांना आपण होऊन सोडलं तर गोष्ट निराळी!" काळे अण्णासाहेबांनीं आपल्यापुढें ठेवलेल्या डबींतील शेवटची सिगारेट हळूच काढून घेत उद्गारले. "गुळाच्या ढेपीला चिकटणारा मुंगळा तोडल्याशिवाय सुटत नाहीं तसं होणार आहे या कॉंग्रेस मंत्रिमंडळांचं! तेव्हां सहा महिने वाट पाहण्यांत कांहीं तोटा नाहीं फारसा! उलट मी तर म्हणतों कीं, पुढल्या चार महिन्यांत कामगार, कास्तकार आणि कोष्टी यांच्यांत खूप चळवळ करून असेंब्लीच्या जानेवारींतील बजेटी बैठकीच्या वेळीं चहूं बाजूंनीं रान उठवून द्यावं–"

"अहो, हे मंत्रिपदं आपण होऊन सोडतील असं कोण म्हणतो? पण तो शेगांवचा शेळक्या आहे ना?" अण्णासाहेब गांधीजींच्या शेळीवरील आपली कोटि शेळक्यांना कितपत आवडली हें जाणण्यासाठीं त्यांच्याकडे पहात हंसत हंसत म्हणाले. "त्याची लहर केव्हां कशी लागेल याचा काय नेम? माझा मुद्दा फक्त एवढाच आहे कीं, कॉंग्रेस मंत्रिमंडळं जोंपर्यंत नोकरशाहीच्या आहारीं गेलेलीं नाहींत न् त्यांचा दम ताजा आहे, तोंपर्यंत काय करून घ्यायचं असेल तें त्यांच्याकडून करून घ्यावं! काय शेळके, तुमची आहे कां सहा महिने वाट पाहायची तयारी? तुम्ही प्रत्यक्ष गिरणींत काम करणारे आहांत म्हणून विचारतों!"

त्यांच्या या प्रश्नाला शेळके उत्तर देणार, तोंच वसंता सिगारेटचें पाकिट घेऊन आंत आला.

"कायरे, चहा केव्हां येणार, वशा?"

"हा आलाच चहा घेऊन पोऱ्या—"

वसंताच्या पाठोपाठ आलेल्या त्या पोऱ्यानें चहाचे कप त्या चौघांपुढें ठेवले; व त्यांत चहा ओतला.

अण्णासाहेबांनीं त्या काळसर, लाल चहाचा एक घोंट घेतला; व तोंड रुमालानें पुशीत वसंताकडे पाहून म्हटलें—

"वसंता, तूं नाहीं का रे घेत थोडासुद्धां? हें कांहीं बरोबर नाही. चल, आपण दोघे अर्धा अर्धा घेऊं !—"

"नाहीं, नाहीं, आपणच घ्या अण्णासाहेब! मी जेवायलाच बसणार आहें आतां—"

"वशा, अरे धूर किती झाला आहे बघितलास का घरांत? बाहेर कोण बसले आहेत न् किती महत्त्वाचीं कामं चाललीं आहेत याची कांहीं शुद्ध नसते तुझ्या आईला! आंत जा न् पहिल्यांदा हा धूर कमी कर पाहूं—"

विठोबा किटलींत उरलेला चहा आपल्या कपांत ओतीत म्हणाला.

"मग काय विठोबाजी, तुम्ही कांहीं सांगत नाहीं आपला विचार?—"

"मी काय सांगणार, अण्णासाहेब! गिरणीबाहेर निघालेला माणूस मी! आंत खरोखरी काय परिस्थिति आहे न् कामगारांची कितपत तयारी आहे हें मला कसं कळणार? आपण आतां शेळक्यांना विचारलं तेंच बरोबर! ते गिरणींत रोज काम करतात. त्यांचंच मत प्रमाण मानलं पाहिजे असल्या नाजूक बाबतींत!—"

"मग काय शेळके, तुमचं मत काय आहे?"

"कॉंग्रेस मंत्रिमंडळाकडून कामगारांना कांहीं मिळेल अशी आशा नाहीं मला तरी मुळींच! माझं असं स्पष्ट मत आहे कीं, सहा महिने वाट न पहातां जें काय करायचं तें आतांच केलं पाहिजे आपण—"

शेळके आवेशानें उद्गारले.

"वा, शेळके निवडणुकींतील पराभवाचा राग अद्याप गेलेला दिसत नाहीं तुमच्या मनांतून!—"

हे हिंदींतून हंसत हंसत उच्चारलेले शब्द कानावर पडतांच शेळक्यांनीं एकदम वरमून मागें वळून बघितलें.

# कापून टाकण्याची तयारी

“आईये मुरलिमोहनजी, आईये!”

विठोबानें अचानक आंत आलेल्या मोहनला उद्देशून म्हटलें. मोहननें आज खादीचाच पण युरोपियन पोषाख केला होता. त्याचें उत्थापनपूर्वक स्वागत करून विठोबानें वसंताला हांक मारली.

“वशा, अरे वशा, माडीवरली तुझी ती आरामखुर्ची आण पाहूं जरा खालीं! न् चहा बोलाव आणखी दोन कप लगेच!—”

“हे पहा विठोबाजी, मला बिलकूल चहा नको न् खुर्चीचीसुद्धां गरज नाहीं मुळींच. वसंता, तूं जा आपलं काम कर—”

मोहन शुद्ध मराठींत म्हणाला.

“बरं जा वशा, जेवून घे! वर्ध्याहून कधीं परत आलांत आपण मोहनजी?—”

"काल रात्रीं आलों दहाच्या सुमाराला—"

"कां? पवनारच्या बंगल्यावर—"

अण्णासाहेब आणखी कांहीं बोलणार, तोंच मोहननें त्यांना डोळा घातला आणि म्हटलें—

"होय. पवनारच्या पुलापलिकडे आलों न् मोटार पंक्चर झाली एकदम. त्यामुळं परत यायला उशीर झाला फार—"

"वर्ध्याला कांहीं विशेष?"

"कांहीं नाहीं. सध्यां थंड आहे सगळं. इथंच कांहीं विशेष असेल तर बोला! शेळक्यांच्या बोलण्यावरून मला वाटलं कीं, संपाची तयारी चालली आहे—"

"तयारी नाहीं, चर्चा!—"

अण्णासाहेब आपले किंचित् बाहेर असलेले दांत अधिक बाहेर काढून उद्गारले.

"पण इथली चर्चा म्हणजे तयारीच ती! काय विठोबाजी?—"

"नाहीं. अण्णासाहेब म्हणतात तेंच बरोबर. मी सहा महिने कॉंग्रेस मंत्रिमंडळाला वेळ द्यावा अशा मताचा आहे; न् शेळक्यांचं मत वेळ देण्यांत अर्थ नाहीं असं आहे—"

"अहो, शेळक्यांना तसं वाटायचंच! गेल्या निवडणुकींत कॉंग्रेसनं आपल्या उमेदवारीला मान्यता न दिल्यामुळं आपण पडल्याचं दुःख अगदीं ताजं आहे त्यांच्या मनांत!—"

मोहन हंसत हंसत म्हणाला; व खिशांतील चांदीची सिगारेटकेस काढून ती त्यानें शेळक्यांपुढें धरली.

त्याबरोबर शेळक्यांच्या चेहऱ्यावर आलेली रागाची छटा एकदम मावळली; व त्या डबींतील सिगारेट घेऊन ती त्यांनीं मोहनच्या सिगारेटवर शिलगावली. विठोबा आणि अण्णासाहेब यांनाहि मोहननें सिगारेट दिली.

त्या उंची सिगारेटचा एक दमदार झुरका घेतल्यावर काळे शेळक्यांचा कैवार घ्यावयाला पुढं सरसावले.

"हं पहा मोहन, कॉंग्रेसविरुद्ध निवडणूक लढून शेळके पडले यांत त्यांना कमीपणा नाहीं मुळींच. असलं तर भूषणच आहे. कारण ते तत्त्वासाठीं लढले. पण, एकीकडे कॉंग्रेस सोशॅलिस्ट म्हणून मिरवायचं न दुसरीकडे आपल्या डायरेक्टरांना खूष ठेवण्यासाठीं शेगांवच्या वाऱ्या करायच्या हें राजकारण मात्र अगम्य आहे खरं!—"

"तुम्हांला तरी तें अगम्य असण्याचं कारण नाहीं, काळे! गांधीजींना गालिप्रदान करून पोट भरण्यापेक्षां तें फार बरं! महिन्याच्या महिन्याला मुंबईहून येणाऱ्या चेकच्या लोभानं गांधीजींना कांहीं तरी निमित्त काढून शिव्या देणं हेंच राजकारण आहे कीं नाहीं तुमचं?"

"खादीवर श्रद्धा नसतां चरखासंघाचं पदाधिकारी राहण्यापेक्षां तें फार बरं, मोहन! आमचा गांधींवर विश्वास नाहीं म्हणून आम्ही टीका करतों त्यांच्यावर. या आमच्या प्रचाराबद्दल जर कोणी आम्हांला पैसे दिले, तर तुमच्या पोटांत कां दुखावं?"

"अहो, माझ्या पोटांत कशाला दुखेल, काळे? तुम्ही जरी तुमच्या त्या रमणिकलाल शेठजींच्या इंग्रजी, गुजराथी, मराठी आणि हिंदी अशा चारी भाषांतील पत्रांत चार वेगवेगळे लेख लिहून त्यांच्याकडून दर महिन्याला चार चेक उपटलेत, तरी माझी तक्रार नाहीं त्याबद्दल! पण तुम्ही तत्त्वाची गोष्ट काढलीत म्हणून म्हणतां मी!—"

"पण यांत तत्त्व कुठं सुटलं मोहन? आमचा तर असा बाणा आहे कीं, भांडवलवाल्यांच्या पैशाचा उपयोग करूनच भांडवलशाहीचं उच्चाटन करायचं!—"

"बाकी कांहीं म्हणा मोहन, गांधीवाद्यांना जसे जमनलालजी तसा या कम्युनिस्टांना मुंबईचा हा रमणिकलाल बरा भेटला आहे.

मी पुष्कळ नादिष्ट लक्ष्मीपुत्र पाहिले आहेत आजपर्यंत! पण केवळ गांधींना गालिप्रदान करण्याच्या शोकाखातर शेंकडों रुपये भाडोत्री लेखकांना दरमहा चारणारा हा मुंबईचा शेठिया ही एक अजब चीज आहे खरोखरी! आणि हे कम्युनिस्टहि पक्के वस्ताद भेटले आहेत त्याला! तो म्हणेल तसले लेख त्याच्या त्या तीन चार पत्रांतून लिहून खूप पैसा हबकतात त्याच्याकडून! जुन्या काळीं धंदेवाईक मारेकरी असत ना, तसं झालंय या कम्युनिस्टांचं!"

"अहो, आम्ही तरी काय करावं अण्णासाहेब? तुमच्यासारखी जर वकिली, सावकारी न् मालगुजारी यांची जोड असती आमच्या पुढारीपणाला, तर पैसे मिळविण्यासाठीं आम्हीहि दर आठवड्याला गांधींच्या नांवानें कोळसा उगाळला नसता! पण आम्हांला खाजगी शाळांतून सुद्धां शिक्षक ठेवायला लोक तयार नाहींत. मग माध्यान्हाची वेळ आम्ही भागवायची कशी? हा रमणिकलाल आहे म्हणून महाराष्ट्रांतल्या किती तरी कम्युनिस्टांची दुपारची भ्रांत टळली आहे! नाहीं तरी प्रत्येक पक्षाला अलिकडे एक एक शेठिया लागतच असतो. कॉंग्रेसला शेठ जमनलालजी, हिंदु महासभेला शेठ बिर्लाजी, तसे कम्युनिस्टांना शेठ रमणिकलालजी!--"

"पण आमच्या कामगार चळवळीच्या मागें मात्र शेठिया नाहीं हो कुणी!—"

विठोबा मध्येंच हंसून उद्गारला.

"खरं आहे तुमचं म्हणणं विठोबाजी! आणि त्यामुळंच आपल्याला नेहमी पैशाची तूट पडून आपले संप अयशस्वी होतात. आपणहि एक शेठिया गांठला पाहिजे विठोबाजी आतां!--"

"हे मुरलिमोहनजी गांठून देतील आपल्याला एकादा शेठिया!–"

"शेठिया तर नाहीं! पण एकाद्या दिवाणाचा पाठिंबा मिळवून देऊं शकेन कदाचित्!--"

"तो कसा काय बुवा?"

विठोबानें त्याला आश्चर्यानें विचारलें.

पण तितक्यांत अण्णासाहेबांनीं त्याला खूण केली.

तेव्हां तो हंसत हंसत म्हणाला, "तुम्ही संपाची तर तयारी करा आधीं! मग पाहूं दिवाणाच्या आश्रयाचं! काय चलतां कां अण्णा-साहेब?—"

"चला", अण्णासाहेब विठोबाकडे वळून उद्गारले. "हें पहा विठोबाजी, माझं मत काय आहे तें मी स्पष्ट सांगितलंय तुम्हां मंडळीला. आतां तुम्हांला जें काय योग्य वाटेल तें ठरवा तुम्ही न् कळवा मला तसं—"

ते दोघे लगेच बाहेर येऊन मोटारींत बसले.

मोटार चालू होऊन शुक्रवार तलावाच्या रस्त्याला लागतांच अण्णासाहेब म्हणाले, "काय रे, काल एकटाच गेला होतास वर्ध्याला? कां ती रोज होती तुझ्याबरोबर?—"

"नाहीं रे, एकटाच गेलों होतों. नेहमीं कशी नेणार दुसऱ्याच्या मुलीला बरोबर?—"

"हें पहा मोहन, थापा नको मारूंस माझ्यापाशीं! वर्ध्याला तूं एकटा गेला नसशील; रोज तुझ्याबरोबर होती; तिला घेऊन तूं मागच्या-प्रमाणं बंगल्यावर राहिला होतास आणि त्यामुळंच उशीर झाला तुला नागपूरला पोंचायला! काय रे, खरं आहे ना सगळं मी म्हणतों तें?—"

"तुझ्यापुढं बोलावं कुणी अण्णा! उत्तम कादंबरीकार होशील तूं!—"

"मी कादंबरीकार होईन कीं नाहीं हा प्रश्न निराळा! पण तुझी कृत्यं मात्र एक एक कादंबरी लिहिण्यासारखीं आहेत खरीं! काय रे, रोजला बरोबर घेऊन तूं कितव्यांदा यात्रा केलीस ही शेगांवची? पंढरपूरला

जसं बालहत्याप्रतिबंधक गृह काढलंय, तसंच शेगांवला काढावं लागणार लवकरच! पण लक्षांत ठेव, मोहन! रोज म्हणजे कांहीं तुझी ती मद्रासी नर्स नव्हे पांचशे रुपये घेऊन गर्भपाताला तयार व्हायला! त्या गुलाबाचे कांटे तूं पाहिले नाहींस अजून!—"

"ए अण्णा! कांहीं हाड तुझ्या जिभेला? तिथं त्या धर्मराजासमोर तूं पवनारच्या बंगल्याचं नांव काढलंस—"

"अन् तुझ्या तरी जिभेला कांहीं हाड रे! तूं त्या काळ्याशीं भांडण उकरून काढून त्याचा पोटभरू शिवराळपणा चवाठ्यावर आणलास! त्या भोळ्या विठोबाला काय वाटलं असेल तुमची ही बाचाबाच ऐकून? तो समजतो आपल्यासारखेच सगळे प्रामाणिक न् कळकळीचे आहेत! आपल्या या आपसांतल्या भांडणांनीं भाव जातो बघ आपल्या पुढारीपणाचा!—"

"मग त्या काळ्यानं तरी कशाला तत्त्वनिष्ठेचा आव आणून माझ्या शेगावच्या वारीचा उद्धार केला! तूं त्याला बीर, जेवण न् सिगारेटचं टिन यांच्या जोरावर रुईकरांच्या गटांतून फोडलास हें माहित आहे साऱ्या नागपूरला!—"

"अरे मरो तो काळे! त्या मूर्खाला जरा कांहीं कुठं खुट्ट झालं कीं, आतां क्रांति होणार हिंदुस्थानांत असं वाटत असतं सारखं! मोहन, आज झक्क कार्यक्रम झाला पाहिजे आपला! कुठं चलतोस? ब्रँडनमध्यें का बिलिमोरियांत?—"

"ब्रँडनमध्यें नको न् बिलिमोरियांतहि नको! उगाच कोणी पाहिलं तर बोभाटा व्हायचा गांवभर!—"

"तो व्हायचा थोडाच थांबला आहे आतांपर्यंत!—"

"अरे, मी आतांशा जो वर्ध्याच्या वाऱ्या करतोय तो कांहीं निव्वळ प्रार्थनेला हजर राहण्यासाठीं नव्हे! माझ्याविरुद्ध अलिकडे

कांहीं निनांवी पत्रं गेलीं आहेत ईश्वरदासजींना; न् म्हणून जरा यापुढं जास्त काळजी घेतली पाहिजे मला! तुझा आग्रहच असेल, तर एम्पायरमध्यें जाऊं या! माझी स्वतंत्र खोली आहे. सगळा कार्यक्रम उत्तम न् व्यवस्थित पार पडेल!—"

"बरं चल! मला भूकहि फार लागली आहे! काय तो विठोबाकडचा चहा! मळमळतंय सारखं घेतल्यापासून!—"

"मग घेतलास कशाला तूं? मी कधीं चुकून चहा घेत नाहीं त्याच्याकडे! उलट माझ्याच खर्चानं सिगारेट पाजतों त्याला त्याच्या घरीं! तुझं पडलं सावकारी रक्त! तो एवढा अन्नाला महाग झालेला दिसतोय तरी सुद्धां तूं त्याच्या पैशानं चहा सिगारेट प्यायला पाहणार!"

मोहननें बोलतां बोलतां मोटार एम्पायर हॉटेलच्या प्रशस्त आवारांत आणून उभी केली. त्याबरोबर चपराशी धांवत पुढें आला. त्याच्या अंगावर किल्ल्यांचा जुडगा फेकून मोहन म्हणाला—

"खोली उघड माझी न् जेवणाची व्यवस्था कर ताबडतोब—"

चपराशानें धांवत पुढें जाऊन खोली उघडली आणि आंतल्या खोलींत असलेलें जेवणाचें टेबल व्यवस्थित केलें. त्यानें टेबलावर शुभ्र चादर घातली; हिरव्या रंगाचें आच्छादन असलेला दिवा त्यावर ठेवला व त्याच्या दोहों बाजूंना दोन पुष्पपात्रें ठेवून टेबलाची सजावट पूर्ण केली.

ते दोघे बगीचांतील खुर्च्यांवर बसून धूम्रपान करीत होते.

तो बाहेर येऊन आदबीनें म्हणाला—

"खोली तयार आहे, साहेब—"

ते आंत येऊन खुर्च्यांवर बसतांच त्यानें जेवणाची पदार्थपत्रिका (menu) त्यांच्यापुढं ठेवली आणि तो मुकाट्यानें मागें उभा राहिला.

"उभा काय राहिलास?—"

असा उद्गार त्रासिकपणानें काढून मोहननें त्याला बीर आणि

लेमन यांच्या बाटल्या आणावयाला सांगितलें; व त्याबरोबरच आपल्याला हव्या असलेल्या पदार्थांचीहि नांवें भराभर घेतलीं.

अण्णासाहेब सचिंत मुद्रेनें धूम्रपान करीत होते. त्यांच्या त्या गुळगुळीत, सुरकुतलेल्या चेहऱ्यावर आकुंचनामुळें जागोजाग पडलेल्या वळया दिव्याच्या प्रकाशांत अधिकच बेढब दिसत होत्या. धूम्रपान करितांना घोड्याप्रमाणें नाकपुड्या फेंदारून आणि फुरफुरावून आंत कोंडलेला धूर बाहेर सोडण्याची त्यांना संवय होती; व ते क्षुब्ध झालेले असले किंवा एकाद्या महत्त्वाच्या विषयांत व्यग्र असले, म्हणजे त्यांच्या नाकपुड्यांची ही हालचाल जास्त प्रमाणांत चालत असे. त्यांचे लाल चपटे डोळे त्या धूम्रवलयांमुळें मंदावलेल्या ठिणग्यांप्रमाणें दिसत होते. त्यांच्या डोक्याला सर्व बाजूंनीं टक्कल पडलेलें असून, एकाद्या कातळावर मध्येंच जसा गवताचा वाळलेला पुंजका असावा तसे त्यांच्या टाळूवर शिल्लक असलेले करडे केस दिसत असत.

मोहनहि त्यांच्याप्रमाणेंच व्यग्रचित्त होता. त्याचे किंचित् तारवटलेले टपोरे डोळे त्या व्यग्रतेमुळें अकुंचित झाले होते; व त्याच्या लाल रुंद जिवणीभोंवतालचे चरे प्रकाशामुळें अधिक ठळक दिसत होते. त्याच्या त्या गोऱ्या चतुष्कोन चेहऱ्यावर नेहमीची कलंदरी बेपर्वाई आज दृष्टीस पडत नव्हती. तरी सुद्धां गुंगलेले मादक डोळे, मोडलेल्या बांकदार भुंवया, दांताखालीं अर्धवट दबलेला अधरोष्ठ आणि कपाळावर हात ठेवल्यामुळें विस्कटलेले काळेभोर कुरळे केंस यांच्यामुळें त्याचा चेहरा चिंताक्रांत खरा पण अधिकच मोहक वाटत होता.

दोघेहि आपापल्या विचारांत गर्क होते.

चपराशानें बाटल्या फोडून त्यांच्यापुढें ठेवल्या.

त्याबरोबर मोहननें दोन्ही चषक भरले; व ते एकवार अभीष्टचिंतनपूर्वक एकमेकांना भिडवून त्यांनीं मद्यपानाला सुरवात केली.

तोंच चपराशी खाद्य पदार्थांच्या प्लेट्स घेऊन आला; व त्यानें टेबलावर त्यांची झटपट व्यवस्थित मांडणी केली.

जेवणाला प्रारंभ झाल्यावर अण्णासाहेब थोडे गंभीरपणानें म्हणाले, "मोहन, तूं कधीं विचार करतोस का रे आपल्या परिस्थितीचा?––"

"हो ना! सध्या तर मी दुसऱ्या कशाचाच विचार करीत नाहीं तीं निनांवीं पत्रें आमच्या मुख्य कचेरीकडून माझ्याकडे पहायला आल्यापासून!––"

"मी त्या अर्थानं विचारीत नाहीं, मोहन––"

"मग कोणत्या अर्थानं विचारलंस तूं?"

"तूं आणि आपला हा नवा मुख्य प्रधान दोघेहि कॉंग्रेस सोशॅलिस्ट पक्षांत होतात; कॉंग्रेस सोशॅलिस्ट पक्ष स्थापन करण्यांत तूं पुढाकार घेतलास; तो पक्षाच्या कार्यकारी मंडळाचा सभासद न् तूं मुख्य चिटणिस होतास––"

"मग म्हणणं काय तुझं अण्णा?––"

मोहननें किंचित् त्रासिक आवाजांत विचारलें.

"मोहन, मला वाटतं तुझ्या नसा मरून गेलेल्या आहेत सगळ्या! एका काळीं तुझ्याबरोबर कॉंग्रेस सोशॅलिस्ट म्हणून काम करीत असलेला तुझ्याच वयाचा हा प्रियदर्शन मुख्य प्रधान होऊन बसला न् तूं आपलं पूर्वीप्रमाणं चीफ एजंट रहावंस याचं कांहीं वाटत नाहीं तुला?––"

अण्णासाहेबांच्या नाकपुड्या त्वेषानें फेंदारल्या होत्या. त्यांच्या त्या खुनशी संतप्त चेहऱ्याकडे तुच्छतामिश्र कुतूहलानें पहात मोहन म्हणाला—

"अरे, पण ती आपल्या हातची गोष्ट आहे का अण्णा? प्रियदर्शनला त्याच्या नशिबानं हात दिला!"

"नशिबानं? गांधींनीं दिला म्हण! नाहीं तरी गांधींचा खरा ओढा पोटांतून मवाळांकडे आहे. त्यामुळं प्रांतांतले जुने पुढारी सारे

बाजूला सारले गेले न् जिल्हा कौन्सिलच्या सुद्धां कारभाराचा अनुभव नसलेला हा सर महादेवांचा पुतण्या मुख्य प्रधान होऊन आपल्या सगळ्यांच्या डोक्यावर बसला!–तुला नाहीं चीड येत या गोष्टीची?–"

"हे पहा अण्णा, प्रियदर्शन मुख्य प्रधान झाला तो कांहीं केवळ बापूंच्या शिफारशीमुळं किंवा लहरीमुळं नव्हे. त्याचे गुणहि तसेच आहेत. तूं म्हणतोस, त्याला कारभाराचा अनुभव नाहीं म्हणून. पण सर महादेवांच्या हाताखालीं पुष्कळ अनुभव घेतलाय त्यानं. कायदेभंगाच्या दोन्ही चळवळींत त्यानं धडाडीनं भाग घेतला. नाहीं तर, तूं आठवण कर, आपण दोघांनीं काँग्रेसच्या निमित्तानं दिल्लीला जाऊन कशी मजा मारली ती! बापूंची माणसाची पारख अचूक असते अगदीं!"

"तें तुझ्यावरल्या त्यांच्या लोभावरून दिसतंच आहे! तूं प्रियदर्शनचे एवढ गुण गातोस! पण शुक्लाजी, खरे, मेहता, प्यारेलाल सिंगजी, मिश्राजी, खांडेकर हे काय कमी स्वार्थत्यागी किंवा कर्तबगार होते का त्याच्यापेक्षां?––"

"असं कोण म्हणेल अण्णा? या पुढाऱ्यांतली चुरस टाळण्यासाठीं तर त्याला मुख्य प्रधान करण्याचा सल्ला दिला बापूंनीं! त्यांच्या आपसांतल्या स्पर्धेचा फायदा मिळाला प्रियदर्शनला! त्याला तूं न् मी काय करणार?––"

"तें कांहीं नाहीं मोहन! या प्रियदर्शनला आपण ओढलाच पाहिजे खालीं!––"

"अरे पण का? तुला जर त्याच्यापासून कांहीं हवं असेल तर सांग ना मला? तुला पार्लमेंटरी सेक्रेटरी व्हायचंय का? पब्लिक प्रॉसिक्यूटर व्हायचंय का? अरे, तो मुख्य प्रधान झालाय या गोष्टीचा शक्य तितका फायदा घेतला पाहिजे आपण!––"

"खरोखरी तुला शरम वाटली पाहिजे असं बोलायला, मोहन! मला कळत नाहीं तुझी मनोवृत्ति! एका काळचा आपल्या बैठकींतला

इसम हा न्‌ त्याचं आश्रित होऊन आपण राहायचं ! छे छे, मोहन, तुझ्या नसा खरोखरीच मरून गेल्या आहेत सगळ्या !—"

"हे बघ अण्णा, मी कांहीं कॉलेजपासूनचा त्याचा सहाध्यायी नाहीं तुझ्याप्रमाणं मत्सरानं जळफळायला ! मी असं ठरवलंय कीं, तो मुख्य प्रधान आहे न्‌ आपला दोस्त आहे; तर या गोष्टीचा फायदा घेऊन जितक्या रीतीनं म्हणून हात मारतां येईल तितका मारून घ्यायचा या वेळीं !—"

"पण बोलून चालून चीफ एजंट तूं! तूं काय हात मारणार? "

"अण्णा, मी कांहीं आतां चीफ एजंट राहिलों नाहीं नुसता ! मी एक कंपनी काढायच्या विचारांत आहे न्‌ तुला डायरेक्टरहि करणार आहे तिचा !—"

"कंपनी ! कसली कंपनी? नांव काय तिचं? काय करणार आहे ती?—"

"तें सारं फक्त मला माहित ! ती पृथ्वीच्या पाठीवरले सगळे धंदे करील ! मी तूर्त तिचं नांव 'हिंदुस्थान लिमिटेड' ठेवायचं ठरवलंय ! तूं एक पैहि न देतां डायरेक्टर हो ! प्रांतिक सरकारच्या निरनिराळ्या खात्यांचे जितके म्हणून ठेक्यांचे न्‌ खरेदीचे व्यवहार होतात, तितके सगळे या कंपनीमार्फत व्हावेत असा प्रयत्न करणार आहे मी ! आपले नवे प्रांताध्यक्ष शेठ गुलाबचंदजी हे अध्यक्ष होतील डायरेक्टरांच्या बोर्डाचे ! मग काय बोल, पसंत आहे ही कल्पना तुला? आतां लवकरच अंदाजपत्रक तयार होईल आपल्या प्रांताचं. त्याच्या अनुरोधानं कामं सुरू होणार आपलीं जोरानं !—"

"कल्पना चांगली आहे तुझी, मोहन ! पण प्रियदर्शन मदत करील आपल्याला असं वाटतं तुला? त्याला आपल्या सचोटीची घमेंड आहे फार—"

"अरे, सचोटीची फार घमेंड असेल, तर ज्या उच्च पदावर तो आज बसलेला दिसतोय त्याच्यावरून खालीं येईल गडगडत! सचोटी हें सुद्धां धोरण आहे एक! तो कांहीं धर्म नव्हे! नाहीं तर 'कमिशन' या नांवानं आज हर एक व्यवहारांत राजरोस नांदणारी चीज अस्तित्वांत आली नसती जगामध्यें! निरशा दुधाचं लोणी आधीं यंत्रानं काढून घेऊन मग तें गिऱ्हाइकाला विकणं हें जसं या शास्त्रीय युगांत प्रतिष्ठित-पणाचं समजलं जातं, तसंच प्रत्येक व्यवहारांत स्वतःचं कमिशन आधीं काढून घेणं हेंहि अगदीं सचोटीचं समजलं जातं! आमच्या या सचो-टीच्या व्यवहारांत प्रियदर्शन जर सामील झाला नाहीं न् आम्हांला तंग करूं लागला, तर त्याला परिणाम भोगावे लागतील आपल्या सचोटी-विषयींच्या चुकीच्या कल्पनांचे! त्याचं न् उद्योगमंत्री पंडित गदाधर वाजपेयी यांचं सूत नाहीं फारसं! हा कालचा पोर मुख्य प्रधान होऊन आपल्यावर वर्चस्व गाजवतो म्हणून तो बुढ्ढा जळफळत असतो सारखा! त्यांच्यांतल्या या धुसफुशीचा फायदा घेतला पाहिजे आपण! आम्हीं ठरवलंय प्रियदर्शनला धाकांत न् दाबांत ठेवून जितकं साधतां येईल तितकं साधून घ्यायचं. तो हटवादीपणानं आडवा येईल तर त्याला कापून काढूं बेलाशक!—"

आपल्या प्लेटवरील पांफ्रेटचा मोठा थोरला तुकडा सुरीनें कापतां कापतां मोहन आवेशानें उद्गारला; व घसा ओला करण्यासाठीं मद्याचा एक घोट घेऊन त्यानें म्हटलें—

"म्हणून मी मघांशीं तें सूचक वाक्य बोललों कीं, संप झाल्यास एका दिवाणाची मदत मिळूं शकेल आपल्याला!—"

"पण तूं भलत्याच ठिकाणीं बोललास तें! तो विठोबा म्हणजे खराखुरा 'विदुर' आहे बघ! कौरवांत राहून पांडवांची बाजू घेणाऱ्या महाभारतांतल्या विदुराप्रमाणं तो आपल्यांत राहून प्रियदर्शनची तरफ-दारी करतोय सारखी! कामगारांचं शिष्टमंडळ घेऊन हा प्रियदर्शनला

भेटायला गेला, तेव्हां त्यानं जी कॉफी या भोळसटाला पाजली तिनं अगदीं मिंधा करून टाकलाय त्याला!—"

"पण प्रियदर्शनच्या मनांत कांहींहि असलं, तरी प्रांताची स्थितीच अशी आहे कीं, तो शेतकरी न् कामगार यांच्यासाठीं कांहींहि करूं शकत नाहीं यंदाच्या वर्षी! मला कालच वर्ध्याला कळलं—बापूंचा सारा कटाक्ष दारूबंदीवर आहे; न् तिच्यापायीं एवढी तूट येणार आहे उत्पन्नांत कीं, दुसरं कोणतंहि नवं काम हातीं घेणं अशक्य होईल मंत्रिमंडळाला! म्हणून मी म्हणतों कीं, या परिस्थितीचा फायदा घेऊन आपण धाकांत न् दाबांत ठेवूं शकतों प्रियदर्शनला! बाहेरचा असंतोष न् मंत्रिमंडळांतली धुसफूस—त्याची काय हिंमत आहे आपल्याला तंग करायची! आमच्या गुलाबचंदजींनीं परवां गदाधरजींना उपाहार दिला, तेव्हां 'लोकहिता'च्या त्या संपादकालाहि बोलावला होता त्यांनीं माझ्या सूचनेवरून! प्रातांतलं मुख्य इंग्रजी दैनिकहि आपण बगलेंत मारणार आहोंत त्याच्या संपादकाला जाहिरातींचा मलिदा चारून!—"

"मग कांहीं हरकत नाहीं माझी तुझ्या या नव्या कंपनीचं डायरेक्टर व्हायला, मोहन!—"

अण्णासाहेब मोठ्या उल्हासानें चषक उचलीत म्हणाले.

त्यांच्या डोळ्यांत आतां उत्पन्न झालेल्या लकाकीपुढें त्या चषकांतील मद्याची लकाकी खात्रीनें फिकी पडली असती.

# शकुंतलेचा शाप

काल रात्रीं आम्ही पवनारहून परत आलों आणि तेव्हांपासून चैन नाहीं माझ्या जिवाला. पहाटे उठून मी हें लिहितें आहे. पण, उठून लिहितें असं म्हणायला एक क्षण तरी निवांत झोंप लागली होती का मला ? रात्रीं बाराला आम्ही परत आलों. मम्मीनं केवढे डोळे केले मला बघितल्यावर ! आम्हांला यायला इतका उशीर झालेला पाहून खात्रीनं तिच्या मनांत कांहीं तरी आलं. पण मी नदीच्या पात्रांत घसरून पडल्याचं कळल्यावर जें काय मनांत आलं होतं, तें सारं गेलंहि लगेच ! लहान मुलं आरशावर श्वास टाकतात; अन् तीं श्वास टाकतात न टाकतात, तोंच तो उडूनहि जातो. आईचं प्रेमळ मन सुद्धां त्या आरशासारखंच नसतं का ?—'तुझं अंग शेकून देतें,' म्हणून ती लगेच म्हणाली मला. किती ओशाळल्यासारखं झालं मला त्या वेळीं ! मी तिला 'नको' म्हणून सांगितलं न् अंथरुणावर येऊन पडलें. पण किती तरी

वेळ डोळा लागेना माझा. आणि डोळा एकदांचा लागल्यावर निवांत झोंप येण्याऐवजीं कसकसलीं स्वप्नं नाचूं लागलीं डोळयांपुढें! त्या स्वप्नांतूनच उठून दचकून जागी झालें मी अखेर!

पवनारहून परत आल्यावर पडलेलीं तीं स्वप्नं!--पवनारला जें घडलं तें सुद्धां त्या स्वप्नांपैकींच एक असतं तर किती बरं झालं असतं! --प्रणयमीलनाचा अनुभव एकदम प्रत्यक्ष येण्यापेक्षां प्रथम जर त्याची प्रतीति स्वप्नांतून आली तर तें इष्ट होणार नाहीं कां? एकादी गोष्ट परिणामीं कितीही आनंददायक असली, तरी ती जर ध्यानींमनींसुद्धां नसतां अकस्मात् घडून आली, तर मनाला धसका बसल्यासारखा होतो. पण प्रियकराची पहिली भेट स्वप्नांत घडण्याइतक्या उषेसारख्या सगळयाच युवति कुठं भाग्यवान् असतात?--त्या स्वप्नांतून मी दचकून उठलें. कां दचकून उठलें?--नीटसं आठवत नाहीं तें स्वप्न आतां. मला वाटतं, मी पात्रांतल्या एका खडकावर उभी होतें. खूप उंच होता तो खडक न् खालचं पाणी डोहासारखं खोल खोल दिसत होतं. मोहननीं मला अचानक मिठी मारायचा प्रयत्न केला; न् त्या गडबडींत मी पाय घसरून खालीं धाड्दिशीं डोहांत पडलें! कां बरं असं चमत्कारिक स्वप्न पडलं मला? वास्तविक मी घसरून पडलें, तेव्हां मोहननींच हात देऊन उठवली मला. पण स्वप्नांत मात्र उलट दिसलं! पण उलट तरी कसं म्हणूं? मोहननीं त्या वेळीं मला सांवरली--पण त्यानंतर जें घडलं! तें स्वप्न चमत्कारिक नाहीं. खरंच आहे तें!

गेले तीन महिने अनिर्बंध प्रीतीचं तत्त्वज्ञान ते सारखे ठसवीत होते माझ्या मनावर! मला कळायला नको होता का त्यांचा उद्देश? मग कां गेलें मी त्यांच्याबरोबर एकटी शेगांवला? ममीनं कांहीं मोठ्याशा खुषीनं नाहीं परवानगी दिली मला त्यांच्याबरोबर एकटयानं जायला. पण पपांची अनुकूलता पाहिल्यावर ती बोलली नाहीं फारसं कांहीं. तरीसुद्धां मोटारींत बसतांना आठच्या आंत घरीं परत येण्या-

बद्दल किती बजावून सांगितलं तिनं मोहनना! माझंच चुकलं. मी प्रार्थना पहाण्याच्या मोहानं सातपर्यंत तिथं थांबलें. पण तो मोह तरी का पडला मला?—'बापूंशीं तुझी ओळख करून देतों,' असं मोहननीं जर मला सांगितलं नसतं, तर खात्रीनं थांबलें नसतें मी प्रार्थनेसाठीं. दुसरीहि चूक माझीच. नदीच्या पात्रांत उतरण्याची दुर्बुद्धि मला झाली नसती तर?—पण मी नदींत उतरलें नसतें, तरी बंगल्यावर गेल्यावर आवरतां आलं असतं कां मला त्यांना? नागपूरहून वर्ध्याला येतांना त्यांनीं तो बंगला मला दाखवला न् किती खुबीनं कबूल करून घेतलं माझ्यापासून तिथं थोडा वेळ थांबायचं! छे, त्यांनीं मला फसवलं नाहीं; मी जाणून बुजून फसलें! बांधावरून आणि खडकांवरून आदळत खालीं आलेला तो नदीचा फेंसाळ, उत्संखल, खदखदा हसणारा प्रवाह!—तो जणूं मला सांगत होता कीं, मनुष्याच्या दुरंत वासनाहि अशाच सगळीं बंधनं झुगारून देऊन मीलनाचा मार्ग गांठतात. पण मला त्या वेळीं तें उमजलं नाहीं. अनिर्बंध प्रीति! हीच का ती अनिर्बंध प्रीति?—परत येतांना मोहन मला म्हणाले, "आपल्या आयुष्यांतल्या परमोच्च सुखाचा स्वर्गीय प्रसंग आहे हा! त्याच्याविषयींच्या उत्कंठेनं आपलं आजवरलं आयुष्य लोभनीय झालं होतं; न् त्याच्या आजच्या अनुभूतीनं आपलं पुढलं आयुष्य लोभनीय होणार आहे!" किती गोड वाटले ते त्यांचे शब्द मला! मोटार चालवतांना ते सारखे बोलत होते. पण मला तें ऐकूं येतंहि होतं आणि नव्हतंहि! कसल्या तरी अनिर्वचनीय तंद्रेंत मी गुंगलें होतें. तिला जागृति म्हणतां येणार नाहीं, निद्राहि म्हणतां येणार नाहीं. मन नुसतं गुंगलं होतं;—कसलीहि हालचाल करीत नव्हतं. श्रांत न् शीतळ झालेल्या गात्रांतून कसल्या तरी सूक्ष्म ऊर्मि उठत होत्या. त्या ऊर्मींच्या हिंदोळ्यावर आंदोलणारं मन—त्याची शुद्ध हरपली होती सगळी. त्यांच्या खांद्यावर मस्तक टेकलं होतं मी आपलं. ते मधन मधून माझ्या अंगावर हात फिरवीत.—माझ्या भुरूभुरू उडणाऱ्या केसांचं, थंड कपाळाचं न् सुस्त

डोळयांचं किती तरी वेळां चुंबन घेतलं त्यांनीं!--तेवढंच फक्त आठवतं. ते काय बोलले हें आठवत नाहीं आतां. जणू कांहीं तो सारा प्रवास न् प्रकार म्हणजे अर्धवट आठवणारं स्वप्नच आहे एक!

पण तें स्वप्न नाहीं, सत्य आहे. आणि त्या सत्याच्या कठोरतेची —कटुतेचीहि म्हणू का ?–प्रतीति मला ममीच्या त्या घरीं आल्याबरोबर बघितलेल्या साशंक डोळयांत आली. "कां ग, इतका उशीर कसा झाला? मी बजावून सांगितलं होतं ना तुम्हांला आठच्या आंत यायला ?—" तिनं माझ्याकडे रागारागानं पहात पण मोहनना उद्देशून विचारला होता तो प्रश्न. मी घुटमळलें, घाबरलें; पण त्यांनीं मी पाण्यांत घसरून पडल्याची हकीकत किती खुबीनं न् खुलवून सांगितली तिला! ममीला वाटलं, केवढया संकटांतून आपल्या एकुलत्या एका मुलीला वाचवली त्यांनीं! ते इतके नाटकी आहेत असं जर पूर्वी कुणी मला सांगितलं असतं, तर खरं नसतं मानलं मी तें! पण इतका उशीर झाल्यावर असं कांहीं तरी नाटक केल्याशिवाय त्यांनासुद्धां गति नव्हती दुसरी! त्यांनीं ती हकीकत सांगितल्यावर ममीच्या डोळयांतला सगळा संशय, सगळा रोष गेला; न् कृतज्ञतेच्या आंसवांनीं भरून आले ते लगेच! ते अगदीं धट्टपणानं परत गेले तिचा निरोप घेऊन. पण मला मात्र सारखी चुटपुट लागून राहिली तिला तशा रीतीनं फसवल्याबद्दल! आजपर्यंत किती तरी वेळां खोटं बोललें असेन मी ममीजवळ. पण अशी चुटपुट लागली नव्हती कधीं माझ्या मनाला!

ममीला जसं त्यांनीं फसवलं, तसंच मलाहि फसवणार नाहींत का ते? छे, छे, माझ्या गळयावर हात ठेवून शपथ घेतली आहे त्यांनीं! ममीला त्यांनीं फसवलं तें निरुपाय म्हणून; तिला खरं सांगण्याची सोय नव्हती मुळींच. प्रीतीचा आस्वाद इतक्या चोरटेपणानं घ्यावा लागावा हें दुर्दैव नव्हे का खरोखरी? प्रणयाच्या पहिल्या अमर्याद ऊर्मींत शरीर आणि मन या दोहोंचीहि शुद्ध बुद्ध नाहींशी झालेली

असतांना जी गोष्ट अगदीं सहज, अगदीं न कळत घडून येते, ती चोरून करण्याची, चोरून ठेवण्याची गरज का पडावी? जीवितांतील परमोच्च सुखाचे हे क्षण, यौवनाच्या स्वर्गीय सफलतेची ही प्रथमानुभूति, एखाद्या चोरून आणलेल्या पृथ्वीमोलाच्या वस्तूप्रमाणं, अंतःकरणाच्या कोंपऱ्यांत खोल खोल गाडून टाकण्याची पाळी का यावी? ज्ञानवृक्षाचं फळ निषिद्ध ठरवून तें खाण्याची जी मनाई परमेश्वरानं आदिमानवाला केली होती, ती याच अर्थानं तर नसेल? नाहीं तर तें फळ खातांच आदिमानवाचा अधःपात का झाला असता? प्रीतिफळाचा आस्वाद निषिद्ध ठरवणं, त्यामुळं अधःपात होतो असं मानणं, हें अनैसर्गिक, अन्यायाचं नाहीं का?—मोहन म्हणतात तेंच खरं,—प्रीति अनिर्बंध असली पाहिजे; तिचा उपभोग हा तारुण्यांतला स्वभावसिद्ध हक्क समजला गेला पाहिजे.—मग माझं मन अस्वस्थ का व्हावं? भीतीनं व्याकुळ का व्हावं? त्यांच्याविषयीं अविश्वास का वाटावा? हा सारा पूर्वसंस्कारांचा परिणाम आहे. छे, ते मला फसवायचे नाहींत कधीं. माझ्या गळ्यावर हात ठेवून शपथ घेतली आहे त्यांनीं.

   

काल सेमिनरी हिलवर फिरायला गेलों होतों आम्ही. तेव्हां माझ्या ध्यानींमनीं नसतांनाहि पुन्हा घडला तसा प्रकार! मी पुष्कळ प्रयत्न केला त्यांना आवरण्याचा. पण त्यांच्या प्रेमळ आर्जवापुढं कांहीं चाललं नाहीं माझं. परत येतांना मी स्तब्ध होतें. त्यांना वाटलं, मी रागावलें आहे. हो, मी रागावलें होतें खरीच. पण स्वतःवर, त्यांच्यावर नव्हे! मी जवळ असलें, म्हणजे त्यांना माझ्याशिवाय दुसरं कांहीं सुचत नाहीं, स्वतःचं मन आवरत नाहीं, हें मला कळून चुकलंय आतां. तरीसुद्धां मी त्यांच्याबरोबर एकटी बाहेर का गेलें? त्यांना माझा मोह आवरत नाहीं आणि मलाहि त्यांचा मोह आवरत नाहीं. त्यांच्या सहवासांतून दूर झाल्यावर मग मला विवेकाच्या शंभर गोष्टी सुचतात; आपलं हें सारं

वर्तन चुकीचं आहे असं वाटत. पण त्यांच्या सान्निध्यांत गेल्यावर पुन्हा सगळ्या गोष्टींचं भान नाहींसं होतं. प्रणयाच्या उन्मादानं मला जसं बेहोष केलंय, तशीच त्यांचीहि अवस्था झाली असेल का?

या शंकेनं केव्हां केव्हां व्याकुळ होतं माझं मन. एकदां वाटतं त्यांना विचारावं.——माझ्या गळ्यावर हात ठेवून शपथ घेतली आहे ना त्यांनीं?— पण जेव्हां विचारायचं तेव्हां भान राहत नाहीं आणि मग विचारायचा धीर होत नाहीं. असं वाटतं, ते इतकं प्रेम करीत असतांना शंका घेणं अयोग्य नाहीं का होणार? देवा, यौवनपुष्पांतला हा प्रीतीचा मधु——याचा आस्वाद घेणं तूं इतकं कठीण का करून टाकलंस? आणि जर त्याचा आस्वाद माणसानं सहजप्रवृत्तीनं घेऊं नये अशी तुझी इच्छा होती, तर तूं प्रीतीला इतकी मादक आणि दाहक का केलीस? माणसाला नंदनवनांत ठेवायचा न् तिथलं सर्वांत मधुर फळ खायला मात्र त्याला मनाई करायची, ही कुठली तुझी रीत? प्रीतीचा आगम म्हणजे मनःसृष्टीचा वसंतऋतु. यौवनानं शरीर कितीही मुसमुसलेलं असलं तरी अंतःकरणांत प्रीतीचा उद्भव होईपर्यंत भावनांना बहर येत नाहीं. प्रीतीच्या मदिर स्पर्शानं मनःसृष्टींतल्या सगळ्या कळ्या कशा उन्मत्तपणानं उमलतात! त्या उमलत्या कळ्या निर्दयपणानं चिरडून टाकायच्या ही कुठली नीति? जीवितांतील सगळ्यांत मधुर, सगळ्यांत उदात्त आणि सगळ्यांत आनंददायक भावना आणि घटना म्हणजे प्रीति, प्रीतीची पूर्तता! पण संशय आणि भीति यांनीं किती कडवटपणा आणला आहे तिला! केवड्याच्या पानाला कांटे आणि बनांत साप! प्रीतीचंहि तसंच नाहीं का?

पण त्यांच्या मनाची अवस्थासुद्धां माझ्याच सारखी असेल का आज? स्त्रीप्रमाणं पुरुषाला सुद्धां प्रीतीचा आस्वाद कडवट, कंटकमय वाटत असेल का? स्त्री ज्या आतुर पण सभय मनानं प्रणयाच्या केतकी-

कुंजांत प्रवेश करते, तशीच स्थिति पुरुषाचीहि असते का प्रणयाचा प्रथमास्वाद घेण्याच्या वेळीं ? मला वाटतं, नसावी. जेव्हां जेव्हां त्यांच्या दृष्टीला माझी दृष्टि भिडते, तेव्हां तेव्हां अधीरता आणि अतृप्तता यांच्याशिवाय दुसरा कोणताहि भाव दिसत नाहीं त्यांच्या दृष्टींत मला. आणि त्यांचे ते निःशंक आणि निर्भय डोळे बघितल्यावर माझाहि धीर चेपतो मग.—मलाहि वाटतं कीं, इतक्या या स्वाभाविक आणि निष्पाप गोष्टींत इतकं भिण्यासारखं, संशयानं अडखळण्यासारखं काय आहे ? पण, हें वाटलं, तरी तेवढ्यापुरतं. पाण्यानं भिजलेल्या जमिनीवर ऊन पडतांच तिला भेगा पडाव्यात न् तिच्यांतून धुकशाचे वाफारे निघावे, तसं होतं मागाहून माझ्या मनाचं. नाहीं नाहीं त्या शंका मनांत येतात. असं वाटतं कीं, शकुंतलेसारखी तर माझी फसवणूक होणार नाहीं ना ? शाकुंतलांतील तो दुर्वासाचा विस्मृतीचा शाप मला अत्यंत सूचक वाटतो. प्रीतीच्या जटिल शास्त्रांत प्रवीण असलेल्या कालिदासानं माझ्यासारख्या अननुभवी, निष्कपट कुमारिकांना इषारा देण्यासाठीं त्या शापाच्या रूपानं तें एक प्रतीक घातलं आहे शाकुंतलांत ! प्रणयमधूच्या पहिल्या अमर्याद आस्वादनानंतर प्रेमिकाला कांहीं काळ तृप्ति आणि श्रांतता येते. —त्या श्रांततेचं पर्यवसान अखेर विस्मृतींत होतं. आणि बिचारी प्रणयिनी त्या विस्मृतीच्या शापाला बळी पडते. नाहीं तरी शेलेनं म्हटलंच आहे,—

The weak one is singled
To endure what it once possesst

शकुंतलेचा तो दारुण अनुभव–दुर्वासाचा तो विस्मृतीचा शाप! किती तरी प्रणयिनींचं हृदय विदीर्ण केलं आहे त्या शापानं! किती तरी अल्लड, अजाण अबलांच्या उमलत्या जीवनाचं मातेरं केलं आहे त्या शापानं! माझ्या बाबतींत तर तसं होणार नाहीं ना ? दुष्यंतानं झिड-

कारलेल्या दिङ्मूढ शकुंतलेला मेनकेनं उचलून स्वर्गात नेलं. माझी ममी धांवेल का तशी माझ्या हांकेला ?

ममी अलिकडे किती साशंकतेनं बघत असते माझ्याकडे ! मी कितीहि लपवण्याचा प्रयत्न केला, तरी माझ्या वृत्तींत न् शरीरांत झालेला फरक तिच्या अनुभविक दृष्टींतून कसा सुटणार? मी पुष्कळ लपवीन. पण माझं सगळं शरीर, माझी वृत्ति, माझी दृष्टि, माझी प्रत्येक हालचाल बोलते आहे. शकुंतलेला सांगावं लागलं नाहीं;—कण्वऋषींनीं तें अंतर्ज्ञानानं ओळखलं. स्त्रियांना तर या बाबतींत एक प्रकारचं विशेष अंतर्ज्ञान असतं ! ममीला आवडत नाहीं अलिकडे मी त्यांच्याबरोबर बाहेर गेलेलं; मला दोन तीनदां म्हणूनहि बघितलं तिनं तसं. विशेषतः सेमिनरी हिलवरून फिरून परत यायला जेव्हां आम्हांला रात्रींचे अकरा वाजले, तेव्हां ती मला खोंचून म्हणाली सुद्धां, "का ग, आजहि कुठं घसरलीस की काय, रजनी?" एकदां वाटतं, ममीला सांगून टाकावं सरळ सरळ. पण धीर होत नाहीं. वास्तविक आईच्या मांडीसारखा दुसरा आसरा नाहीं मुलींना. पण आईजवळ सुद्धां असल्या नाजूक बाबतींत आपलं मन मोकळं करण्याचा हिय्या मुलींना होऊं नये, हें दुर्दैव नव्हे का खरोखरी?—ममीला मी न सांगतां समजलंय सगळं. फक्त माझ्या तोंडून तें बाहेर पडण्याची वाट पहाते आहे ती !

   

मी त्यांना आठवण दिली शपथेची.—आणि किती वरमले, दचकले ते एकदम ! त्यांनीं जवळ घेतली होती मला नेहमीप्रमाणं; न् तितक्यांत मी त्यांना आठवण दिली. त्याबरोबर माझ्या गळ्यांत असलेले त्यांचे हात आपोआप बाजूला झाले. फुलांचा हार आनंदानं गळ्यांत घालावा न् त्यांत विंचू निघून तो डसावा, तसं झालं त्यांना !—क्षणभर स्तब्ध होते ते अगदीं. पण मी पुन्हा विचारलं, पुन्हा छेडलं त्यांना. प्रथम ते थोडे घुटमळले. पण मग म्हणाले, "मला चांगली आठवण

आहे मी घेतलेल्या शपथेची! पण तुला हिंदु व्हावं लागेल माझ्याशीं लग्न करण्यापूर्वीं!"--"पण शपथ घेतांना कांहीं ही अट सुचली नव्हती तुम्हांला!"--मी म्हटलें. मला वाटलं, आपली भीति, पुरुष-स्वभावाविषयींचा आपला अंदाज खरा ठरला एकूण! मी बोललें; पण माझं मन खचल्यासारखं झालं. प्रणयभावनांचा सगळा फुलोरा झडून गेला त्या एका क्षणांत; न् ते समोर उभे असतांनाहि मी त्यांच्यापासून एकदम अगणित मैल दूर एकटी फेकून दिल्यासारखी वाटलें मला! डोळ्यांत अश्रु आले, पण ते बाहेर पडेनात; कंठांत हुंदका दाटला, पण तो बाहेर फुटेना. सगळं कसं गुदमरल्यासारखं झालं. पण बोलणं एकदां सुरू केलं होतं, तेव्हां तें पुरं करणं प्राप्तच होतं. ते सिगारेट ओढीत खिडकींतून बाहेर पहात होते. त्यांची ती त्रस्त, क्रुद्ध नजर! क्षणैक माझ्या मनांत शंका येऊन गेली, थोडया वेळापूर्वीं प्रीतीची सुधा वरसणारे हे डोळे! नाटकी होती का ती प्रणयदृष्टि? आणि ती जर नाटकी असेल, तर माझ्यापूर्वीं किती तरुणींची प्रतारणा केली असेल तिनं? वासनापूर्तीनंतर त्या दृष्टींतून उफाळलेल्या अंगारानं किती निष्कपट अबलांच्या जिवाची होरपळ केली असेल?

पण त्या दृष्टीला मी दृष्टि भिडवली आणि विचारलं!--मला कुठून धैर्य आलं कोण जाणें?--"नोंदणीनं लग्न नाहीं का करतां येणार आपल्याला? तिथं कुठं धर्माचा प्रश्न उद्भवतो? आपण दोघंही आपांपल्या धर्मांत राहून विवाहबद्ध होऊं शकतों तसं केल्यानं!" ते पुन्हा घोटाळले; चांगलेच घोटाळले या वेळीं. हातांतली जळती सिगारेट त्यांनीं फेंकून दिली; नवी पेटवली आणि ती पीत फेऱ्या घातल्या मुकाटयानं दोन तीन! आणि नंतर एकदम माझ्याकडे वळून उद्गारले, "तूं म्हणतेस तें खरं आहे, रोज? पण मला शक्य नाहीं तूं हिंदु होईपर्यंत तुझ्याशीं लग्न करणं!"--"पण का शक्य नाहीं?"--"माझ्या समाजांतील दर्जाचा, वजनाचा प्रश्न येतो तिथं!"--"हा

विचार शपथ घेतांना का नाहीं सुचला तुम्हांला ? तुम्ही आधीं शपथ घेतलीत; माझ्या गळ्यावर हात ठेवून तीन तीनदां सांगितलंत आणि मग—मग!"—पण माझ्यानं पुढं बोलवेना. आवरलेले अश्रु, दाबून धरलेला हुंदका—बाहेर पडले ते एकदम! त्यांचा नाटकीपणा, त्यांची अमानुषता पुरेपूर कळून चुकली. आपण फसलों या जाणिवेची सणक माझ्या रोमरोमांत उटली! पण उपाय नव्हता आतां. शकुंतलेच्या शापापेक्षांहि अधिक दारुण, अधिक दाहक प्रसंग होता हा. पण माझे सारे अश्रु मी आवरले आणि म्हणालें, "पपांना सारी हकिकत सांगून मग पहातें काय करायचं तें!"

"पपांना सारी हकिकत सांगणार? कशाला सांगणार? त्यांचा काय संबंध आहे यांत?"—"त्यांचा संबंध नाहीं तर कुणाचा आहे? तुम्ही अशा रीतीनं अडवून धरल्यावर, बोलल्याप्रमाणं वागायचं नाकारल्यावर मी त्यांच्याकडे धांव घ्यायची नाहीं, तर कुणाकडे जायचं?"—"खबरदार त्यांच्याशीं या बाबतींत एक शब्द बोललीस तर! मला बदनाम करायला पहातेस का? पण, लक्षांत ठेव, त्यांना जर तुझं हें वर्तन कळलं तर घराबाहेर काढून देतील ते तुला!—" "माझे पपा इतक्या क्रूरपणानं वागायला तुमच्यासारखे संभावित न् धर्मनिष्ठ नाहींत, मोहन! मी त्यांना सगळ्या गोष्टी सरळ न् स्पष्ट सांगणार आहें. मग त्यांना काय वाटेल तें करतील ते!—" हे माझे निर्वाणीचे शब्द कानांवर पडतांच थिजल्यासारखे झाले ते अगदीं; त्यांनीं निश्चल नजरेनं एकवार माझ्याकडे रोखून पाहिलं. कमालीची चीड न् भीति भरली होती त्या नजरेंत!—पण माझ्या नजरेला नजर भिडतांच त्यांची दृष्टि निवळली आणि एकदम माझ्या खांद्यावर हात ठेवून ते उद्गारले, "तूं मला माणसांतून उठवायचा निश्चय केला आहेस का, रोज? हें बघ तुला काय वाटेल तें घे माझ्यापासून;—पण पुन्हा असलं कांहीं बोलूं नकोस! तुझ्या सौंदर्याचा मोह पडल्या-

मुळंच असला हा अविचार घडला माझ्या हातून! पण तूं दया कर आतां माझ्यावर आणि आपण विसरून जाऊं या झालेल्या साऱ्या गोष्टी!"––"तुम्हांला संवय असेल असल्या गोष्टी करून त्या विसरण्याची. पण मला नाहीं. मोहन, तुम्ही आपल्या शपथेला जागलं पाहिजे!––" "पण, रोज, तूं आपल्या परिस्थितीचा नीट विचार करून पहा एकदां. आतां जो हा प्रकार घडला, त्यानंतर माझ्याविषयींचं तुझं पूर्वीचं प्रेम कायम रहाणं शक्य आहे का? माझा नाद सोडून देण्यांतच शहाणपणा आहे, हें विचारांतीं लक्षांत येईल तुझ्या! अद्याप कुणाला कांहीं माहित नाहीं. आपण विसरून जाऊं या एकमेकांना, रोज!"

किती क्रूर आणि भयंकर होती ती त्यांची सूचना! शेवटीं ते माझ्या पायां पडले आणि मला पुनः पुन्हा त्यांनीं विनवून सांगितलं कीं, "पपांजवळ यांतलं कांहीं एक तूं बोलूं नकोस!" माझ्या ऐवजीं तेच आतां भीतीनं गाय होऊन गेले होते अगदीं. त्यांच्या प्रत्येक वाक्यागणिक तिटकारा वाढत होता माझा. पपांशीं कांहीं न बोलण्याबद्दल ते वचन मागत होते मजकडून. पण मी कांहीं बोललें नाहीं आणि तशीच उठून अखेर परत आलें घरीं. एकदां वाटे, ममीला जाऊन सांगून टाकावं सगळं. पण धीर होईना. म्हणून कसेबसे दोन घांस खाऊन आपल्या खोलींत आलें, न् ही रोजनिशी बाहेर काढली. पवनारहून परत आल्यावर पहांटे पडलेलें तें चमत्कारिक स्वप्न! त्या स्वप्नाचा पडताळा शेवटीं आज अशा रीतीनं आला! शकुंतले, शकुंतले, दुर्वासानं तुला म्हणून जो शाप दिला, तो खरोखरी तुला एकटीला दिलेला नाहीं. जगांतल्या सगळ्या प्रणयवेड्या, अविचारी अबलांना तो शाप भोंवतो आहे अजून!

# प्रियदर्शन

"आजच्या 'लोकहितां'तली ती बातमी पाहिलीस का तूं, प्रिया?"

"हो. आज मी सेक्रेटरीएट्मधून परत आलों, त्याच वेळीं वाचितली. उमानं अगदीं वरतीच ठेवलं होतं त्याचं कात्रण काढून —"

"ती बातमी 'लोकहिता'ला कुणी पुरवली असावी असं वाटतं तुला?—"

"त्याची चौकशी करून कांहीं फायदा आहे का, माई?"

"असं का म्हणतोस तूं? आपल्याविरुद्ध कोण काय व्यूह रचतो आहे यावर गरुडासारखी नजर असली पाहिजे राजकारणी पुरुषांची! आपल्या विरोधकांच्या प्रत्येक हालचालीची बातमी काढण्यांत दद्दा किती दक्ष असत याची आठवण आहे ना तुला?—"

"पण माई, तें राजकारण निराळं आणि हें राजकारण निराळं! मी स्वतः जोंपर्यंत प्रामाणिकपणानं वागतोंय, तोंपर्यंत कोणाच्या कसल्याहि

कारस्थानाला भिण्याचं कारण नाहीं मला! काँग्रेसचं राजकारण हें सत्यावर अधिष्ठित झालेलं आहे; न् बापूंचा जोंपर्यंत माझ्यावर विश्वास आहे, तोंपर्यंत कोणाचीहि पर्वा करण्याची गरज नाहीं मला!—"

"तुझं हें म्हणणं बरोबर नाहीं, प्रिया! दादांच्या वेळच्या राजकारणांत आणि आजच्या राजकारणांत कितीहि फरक असला, तरी मनुष्यस्वभाव कांहीं बदललेला नाहीं. आणि व्यवहाराचा विचार हा मनुष्यस्वभाव लक्षांत घेऊनच करायचा असतो. गव्हर्नरसाहेबांचं जेवणाचं आमंत्रण तूं स्वीकारलंस ही गोष्ट तुझ्या मंत्रिमंडळांतल्या सहकाऱ्यांशिवाय बाहेर कोणालाहि माहित नाहीं. मग ही बातमी 'लोकहितां'त कशी आली? त्यांच्यापैकींच कोणी तरी फोडल्याशिवाय का ती आली आहे?—"

प्रियदर्शन कांहीं बोलला नाहीं. त्यानें हातांतल्या फाईलला पीन गुंडाळून ती बाजूला ठेवली.

प्रियवंदा पुढें म्हणाली—

"हें शेवटचं वाक्य किती खोडसाळपणाचं आहे हें वाचिलंस का तूं 'लोकहितां'तलं?—'मुख्य प्रधानांनीं ना. गव्हर्नरांचं हें भोजनाचं निमंत्रण स्वीकारल्याबद्दल असेंब्ली काँग्रेस पक्षाचे कांहीं सदस्य गांधीजीं-कडे तक्रार करणार आहेत, असें नक्की समजतें.'—हें वाक्य म्हणजे गांधीजींकडे या बाबतींत कुणी अद्याप कागाळी केलेली नसली, तर ती करण्याची सूचनाच आहे पर्यायानं!—"

"याच्या पुढची बातमी मी तुम्हांला सांगतों, माई! बापूंकडे तक्रार गेली आहे माझ्या विरुद्ध!—"

"मग तूं काय करणार आहेस आतां? जेवायला जायचं नाहीं असं ठरवलं आहेस?—"

प्रियंवदेनें 'लोकहिता'चा अंक एकदम टेबलावर टाकून त्याला सभय उत्कंठेनें विचारलें.

"तें काय म्हणून? जेवायला तर मी ठरल्याप्रमाणं जाणारच. मी आतांच बापूंना पत्र टाकलं.—माझ्या चुलत्यांचा न् ना. गव्हर्नरांचा स्नेह होता. त्या स्नेहाचं स्मरण देऊन त्यांनीं मला अगदीं वैयक्तिक नात्यानं जेवायचं आमंत्रण दिलं आणि पूर्वीचा ऋणानुबंध लक्षांत घेऊन मी त्याचा स्वीकार केला. मला त्यांत कांहीं गैरशिस्त वाटत नाहीं न् म्हणून माझ्या सहकाऱ्यांचा सल्ला घेण्याची गरज मला वाटली नाहीं. —असं लिहिलंय मी बापूंना!—"

"पण तुझं हें म्हणणं पटेल का त्यांना?"

"का पटूं नये? मी जें लिहिलंय तें सत्य आहे अगदीं. मला आज सकाळींच माझ्याविरुद्ध तक्रार गेल्याचं कळलं न् म्हणून मी लगेच पत्र लिहिलं बापूंना—"

"कुणी तक्रार केली तुझ्याविरुद्ध?—"

"ज्यांनीं 'लोकहिता'ला बातमी पुरवली, त्यांनींच तक्रारहि करवली—"

"वाजपेयींनीं केली?—"

"छे, ते स्वतः नाहीं कधीं असली गोष्ट करायचे! तक्रार गुलाबचंदजींनीं केली. प्रांताध्यक्षाचा मान आहे तो!—तो गदाधरजी कसा हिरावून घेतील?—"

प्रियवंदा स्तब्ध होती.

"पण असं चालायचंच, प्राई! त्यांत खेद किंवा नवल वाटून घेण्याजोगं कांहीं नाहीं. आपला हा प्रांत एकजिनसी, एकभाषी नाहीं, हें सर्वांत मोठं दुर्दैव आहे आपलं. ब्राह्मण-ब्राह्मणेतराच्या जोडीला

आणखी हिंदी-मराठी वाद येऊन बसला आहे आतां ! मला केव्हां केव्हां असं वाटतं अलिकडे कीं, हें मुख्य प्रधानपद सोडून देऊन महाराष्ट्राच्या एकीकरणाच्या चळवळीला वाहून घ्यावं स्वतःला—"

बोलतां बोलतां त्याचे डोळे विस्फारित झाले. तो खुर्चीवरून उठला आणि समोर बसलेल्या प्रियंवदेकडे निश्चल दृष्टीनें पहात उद्गारला—

"पण मला एकच मोह, एकच आकांक्षा हें अधिकारपद सोडूं देत नाहीं. गेल्या दोन महिन्यांच्या अनुभवानं ही गोष्ट मला कळून चुकली आहे कीं, माझ्या मस्तकावरला हा मुकुट रत्नांचा नाहीं, तर काटयांचा आहे. तरी सुद्धां तो मुकुट मस्तकावरून उतरून खालीं ठेवण्याची इच्छा मला एकाच मोहामुळें, एकाच आकांक्षेमुळें होत नाहीं. हातीं आलेल्या राज्याधिकाराचा उपयोग करून भावी पिढीला समर्थ बनवावं, हरिजनांना माणुसकीचे हक्क मिळवून द्यावे, शेतकऱ्यांच्या डोईवरला भार थोडा कमी करावा आणि कामगारांना पोटभर अन्न मिळण्याची सोय करावी, अशी तळमळ माझ्या मनाला सारखी लागली आहे. शाळा-कॉलेजांतून लष्करी शिक्षण सक्तीचं करायचं, हरिजनांना सर्व सार्वजनिक स्थळं मुक्तद्वार करायचीं, शेतसारा पंचवीस टक्क्यांनीं कमी करायचा आणि सर्व प्रकारच्या कारखान्यांतील कामगारांचं जीवन वेतन निश्चित ठरवायचं या चार सुधारणा आपल्या हातून घडाव्यात, शक्य तर वर्षाच्या आंत घडाव्यात, अशी आकांक्षा आहे माझी; न् ती सफल होईपर्यंत अधिकारपद सोडायचं नाहीं, असा विचार आहे माझा. या चार गोष्टी जर मी वर्षाच्या आंत करूं शकलों, तर माझ्या हातीं आलेल्या अधिकाराचं, मला लाभलेल्या या अद्वितीय संधीचं सार्थक झालं असं समजेन मी ! आणि राष्ट्रसभा आपल्या निवडणुकीच्या जाहिरनाम्याला जागली, हातीं सत्ता येतांच तिनं आपलीं वचनं अंमलांत आणलीं, हें प्रत्ययाला येईल लोकांच्या !—"

तो कदाचित् आणखीहि कांहीं वेळ बोलत राहिला असता. पण तितक्यांत कोपऱ्यांतील छोट्या टेबलावर ठेवलल्या टेलिफोनची घंटा खणखणली.

प्रियदर्शननें ताबडतोब पुढें होऊन रिसीव्हर हातांत घेतला.

"कोण? उत्तमराव? होय, मी स्वतःच बोलतों आहे.—गव्हर्नर-साहेबांकडे रात्रीं जेवायला जायचा माझा निश्चय कायम आहे.—काय पक्षाच्या सभेंत प्रश्न उपस्थित करणार आहेत? करूं देत! आणखी कांहीं?—पार्लमेंटरी कमिटीकडेहि तक्रार गेली का? अस्सं!—मी गव्हर्नरांकडे जेवायला गेल्यानं मला अपाय होईल असं जर वाज-पेयींना वाटत होतं, तर त्यांनीं स्वतःच तसं का नाहीं स्पष्ट सांगितलं मला? ते वडील आहेत. त्यांना हक्कच आहे माझी चूक दिसल्यास मला सल्लामसलत द्यायचा! तुमच्याकडून हा आडवळणानं निरोप कशाला?—मला त्यांना कांहींच कळवायचं नाहीं उलट. फक्त या निरोपाबद्दल माझे आभार पोंचवा त्यांना!—तें खरं, पण मी गैरशिस्त वर्तन करतोंय असं वाटत नाहीं मला.—पाहूं पक्षापुढं हें प्रकरण आल्यावर कसं तोंड द्यायचं तें!—

त्यानें हंसत हंसत उत्तर दिलें आणि रिसीव्हर खालीं ठेवला.

त्याची ती प्रसन्न पण किंचित् उग्र मुद्रा पाहून प्रियंवदेला वाटलें, हा जसजसा मोठा होतो आहे, तसतसें याच्या आणि सर महादेवांच्या चेहऱ्यांतलें साम्य सुस्पष्ट होत चाललें आहे. ते आवेशानें बोलत असतां त्यांच्या कपाळावरली शीर जशी फुगून ताठ होत असे, तशीच त्याच्याहि कपाळावरली शीर या वेळीं फुगली होती; व त्यांच्या चर्येवर जें एक करारीपणाचें तेज नेहमी विलसत असे, तें त्याच्याहि मुद्रेवर दिवसेंदिवस जास्त दिसूं लागलें होतें. सर महादेवांच्या आणि त्याच्या चेहऱ्यांत जर कोणता महत्त्वाचा फरक असेल, तर तो डोळ्यांच्या बाबतींत. सर महादेवांचे डोळे तेजस्वी खरेच, पण अत्यंत भेदक आणि

कठोरहि होते. उलट प्रियदर्शनच्या त्या विशाल नेत्रांत चंद्रकिरणांची कोमल द्युति सांठविलेली होती; व पुष्कळ वेळां त्यांत डोकावणारी आर्त अनवधानता पाहून असें वाटे की, कसल्या तरी गूढोदात्त कल्पनांच्या चिंतनांत त्याचें मन गढलेलें आहे.

कांतेचा मृत्यु ही प्रियदर्शनच्या आयुष्यांतील अत्यंत विदारक घटना ठरली. वणव्यानें होरपळून गेलेल्या एकाद्या पर्वताच्या शिखराचे काळेभोर सुळके उघडे पडावे, भोंवतालच्या हिरव्यागार मैदानामुळें त्याची ती उत्तुंगता उग्र भासावी आणि संध्येच्या सौम्य प्रकाशांत तेवढा त्या शिखराचा सांद्र नीलिमा उदात्त वाटावा, तशी अवस्था कांतेच्या मरणापासून एकाकी जीवन कंठीत असलेल्या प्रियदर्शनची झाली होती. सर महादेवांच्या मागून सहा वर्षांनीं उदराच्या विकारानें राधामोहनचा अंत झाला. त्यानें मरतांना प्रियदर्शनला आपल्या ल्हानग्या मुलाचा पालक नेमून सर्व कौटुंबिक जबाबदारी त्याच्यावर टाकल्यामुळें त्याला धंतोलीवरील आपला बंगला सोडून देऊन 'सागर व्हिला'-मध्यें येऊन रहावें लागलें. कांतेच्या आकस्मिक निधनाचा परिणाम राधामोहनवरहि झाल्याशिवाय राहिला नाहीं. गांधी–इर्विन करारानंतर प्रियदर्शन सुटून आल्यावर राधामोहननें त्याला 'सागर व्हिला'मध्यें येऊन राहण्याची सूचना केली; व राधामोहनपेक्षांहि प्रियंवदेनें त्याला वाटणारा प्रियदर्शनचा वचक लक्षांत घेऊन तेथें जाऊन राहण्याबद्दल प्रियदर्शनला फार आग्रह केला. पण, आपण दूर रहात आहोंत, तोंपर्यंतच राधामोहनला आपल्याविषयीं वाटणारा भीतियुक्त आदर कायम राहील, याची प्रियदर्शनला जाणीव होती. त्यामुळें दर शनिवारीं रात्रीं आणि सणावाराच्या दिवशीं एकत्र जेवण्यापलिकडे प्रियदर्शननें त्याच्याशीं आपला निकट संबंध येऊं दिला नाहीं. तथापि त्याच्या त्या दूरगत निःस्पृह सान्निध्याचाहि प्रभाव राधामोहनवर न कळत झालाच. त्याचीं व्यसनें कमी झालीं नाहींत, पण वाढलींहि नाहींत; व मालिनीला

त्याच्यापासून पूर्वी होणारा त्रासहि हळूहळू कमी होत गेला. त्याच्या आजाराच्या शेवटच्या दिवसांत प्रियदर्शन जो 'सागर व्हिला'मध्यें रहावयाला आला, तो कांहीं मग पुन्हा परत धंतोलीवर जाऊं शकला नाहीं. उलट राधामोहन वारल्यावर त्यानें प्रियंवदेचेंहि मन वळवून तिला 'सागर व्हिला'मध्यें मालिनीच्या सोबतीला रहावयास आणलें.

पण सर महादेव, कांता, विजया, यादवराव आणि राधामोहन यांचे एकामागून एक झालेले मृत्यु, जयसिंगाला झालेली पांच वर्षांची सक्त मजुरीची शिक्षा आणि 'सागर व्हिला'चा ताबा मिळविण्यासाठीं राधामोहननें केलेलीं अपकृत्यें या साऱ्या घटनांमुळें प्रियदर्शनचें मन संसाराला विटल्यासारखें झालें. राधामोहनप्रमाणें यादवरावांनींहि त्याला आपल्या कुटुंबाचा पालक नेमलें होतें. इतकेंच नव्हे, तर जयसिंग सुटून आल्यावर त्याला इंजिनिअरिंगचें शिक्षण घेण्यासाठीं विलायतेला पाठविण्याची जबाबदारीहि त्यांनीं प्रियदर्शनवर टाकली होती. यादवराव आणि राधामोहन यांच्या निधनामुळें त्याच्यावर पडलेल्या या दोन जबाबदाऱ्या!—कायदेभंगाच्या चळवळींत ठाकूर आणि कदम या दोन घराण्यांची जी वाताहत झाली, तिची सतत जाणीव देत असत त्या त्याच्या मनाला! त्याचा मूळचा मानी आणि मितभाषी स्वभाव त्यामुळें अधिकच अंतर्मुख, अधिकच अबोल झाला. त्याच्या भव्य कपाळावर पडलेल्या तीन आडव्या रेषा आणि कानांच्या बाजूंनीं पांढुरके होत गेलेले केंस एवढयाच काय त्या त्याच्या दुर्धर मनस्तापाच्या दोन खुणा त्याच्या शरीरावर दृग्गोचर होत असत.

त्याचें तें भयाण, एकाकी जीवन प्रियंवदेला पहावेना. तिनें त्याला वारंवार म्हणावें, "एवढ्या मोठ्या या बंगल्यांत तुला एकटयानं रहावतं कसं, प्रिया?"

त्यावर तो हंसून म्हणावयाचा, "एकटयानं कुठं रहातोंय मी, माई? उमा नाहीं का रहात इथं माझ्या बरोबर? शिवाय

नोकरचाकर आहेतच की !--"

"नोकरचाकर म्हणजे संसारांतले सोबती नव्हेत आपले ! आणि उमाची न् तुझी गाठ जेवतांना काय पडत असेल तेवढीच !--"

"मी तरी तेंच म्हणतों! ज्याचा अर्धा दिवस कोर्टात न् बाकीचा उरलेला निरनिराळ्या चळवळींच्या व्यापांत जाणार, त्याला संसार न् सोबती हवेत कशाला? त्यांतून विशेष कांहीं जिव्हाळ्याचं बोलावंसं वाटलं, तर तुम्ही न् उमा आहांतच !--"

पण असल्या उडवाउडवीच्या बोलण्यानें निरुत्तर आणि नाउमेद होण्याचा प्रियंवदेचा स्वभाव नव्हता. अखेर एक दिवस तिनें स्पष्टच त्याच्याजवळ लग्नाची गोष्ट काढली.

तेव्हां प्रियदर्शन हंसून तिला म्हणाला, "माई, मी वयाच्या पंचेचाळिसाव्या वर्षी हिमालयांत जाण्याचा विचार करतोंय? मग सात आठ वर्षांसाठीं लग्न कशाला करायचं?--"

"हिमालयांत जाण्याची भाषा महात्माजींसारख्या धर्मशील पुरुषाच्या तोंडीं शोभते. तूं सोशॅलिस्ट म्हणवतोस स्वतःला, प्रिया ! तुझ्या तोंडीं ही भाषा खास शोभत नाहीं !--"

"सोशॅलिस्टालाहि स्वतःचा असा एक धर्म असतोच. तुमच्या प्रचलित धर्मकल्पनांवर त्याचा विश्वास नसला म्हणून काय झालं? वाटल्यास या त्याच्या नवधर्माला तुम्ही मानवधर्म म्हणा ! आणि धर्म म्हटला, तत्त्वज्ञान म्हटलं कीं, त्यांच्या पाठोपाठ मनन आणि परिशीलन हें आलंच. तें करायला हिमालयाइतकी उदात्त आणि निवांत भूमि दुसरी कोणती सांपडणार आहे जगांत? प्राचीन उपनिषदांपासून तों स्वामी रामतीर्थांच्या अर्वाचीन आरण्यकांपर्यंत भारतांतलं सारं तत्त्वज्ञान या अत्युच्च तपोभूमीवर प्रकट झालं आहे. तेव्हां सध्यांच्या वाढत्या

काळाला अनुरूप असं राजनैतिक तत्त्वज्ञान निर्माण करण्याची ज्याला ईर्ष्या असेल, त्याला हिमालयाचा आश्रय केल्याविना गत्यंतर नाहीं!—"

प्रियदर्शननें स्मितपूर्वक दिलेल्या या निग्रही उत्तरानंतर पुन्हा त्याच्याजवळ लग्नाचा विषय प्रियंवदेनें काढला नाहीं.

सर महादेव ज्या वेळीं एखादें निश्चित विधान करीत, त्या वेळीं ते रागानें बोलल्यासारखे वाटत. उलट प्रियदर्शन आपला कोणताहि निश्चय नेहमी हंसत हंसत बोलून दाखवायचा! त्याच्या मुद्रेवर एरवीं सदैव दिसणारें गांभीर्य प्रतिपक्षाला मार्मिक उत्तरें देतांना किंवा स्वतःचा कठोर निर्धार व्यक्त करतांना अजिबात लुप्त होऊन त्याच्याऐवजीं स्मिताच्या सौम्य ऊर्मि त्याच्या मुखावर उसळत असत. स्वतःच्या निश्चयाचा खंबीरपणा स्मिताच्या माधुरीनें लपविण्याची त्याची ती कला प्रियंवदेनें पुरेपूर ओळखली होती.

म्हणून ना. उत्तमराव देशमुखांना हंसत हंसत उत्तर देऊन त्यानें जेव्हां रिसीव्हर खालीं ठेवला, तेव्हां ना. गव्हर्नरांकडील आज रात्रींच्या जेवणामुळें उत्पन्न होऊं घातलेल्या वादळाशीं झुंज देण्याची प्रियदर्शनची पूर्ण तयारी झाली आहे, हें तिला कळून चुकलें.

रिसीव्हर खालीं ठेवून तो पुन्हा तिच्याशीं बोलावयाला सुरवात करणार, तोंच उमाकांत आंत आला.

"तूं आजचीं कात्रणं पाहिलीस का सगळीं फायलींतली, प्रिया?—तुझा जेवायला जायचा विचार कायम आहे?—"

"हो. मी 'लोकहितां'तल्या बातमीचं कात्रण पाह्यलं. त्याच्याशिवाय आणखी कांहीं कात्रणं आहेत का फाइलींत?—"

"हो. राजाजींनीं मद्रासच्या गव्हर्नरबरोबर आगगाडींत लंच घेतला न् तीन तास त्यांच्या सलूनमधून प्रवास केला अशी जी बातमी

आजच्या 'हिंदू'त आली आहे, तिचं कात्रण मी मुद्दाम लावून ठेवलंय फाइलींत. तुला उपयोग करतां येईल त्याचा टीकाकारांना उत्तर देतांना—"

"छे! आत्मसमर्थनाची असली पद्धतच मुळीं मला मान्य नाहीं, उमा! राजाजींकडे बोट दाखवून स्वतःचा बचाव करण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं! मी जें केलं तें मला योग्य वाटलं म्हणूनच केलं, हेंच माझं समर्थन!—"

"राजाजी हे तुझ्या सहकाऱ्यांचं दैवत आहेत हें विसरूं नकोस तूं, प्रिया!—"

"त्यांचं दैवत असतील राजाजी! पण माझं नाहींत ना?—"

प्रियदर्शननें उमाकांताला सटकन उत्तर दिलें.

त्याचें तें उत्तर ऐकून प्रियंवदेला आठवण झाली, मद्रासी मुत्सद्द्यांच्या दांभिक वर्तनाविषयीं सर महादेवांना असाच तिटकारा होता! माजी गृहमंत्री ना. नायडू यांच्या खादीच्या पोशाखाविषयीं ते नेहमीं तुच्छतेनें बोलत असत.

कायदेभंगाच्या चळवळींत त्याच्या स्वभावांतील कठोरतेची एक बाजू तिच्या निदर्शनाला आली होती. ती त्याची कठोरता एका परीनें घराण्याच्या विध्वंसाला कारण झाली. पण ही कठोरता? या कठोरतेचे परिणाम अखेर काय होतील, असा विचार तिच्या मनाला एकदम डसून गेला.

मंत्रिमंडळांतील त्याचे सगळे सहकारी त्याच्यापेक्षां दहा पंधरा वर्षांनीं मोठे आणि राजकीय डावपेंचांत मुरलेले होते. त्याच्या नेतृत्वाखालीं काम करण्याचा प्रसंग आपल्यावर यावा, याचें साहजिकच त्यांना मोठें वैषम्य वाटे; व हिंदी—मराठी वादामुळें त्या वैषम्याला जी आणखी एक धार आली होती, ती निराळीच! मंत्रिमंडळांतील या वैषम्याचा परिणाम आपल्या धोरणावर आणि कारभारावर होणार, हें प्रिय-

दर्शनच्या ताबडतोब लक्षांत आलें. पण, गेल्या दोन महिन्यांत त्यानें आपल्या मनांत योजलेली प्रत्येक गोष्ट, त्यांचे डावपेंच हाणून पाडून, अत्यंत कणखरपणानें तडीस नेली होती. त्याची सारी भिस्त आपल्या चोख आणि निःस्वार्थी धोरणावर होती. शिवाय, महात्माजींचा आपल्यावर लोभ आहे, याहि गोष्टीचा त्याला आधार वाटे. महात्माजीं-प्रमाणेंच ना. गव्हर्नरसाहेबांचाहि त्याच्यावर लोभ होता. सर महादेव हे गृहमंत्री असतांना प्रथम नागपूरचे डे. कमिशनर म्हणून आणि नंतर प्रांतिक सरकारचे मुख्य कार्यवाह या नात्यानें त्यांनीं सरसाहेबांच्या हाता-खालीं काम केलें होतें; व त्यामुळें ना. गव्हर्नरांना त्यांच्या कर्तृत्वाविषयीं नितांत आदर होता. नवी राज्यघटना अंमलांत आणण्याची सुसंधि आपल्याला मिळावी आणि सर महादेवांचा लाडका पुतण्या हाच आपला लोकनियुक्त मुख्य प्रधान व्हावा, या योगायोगाचें त्यांना फार कौतुक वाटत असे; व प्रियदर्शनशीं जरी ते अतिशय जपून वागत असत, तरी एका खान्याच्या प्रसंगीं प्रियंवदेजवळ मात्र त्यांनीं आपलें हें कौतुक खुल्या दिलानें बोलून दाखविलें. गांधीजी आणि गव्हर्नर यांच्या या आत्मीयतेमुळें प्रियदर्शनच्या सहकाऱ्यांना त्याचा तेजोभंग करणें दुष्कर होऊन बसलें होतें.

गेल्या बुधवारीं मंत्रिमंडळाच्या साप्ताहिक बैठकीनंतर ना. गव्हर्नर यांनीं त्याला खाजगी रीतीनें जेवणाचें आमंत्रण दिलें; व त्याचा त्यानें तेथल्या तेथेंच स्वीकार केला. त्याच्या सहकाऱ्यांपैकीं कोणालाही गव्हर्नरसाहेबांनीं बोलावलें नाहीं.

प्रियदर्शननें आमंत्रण स्वीकारलें. आणि त्यानंतर त्याच दिवशीं दुपारीं सेक्रेटरिएटमधील त्याच्या खोलींत त्याचे सर्व सहकारी कांहीं कामानिमित्त एकत्र आले असतां त्यानें स्वतःच ती बातमी त्यांना सांगितली. पण त्यांची संमति किंवा सल्ला मात्र अवाक्षरानेंहि विचारला नाहीं.

त्यामुळें त्याच्या सहकाऱ्यांना आपला दुहेरी अपमान झाल्यासारखें वाटलें.

त्याचे सर्वांत ज्येष्ठ सहकारी आणि असेंब्लींतील कॉंग्रेस पक्षाचे उपनेते ना. पं. गदाधरजी वाजपेयी हे त्या वेळीं कांहीं बोलले नाहींत. पण मागाहून महसूलमंत्री ना. उत्तमराव देशमुख यांच्याजवळ त्यांनीं आपला तीव्र निषेध व्यक्त केला; व मुख्य प्रधानांचें हें कृत्य शिस्तभंगाच्या सदराखालीं येऊं शकेल, अशीहि भीति आपल्या पांढऱ्या सफेद जाड भुंवया शक्य तितक्या मोडून त्यांनीं प्रदर्शित केली.

प्रियदर्शन आणि उत्तमराव हे दोघे जवळ जवळ एकाच वयाचे होते. शिवणीच्या तुरुंगांत दोघांनीं एक वर्ष एकत्र काढलें होतें; व मंत्रिमंडळांतहि ते फक्त दोघेच काय ते महाराष्ट्रीय होते. त्या दोघांचा स्नेह लक्षांत घेऊनच वृद्ध गदाधरजींनीं आपला असंतोष उत्तमरावांजवळ प्रकट केला.

आपल्याशीं झालेलें हें त्यांचें बोलणें प्रथम उत्तमरावांनीं प्रियदर्शनला सांगितलें नाहीं. फक्त त्याचें हें कृत्य शिस्तभंगाच्या सदराखालीं येईल कीं काय, एवढीच शंका त्यांनीं बोलून दाखविली. पण, प्रियदर्शननें, ही अत्यंत खाजगी आणि वैयक्तिक बाब असल्यामुळें तिचा पक्षाशीं कांहीं संबंध नाहीं, असें उत्तर त्यांना दिलें; व त्यांनाहि तें पटलें.

परंतु शनिवारीं सकाळीं 'लोकहिता'च्या अंकांत ती बातमी थोडी विकृत स्वरूपांत प्रसिद्ध झाली; व त्यानंतर दुपारीं गदाधरजींनीं पुन्हा उत्तमरावांजवळ तो विषय काढून प्रियदर्शनच्या हातून शिस्तभंग होत असल्याचेंहि ध्वनित केलें. तेव्हां उत्तमरावांच्यानें राहवेना; व त्यांनीं सायंकाळीं फोनवर प्रियदर्शनला त्यांच्याशीं झालेलें आपलें संभाषण सविस्तर सांगितलें.

पण ना. गव्हर्नरांकडे जेवावयाला जाण्याचा प्रियदर्शनचा निश्चय कांहीं ढळला नाहीं.

मुख्य प्रधान झाल्यादिवसापासून त्याचा जो हा कणखर, हट्टी स्वभावविशेष झपाट्यानें अनुभवाला येत होता, त्याचें प्रियंवदेला केव्हां केव्हां अतिशय भय वाटे. तिला वाटे, सर महादेव हे आपल्या कारभाराच्या बाबतींत एका परीनें स्वतंत्र होते. कायदेमंडळांतील कोणत्याहि पक्षाच्या किंवा कायदेमंडळाबाहेरील कोणत्याहि संस्थेच्या वा व्यक्तीच्या तंत्रानें वागण्याची जबाबदारी त्यांच्यावर नव्हती. त्यामुळें त्यांचा एकतंत्री कारभार यशस्वी झाला; त्यांच्या कणखरपणाचें कौतुक सर्वांनीं केलें. पण प्रियदर्शन हा लोकनियुक्त मुख्य प्रधान आहे. कायदेमंडळांतील कॉंग्रेस पक्ष, कायदेमंडळाबाहेरील कॉंग्रेस संस्था आणि तिचे सूत्रधार या सर्वांचें वर्चस्व त्याच्यावर चालणार. अशा स्थितींत त्याचें हें कणखरपणानें, स्वतंत्रपणानें वागणें कितपत इष्ट होईल?

प्रियदर्शन ज्या दिवशीं अधिकारारूढ झाला, त्या दिवशीं प्रियंवदेच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. प्रांताची राज्यसत्ता 'सागर व्हिला'मध्यें दुसऱ्यांदा नांदावयाला आली आणि हा भाग्ययोग पहावयाला सर महादेव आज हयात नाहींत, या भावनेनें त्या अत्यंत आनंदाच्या प्रसंगींसुद्धां तिच्या डोळ्यांतून दुःखाश्रु गळले होते. अलिकडे तिला वारंवार असें वाटे कीं, दद्दा जर आज जिवंत असते, तर प्रियदर्शनच्या मानी आणि हट्टी स्वभावाला त्यांनीं खचित मर्यादेबाहेर जाऊं दिलें नसतें!

प्रियदर्शनच्या त्या तुटक उत्तरानें उमाकांत वरमून गप्प बसला. पण प्रियंवदा त्याला म्हणाली—

"राजाजी तुझं दैवत नसतील, प्रिया! पण उमानं जी बातमी मुद्दाम तुझ्या नजरेस आणून दिली, तिचा उपयोग करायला काय हरकत आहे?—"

"नाहीं माई, चुकतां तुम्ही! आपण जें कृत्य पूर्ण विचाराअंतीं करायचं ठरवतों, त्याच्या परिणामांची सर्व जबाबदारी आनंदानं

पत्करली पाहिजे आपण! दीड महिन्यापूर्वी अत्याचाराच्या आरोपाखालीं शिक्षा झालेले राजबंदी मुक्त करण्याचा प्रश्न जेव्हां मी उपस्थित केला, तेव्हां ही गोष्ट अहिंसेच्या तत्त्वाला सोडून होईल आणि म्हणून ती आपण करूं नये, असें मत गदाधरजींनीं प्रकट केलें. त्यानंतर गव्हर्नरसाहेबांचें मत मी आपल्या बाजूला वळवून घेतलें; त्या राजबंदींच्या मुक्ततेला मी त्यांची संमति मिळविली; व मग पुन्हा हा प्रश्न माझ्या सहकाऱ्यांपुढें आणला. तेव्हां गदाधरजींनीं मला विरोध केला. आणि वरती असेहि उद्गार काढले कीं, "अत्याचारी बंदींविषयीं तुम्हांला इतकी सहानुभूती का वाटते, याची आम्हांला जाणीव आहे!" जयसिंग आपली शिक्षा पूर्णपणें भोगून मी मुख्य प्रधान होण्याच्या सहा महिने आधीं सुटला, हें खरोखरीच माझं सुदैव! नाहीं तर त्याला सोडविण्यासाठींच मी हा प्रश्न उत्पन्न केला आहे, असं म्हणायला या माझ्या सहकाऱ्यांनीं कमी केलं नसतं! पण त्यांच्या या विरोधाला न जुमानतां मी सारे अत्याचारी राजबंदी सोडून दिले. गांधी–इर्विन करारानंतर स्वतः बापूंनीं भगतसिंगाला सोडविण्यासाठीं किती भगीरथ प्रयत्न केले, याची मला चांगली आठवण होती. पण माझ्या सहकाऱ्यांची समजूत घालण्यासाठीं एकदांहि उल्लेख केला नाहीं मी त्या खटपटीचा! आणि मी आपल्या प्रांतांतील अत्याचारी राजबंदींना सोडल्यावर आतां काकोरी कटाच्या खटल्यांतील राजबंदींना सोडण्याचा गोविंदवल्लभ पंतांचा संकल्प प्रसिद्ध झाला आहे! माझ्या स्वतःच्या धोरणाच्या बाबतींत मी कसलाहि पूर्वाधार हुडकणार नाहीं किंवा कोणाच्याहि संमतीसाठीं थांबणार नाहीं. राष्ट्रसभेच्या तत्त्वांशीं किंवा कार्यक्रमाशीं विसंगत नसलेली जी जी गोष्ट माझ्या विवेकबुद्धीला करावीशी वाटेल, ती ती मी स्वतःच्या जबाबदारीवर करणार आहे!–',

तो बोलण्याच्या ऐन भरांत असतां टेलीफोनची घंटा पुनश्च खणखणली.

उमाकांतानें झटकन उठून रिसीव्हर कानांशीं लावला आणि नंतर तो प्रियदर्शनच्या हातीं देत म्हटलें—

"मोहनला तुझ्याशीं बोलायचं आहे—"

प्रियदर्शननें रिसीव्हर हातांत घेऊन बोलावयाला सुरवात केली.

"होय, मीच बोलतोय तुझ्याशीं, मोहन.—जेवायला जाण्याचा माझा निश्चय कायम आहे.—तुझ्या या कळकळीच्या सल्ल्याबद्दल मी आभारी आहे तुझा फार! पण मी जें ठरवलंय, तें विचारांतींच ठरवलंय.—पण काँग्रेसच्या तत्त्वांना आणि शिस्तीला सोडून मी वागतोंय असं वाटत नाहीं मला; त्याला मी काय करूं?—गदाधरजींशीं मी कशाला बोलायचं आतां न् उपयोग तरी काय त्याचा? मी ज्या वेळीं त्यांना आमंत्रण स्वीकारल्याचं सांगितलं, तेव्हां ते एक शब्द नाहीं बोलले त्याबद्दल! त्यांनीं जर त्या वेळीं आपला मतभेद बोलून दाखवला असता, तर कदाचित् मी विचार केला असता त्यांच्या म्हणण्याचा! आतां शक्य नाहीं मला त्यांचा सल्ला घेणं किंवा आपला बेत बदलणं!—हो, 'लोकहितां'तली बातमी मी पाहिली. पक्षाच्या सभेंत ज्या वेळीं हा प्रश्न निघेल, त्या वेळीं पाहीन मी त्याला काय उत्तर द्यायचं तें!—"

हातांतला रिसीव्हर खालीं ठेवीत प्रियदर्शननें उमाकांताला म्हटलें, "उमा, एक टिपण तयार करून ठेव तूं या दोन तीन दिवसांत. पश्चिम वऱ्हाडांतल्या सात तालुक्यांत जी जादा सारावाढ आठ वर्षांपूर्वी झाली, ती रद्द करायचं ठरवलंय उत्तमरावांनीं; न् शिवाय सरसकट पंचवीस टक्के सारा सर्व प्रांतांत कमी करायचा विचार आहे आमचा. तर सेक्रेटरीएटच्या लायब्ररींतून जरूर ती सर्व पुस्तकं आणवून संदर्भाचं एक टिपण तयार कर. मला न् उत्तमरावांना माहिती हवी आहे ही नवं अंदाजपत्रक तयार होण्यापूर्वी— "

तो उमाकांताला हें सांगत असतांनाच गडबडीनें उच्चारलेले बोबडे शब्द त्याच्या कानांवर पडले.

"ताता, ताता, तुमी खलंच जाणाल आहांत काहो गव्हल्नल-कडे जेवायला आज? आमाला घेऊन चलाना आपल्या बलोबल!—"

ते गोड शब्द कानांवर पडतांच प्रियदर्शनच्या चेहऱ्यावरील उग्रता क्षणार्धांत मावळली आणि दुडुदुडु धांवत आपल्याला येऊन बिलगलेल्या त्या गोजिरवाण्या मुलाला मांडीवर घेऊन त्यानें म्हटलें—

"होय, अशोक. मी खरंच जेवायला जाणार आहे आज गव्हर्नरसाहेबांकडे. पण तुला बोलवायला विसरले ते! मग तूं आगंतुकच येणार का माझ्याबरोबर?—"

तो प्रश्न ऐकतांच चिमुकल्या अशोकच्या गोऱ्यापान उंच कपाळाला बारीक आंठ्या पडल्या; व क्षणभर कांहीं तरी विचार केल्यासारखें करून त्यानें विचारलें—

"तुमाला एकत्यालाच बोलावलं! मामाला नाई बोलावलं? आत्याला नाई बोलावलं? माईना नाई बोलावलं?—"

"नाहीं रे, माझ्याशिवाय कोणाला सुद्धां नाहीं बोलावलं त्यांनीं! मी एकटाच जाणार आहे. मग येणार का तूं आगंतुक?—"

"मग नाई येत मी तुमच्या बलोबल! मी मामाबलोबल जेवीन आज!—"

अशोकनें म्हटलें.

आणि लगेच तो प्रियदर्शनच्या मांडीवरून उतरून उमाकांता-जवळ गेला.

राधामोहनचा तो पांच वर्षांचा मुलगा म्हणजे प्रियदर्शनच्या होरपळलेल्या जिवाला विरंगुळा होता एक. सर महादेवांच्या तिसऱ्या वर्षश्राद्धाच्या दिवशीं त्याचा जन्म झाला होता; व म्हणून आजाचेंच नांव नातवाला ठेवावें, अशी प्रियंवदेची फार इच्छा होती. पण प्रियदर्शन

तुरुंगांतून सुटून येईपर्यंत राधामोहननें त्याचें नामकरण केलें नाहीं. प्रियदर्शन सुटून आल्यावर त्यानें 'अशोक' हें नांव मुलाला ठेवलें. राधामोहनला लग्नानंतर जवळ जवळ बारा वर्षांनीं झालेलें हें अपत्य. त्याच्या जन्मामुळें दुःखशोकाची अवकळा आलेल्या 'सागर व्हिला'मध्यें पुन्हा नवा आनंद, नवी आशा आली. अशोकला बापापेक्षां चुलत्याचाच लळा जास्त होता; व प्रियदर्शन 'सागर व्हिला'मध्यें रहावयाला आल्या-नंतर त्याची अभ्यासिका हीच अशोकची खेळावयाची जागा होऊन बसली. त्याला थोडें समजावयाला लागल्यापासून प्रियदर्शन त्याला आपल्याबरोबर सभा-समारंभांना घेऊन जात असे; व प्रियदर्शन मुख्य प्रधान झाल्यावर त्याची नवी सरकारी मोटार अशोकनें खास आपल्या दिमतीला घेतली होती!

अशोक जवळ येतांच उमाकांतानें पटदिशीं त्याला उचलून टेबलाजवळच्या फिरत्या खुर्चीवर बसविला.

त्याबरोबर प्रियंवदा हंसून म्हणाली, "एव्हांपासून सगळ्या संवयी लागल्या पाहिजेत त्याला! ठाकुरांच्या तिसऱ्या पिढींतला मुख्य प्रधान होणार आहे तो!—"

ती हें बोलत आहे, तोंच टेलिफोनची घंटा पुन्हा खणखणली—

तत्क्षणींच अशोक खुर्चीवरून गडबडीनें खालीं उतरला आणि उमाकांतानें उचललेला रिसीव्हर त्याच्या हातांतून घेण्यासाठीं धडपड करीत उद्गारला—

"मामा, मी बोलतों, मला बोलूं दे!—"

"अरे, तो ऐकायचा नाहीं, उमा! तूं त्याच्या हातांत रिसीव्हर दे जरा न् त्याला मांडीवर घेऊन पहा कोण बोलतंय तें—"

उमाकांतानें त्याप्रमाणें केल्यावर अशोकनें त्याला रिसीव्हर आपल्या कानांजवळ नेऊं दिला.

"ना. मिश्राजींचा फोन आहे, प्रिया!—"

उमाकांतानें किंचित् गंभीर होऊन म्हटलें.

मध्यप्रांतीय कायदेमंडळाचे अध्यक्ष ना. पं. गिरिजाशंकर मिश्रा यांचा फोन होता तो.

नंतर रिसीव्हरसकट अशोकची स्वारी प्रियदर्शनच्या मांडीवर येऊन बसल्यावर संभाषणाला सुरवात झाली.

"गदाधरजींच्या सूचनेवरून आपण बोलतां आहांत? मी आभारी आहे आपला.—माफी कसली करायची त्यांत? मी चुकत असेन, तर आपला अधिकारच आहे माझी चूक दाखवायचा!—होय. मलाहि कळलं पार्लमेंटरी कमिटीकडे तक्रार गेल्याचं! पण तक्रार कोणी केली? आपल्याला गदाधरजींनीं नांव सांगितलं नाहीं? हरकत नाहीं. कळेलच लवकर!— पण हें पहा मिश्राजी, आपल्याला जर गव्हर्नरांनीं खाजगी नात्यानं आमंत्रण दिलं असतं, तर आपण तें स्वीकारलं असतं कीं नाहीं?—आपण अध्यक्ष असल्यामुळं पक्षाचीं बंधनं नाहींत आपल्याला हें कबूल आहे मला. पण, मी मुख्य प्रधान असलों, तरी मला कांहीं खाजगी स्नेहसंबंध, वैयक्तिक ऋणानुबंध आहेत कीं नाहीं?—तसाच विचार करायचा तर गेल्या मार्चमध्यें ना. गव्हर्नरांना जेव्हां मी पहिल्यांदा भेटायला गेलों होतों, तेव्हां त्यांनीं दिलेलं संत्र्याचं सरबत-सुद्धां मी दिवाणगिरीबरोबरच नाकारायला हवं होतं, नाहीं का? मला वाटत नाहीं माझं हें कृत्य पक्षाच्या अधिकारकक्षेंत येतं असं!—छे, छे, आतां जायचा बेत रद्द करणं अशक्य आहे!—आपला फार आभारी आहे मी या कळकळीच्या सल्ल्याबद्दल आणि आपण गदाधरजींनाहि आभार कळवा माझे!"

त्यानें हातांतील रिसीव्हर खालीं ठेवला आणि उपरोधानें हसून म्हटलें—

"माझ्या हातून शिस्तभंग होणार म्हणून गदाधरजींना तळमळ लागलेली दिसतेय अगदीं! आतां फक्त बापूंकडून फोन करायचा शिल्लक ठेवलाय त्यांनीं मला! कदाचित् माझी जेवायला जायची वेळ होईपर्यंत वर्ध्याहून बापूंच्या वतीनं म्हणून फोन करवतील ते मला! उमा, तुला लक्ष ठेवलं पाहिजे आज आठ वाजेपर्यंत फोनवर!––"

"पण स्वतः प्रत्यक्ष कांहीं न बोलतां हें हस्तें परहस्तें सांगवण्यांत उद्देश काय आहे गदाधरजींचा?––"

"उद्देश? उद्देश अगदीं स्पष्ट आहे! पक्षाच्या सभेंत जेव्हां हा प्रश्न उपस्थित करण्यांत येईल, तेव्हां खुद्द असेंब्लीच्या अध्यक्षांची साक्ष काढतां येईल गदाधरजींना आपल्या बाजूनं! इतका वजनदार न् पक्षातीत साक्षीदार दुसरा कोण मिळणार आहे उभ्या प्रांतांत? मी जाणून बुजून शिस्तभंग केला हें सिद्ध करण्याची संगीन तयारी आहे ही!––"

प्रियदर्शननें हंसत हंसत म्हटलें.

"काँग्रेसचं राजकारण सत्यावर अधिष्ठित झालेलं आहे, असं तूं म्हणाला होतास ना मघांशीं, प्रिया?"

"होय. मी मघांशीं बोललों तें खरंच आहे, माई! गदाधरजीं-सारख्या माणसांच्या वर्तनाकडे बोट दाखवून तुम्ही राष्ट्रसभा न् तिचा महान् नेता यांचं सत्त्वहरण करूं शकणार नाहीं! राष्ट्रसभेच्या सत्याचं अधिष्ठान स्वतः बापू हे आहेत न् त्यांचं वर्तन हीच एक त्या सत्याची कसोटी समजली पाहिजे!"

# हस्तींचा घास

तो रडण्याचा आवाज ऐकतांच हातांतलें पुस्तक खालीं ठेवून वसंता धांवतच खालीं आला.

विठोबाच्या त्या जुनाट घराला जो पोटमाळा होता, त्यांत वसंतानें आपली अभ्यासिका थाटली होती. दक्षिणोत्तर बाजूंनीं उतरत्या होत गेलेल्या या माळ्याच्या पूर्वपश्चिम त्रिकोनी भिंतींना दोन लहान खिडक्या होत्या. त्यांतून येणारा वारा, दिसणारें आकाश आणि त्याहिपेक्षां तिथें मिळणारा एकांत हीं तिन्ही वसंताला अतिशय प्रिय होतीं. ऋतुमानाप्रमाणें माणसानें जसे कपडे बदलावे, त्याप्रमाणें उन्हाच्या बदलत्या दिशेनुसार तो आपली अभ्यासाची बैठक सकाळीं पूर्वेच्या तर संध्याकाळीं पश्चिमेच्या खिडकीजवळ नेत असे. एक शिंदीची चटई, देवदारूचा खोका उपडा घालून तयार केलेलें लिहिण्याचें मेज व प्रत्येक खिडकीजवळ लांकडाची एक फळी टाकून तिच्यावर व्यवस्थित

लावून ठेवलेलीं पुस्तकें एवढ्याच काय त्या ठळक वस्तु त्या अभ्यासिकेंत होत्या. भिंत अर्थातच मातीची होती; व सबंध घरावर ज्या वेळीं सफेतीचा कुंचला फिरत असे, त्याहि वेळीं हा माळा दक्षतेनें वगळला गेल्यामुळें, तिचे मूळचे रूपरंग आतां कांहीं ठिकाणचा गिलावा पडून अधिकच भेसूर झाले होते. अंगावरलें मांस झडून गेलेल्या माणसाच्या जशा बरगड्या दिसाव्यात, तशा गिलावा पडलेल्या ठिकाणच्या भिंतींतील कमचा दिसत असत; व छपरांतील फुटक्या कवलारांतून दुपारच्या वेळीं भिंतीवर पडणारे उन्हाचे कवडसे बघून काळ्या अंगावरील कोडाच्या डागांची आठवण होत असे. तरीसुद्धां त्या बेढब आणि भयाण भिंतीवर भगतसिंग आणि राजगुरु यांचीं रंगीत चित्रें, बायबलच्या परिक्षेंत प्रावीण्य दाखविल्याबद्दल मिळालेलें 'बाळकांत येशू' हें हृदयंगम चित्र व कापलेल्या पुठ्ठयावर सुबक रीतीनें चिकटविलेलें चिंतनमग्न चालत्या महात्माजींचें छायाचित्र हीं वसंतानें, आपण कुठेंहि बसलों तरी आपल्या दृष्टीस पडावींत व त्यांवर कोणत्याहि वेळीं प्रकाश पडावा अशा रीतीनें, लावलीं होतीं. त्या सबंध खोलींत जिला सामान म्हणतां येईल अशी बुधवार बाजारांत विकत घेतलेली जुनीच पण स्वच्छ ठेवलेली आरामखुर्ची एवढी एकच वस्तु होती. पण प्रतिष्ठित मनुष्याला बसावयाला देण्याजोगी तेवढीच एक खुर्ची घरांत आतां शिल्लक उरलेली असल्यामुळें माडीवरून विठोबाच्या बैठकीवर अशा तिच्या कितीतरी खेपा सदोदित होत असत.

वसंता खालीं स्वयंपाकघरांत आला, त्या वेळीं त्याचा आठ वर्षांचा धाकटा भाऊ मधु मोठमोठ्यानें रडत होता आणि आईचें जाजावणें तितक्याच जोरानें चाललें होतें.

वसंताला पहातांच जमिनीवर फतकल घालून बसलेला मधु आपल्या फाटक्या सदऱ्याच्या बाहीनें डोळे पुशीत पुढें आला आणि त्याला बिलगून म्हणाला--

"दादा, आई मला पैसे देत नाहीं 'तुकाराम' पाह्यला! आमच्या शाळेंतलीं सगळीं मुलं उद्यां दुपारचा खेळ बघायला जाणार आहेत न्. आई मला एक आणा देत नाहीं म्हणते—"

"तुला पैसे द्यायचे कुठून मेल्या 'तुकाराम' पाह्यला! तुझं नशीब जर धड असतं, तर तूं जन्माला आल्याबरोबर नोकरी कशाला गेली असती त्यांची! वनवास मेल्याचा! त्या दोन पोरी हूं का चूं न करतां सारा दिवस खस्ता उपसताहेत न् हा मेला ऐतखाऊ सिनेमाला जाण्या साठीं पैसे नाहीं दिले म्हणून रडतोय! पैशाचं झाड लागलंय जसं कांहीं अंगणांत प्राजक्तासारखं पहाटे ढोपलीभर पैसे गोळा करून आणून ते तुझ्या उरावर घालायला!—"

राधाबाई त्याच्यावर कडाडली. पण ती रागानें हे शब्द बोलत असतांनाच तिच्या पापण्यांवर आंसवांचे थेंब तरारले होते.

नेसू एक विटलेलें पण स्वच्छ पातळ, हातांत हिरव्या काळ्या रंगाच्या चार चार बांगड्या, उंच कपाळावर ठसठशीत कुंकवाचा टिळा आणि नीटनेटकेपणानें बांधलेला विपुल केसांचा सैल अंबाडा अशी राधाबाईची वेषभूषा होती. दारिद्र्य आणि काळजी यांनीं खंगलेल्या तिच्या शरीराला कुशींतील पांच सहा महिन्यांच्या गर्भाचा भार असह्य झाल्यामुळेंच कीं काय, तिच्या रोड हातावरल्या शिरा तणावे दिल्या-सारख्या वर आल्या होत्या; व गालहाडेंहि वर येऊन तिच्या त्या फिकट करुणपूर्ण चेहऱ्याला एक प्रकारचा मनांत अनुकंपा उत्पन्न करणारा भकासपणा आला होता.

आपल्या अंगाला येऊन बिलगलेल्या मधूच्या केसांवरून हात फिरवीत वसंतानें त्यास म्हटलें, "मधु, मीं देईन तुला एक आणा. तूं रडूं नकोस—"

"दादा, त्याला एकट्यालाच कां दाखवणार तूं सिनेमा? त्या

बिचाऱ्या पोरींनीं काय पाप केलंय? दिवसभर घरांतला राडा उपसायचा त्यांनीं न् सिनेमा पाह्यला मात्र हा आयतोबा!--"

"नाहीं ग आई! मी तुम्हांला सगळ्यांनाच दाखवणार आहे हा खेळ! उद्यां परवां माझे शिकवणीचे पैसे आले, म्हणजे आपण सगळींच जाऊं!--"

"तुझे शिकवणीचे पैसे अशा रीतीनं उडवून कसं चालेल दादा? त्या पैशांतूनच या खेपेस सोय करावी लागणार आहे माझी सगळी!--"

तिनें केविलवाण्या, ओशाळलेल्या नजरेनें त्याच्याकडे पहात म्हटलें.

आपलें बाळंतपण मुलाच्या शिकवणीच्या पैशानें करण्याची पाळी यावी, या कल्पनेनें ती अगदीं वरमून गेली होती.

"अजून पुष्कळ दिवस आहेत त्याला आई! एव्हांपासून कशाला त्याची काळजी? कांहीं झालं तरी हा खेळ आपण सर्वांनीं पाह्यचा बरं का ग किशे!--"

त्यानें चुलीपाशीं बसून भाकरीचें पीठ मळीत असलेल्या आपल्या पाठच्या बहिणीला म्हटलें.

"पण दादा, या मधूला दर आठवड्याला सिनेमा पाह्यला हवा! अगदींच कसं कळत नाहीं रे याला अजून?--"

कृष्णेनें मनगटानें आपल्या तोंडावर आलेले केंस मागें सारून त्याच्याकडे पहात म्हटलें.

"अग लहान आहे तो किशे अजून! वर्गांतलीं पोरं जातात सिनेमाला न् सिनेमाची गाडी जाते रोज दारावरून वाजत गाजत, त्यामुळं त्याला वाटतं जावंसं! तुझ्या माझ्या लहानपणीं इतकं प्रस्थ नव्हतं बोलपटांचं! नाहीं तर आपण सुद्धां असाच हट्ट धरला असता आईजवळ!--"

मधु हा वसंताचा सर्व भावंडांत फार लाडका होता. तो सात आठ महिन्यांचा असतांनाच संप होऊन विठोबाची नोकरी गेली; व त्याच्या पाठीवर झालेलीं दोन मुलेंहि वाचलीं नाहींत. त्यामुळें त्या दुहेरी दुःखानें पोळून निघालेल्या राधाबाईचा त्याच्यावर राग असे. उलट वसंताला असें वाटे कीं, आपलें बालपण जसें सुखांत गेलें, तसें मधूचें बालपण सुखांत जाणें जरी शक्य नसलें, तरी आपल्या दारिद्र्याची धग त्याला होतां होईल तों लागूं देऊं नये. तो स्वतः वयाच्या चवदाव्या वर्षापासून शिकवण्या करून पैसे मिळवीत होता; व हायस्कूल एन्ट्रन्स मध्यें त्याला मिळालेली शिष्यवृत्ति आणि त्याच्या दोन शिकवण्या यांच्यावरच खरोखरी आतां विठोबाचा संसार चालला होता. त्याचे वर्गशिक्षक सुशीलराव गायकवाड यांचा त्याच्यावर अतिशय लोभ होता. त्यांनीं त्याला एक शिकवणी लावून दिली होती; व इतरहि हर तऱ्हेची मदत त्यांच्याकडून त्याला होत असे. शिवाय मोहननें सिव्हिल लाइन्स मधील एका गुजराती आय. सी. एस्. च्या बायकोला मराठी आणि हिंदी शिकवण्याचें कामहि त्याला मिळवून दिलें होतें. वयाच्या चवदाव्या वर्षापासून त्याच्यावर संसाराचा भार पडल्यामुळें प्रतिकूल परिस्थितीशीं झगडण्याच्या प्रवृत्तीबरोबरच त्याच्या मनाला विशेष प्रकारची कोमलताहि आली होती; व त्यामुळें आपल्या भावंडांना सुखांत ठेवण्यासाठीं तो जीवापाड झटत असे. विठोबाकडे सकाळ संध्याकाळ येणाऱ्या खादीभक्तांचा आणि कम्युनिस्टांचा चहासिगारेटचा खर्च हाच मुळीं घरच्या अन्नखर्चापेक्षां जास्त होई! त्याचा परिणाम असा झाला होता कीं, वसंता इतके कष्ट करीत असूनहि घरांतली दधात कधीं संपत नसे.

"तूं म्हणतोस तें कांहीं खोटं नाहीं, दादा! परवां संध्याकाळीं हे घरीं नसतांना ते मुरलीमोहनजी आले होते. म्हणून हिनं पुढं होऊन त्यांना बसायला सांगितलं. तेव्हां त्यांनीं हिच्या अभ्यासाची विचारपूस

करून सहज हिला म्हटलं, "सदरमध्यें एक नवीन थेटर नुकतंच उघडलंय. तें अवण्यासारखं आहे. तूं वसंताबरोबर एकदां केव्हां तरी बंगल्यावर ये माझ्या! म्हणजे सिनेमाला जाऊं आपण!" तर ही आंत आल्यावर लगेच मला म्हणाली, "दादाबरोबर मी या रविवारीं बंगल्या-वर जाऊं का ग त्यांच्या?"--पण मी तिला झाडून टाकली. म्हणून गोष्ट काढली नाहीं ती तुझ्याजवळ तिनं! ते मोहन आपल्या उपयोगी पडत असले, तरी मला कांहीं नजर चांगली नाहीं वाटत त्यांची! पण ही झाली लगेच तयार सिनेमाला जायला त्यांच्याबरोबर!--"

"नाहीं ग आई! त्यांनीं कांहीं मला एकटीला बोलावलं नव्हतं. दादाबरोबर ये असं म्हणाले ते मला न् म्हणूनच तुला विचारलं मी!--"

कृष्णेनें भाकरी थापतां थापतां आईला उत्तर दिलें. तिच्या टपोऱ्या, अव्याज डोळ्यांत ओशाळगतीची आंसवें उभी राहिलीं.

"अग, त्यांनीं जर तुला एकटीलाच्च बोलावलं असतं, तर तें शोभलं असतं का त्यांच्या संभावितीला? गेल्या वैशाखांत पंधरावं वर्ष लागलं तुला! आतां कांहीं वाटेल त्याच्याबरोबर वाटेल तिथं जाऊन चालायचं नाहीं तुझं! बाकी दादा, ते मोहन वागायला कितीहि चांगले असले, तरी मला कांहीं ते आपल्याकडे आलेले आवडत नाहींत मुळींच!--"

"त्यांच्याशीं आपल्याला काय करायचंय, आई? अण्णासाहेबांचा काय मोठा लौकिक चांगला आहे! त्यांच्यापेक्षां मोहनना खास जास्त माणुसकी आहे! मी असं ठरवलंय, ते आपल्या उपयोगी पडतात ना, मग त्यांच्या उपकारांची होईल तितकी फेड आपण करीत असावं! पण वाजवीपेक्षां जास्त संबंध मात्र ठेवूं नये. त्यांनीं बोलावल्याशिवाय कधीं मी त्यांच्या बंगल्यावर जात नाहीं न् कामापलिकडे जास्त वेळ थांबत नाहीं.--आणि आई, मी यंदा मॅट्रिक झालों म्हणजे मग

कुणाचे उपकार घेण्याचा प्रश्नच उरत नाहीं मुळीं! गायकवाड मास्तरांनीं सांगितलंय मला कीं, तूं यंदा मॅट्रिक झाल्याबरोबर प्रिन्सिपॉलला सांगून तुला शाळेंत लावून देतों म्हणून—"

"तुझ्या त्या गायकवाड मास्तराची सुद्धां भीति वाटते मला! तूं त्यांच्याबरोबर त्यांच्या देवळांत जातोस हें कांहीं ठीक नाहीं, दादा! मतलबाशिवाय कोणी कुणाच्या उपयोगी पडत नाहीं जगांत!—"

"अग, मी त्यांच्या देवळांत जातों म्हणून काय ख्रिस्ती होणार आहे का आई? त्यांच्यामुळेंच तर गुप्तासाहेबांच्या सनीची शिकवणी मिळाली मला! किती चांगलीं आहेत ग तीं सगळीं माणसं!—"

"अरे, चांगलीं नसायला काय झालं? खंडीभर पैसा येतो आहे घरांत महिन्याच्या महिन्याला! त्यामुळं चांगुलपणा दाखवतां येतो त्यांना! तूं त्यांच्याकडे नेहमीं नेहमीं जातोस;–किती झालं तरी बाटगीं माणसं तीं!–मला कांहीं भरंवसा वाटत नाहीं त्यांचा!—"

"असं का म्हणतेस आई! अग, तीं माणसं ख्रिस्तीं असलीं, तरी धर्मापलिकडे कांहीं फरक नाहीं त्यांच्यांत न् आपल्यांत! सनीची आई बायबलइतक्याच भक्तीनं तुलसीरामायण वाचते रोज! मध्यें त्यांची कुठली एक लांबची मावशी आली होती, ती तर हिंदु आहे आपल्यासारखी! आणि रोजबाई मिराबाईचीं भजनं किती सुंदर म्हणतात! गुप्तासाहेबांना भारी शोक आहे भजनांचा! खरंच आई, मी रोजबाईना घरीं आणणार आहे एकदां आपल्या!—"

"नको बाबा. सध्यांच्या आपल्या या विलक्षण स्थितींत कुणालाहि घरीं बोलावूं नकोस तूं! वेळेनुसार साखरसुद्धां नसायची घरांत तिला चहा द्यायला! न् बाहेर पुन्हा वाटेल ते सोळभोक बसलेले असायचे! खरंच दादा, आतां येवढं कॉंग्रेसचं राज्य झालं तरीसुद्धां यांची नोकरी मिळूं नये का यांना पुन्हा?—"

"अग, कॉंग्रेसच्या राज्याचा न् बाबांच्या नोकरीचा संबंध काय ? ती काय सरकारी नोकरी आहे का ?—"

"असं कसं म्हणतोस तू दादा ? हे ठाकूरसाहेबांना भेटल्याबरोबर त्यांनी खटले काढून घेतले त्या चार नंबरच्या मिलमधल्या कामगारांवरले ! मग बाबांची नोकरी नाहीं का ते परत मिळवून देणार यांना ? —हे सगळ्या दुनियेसाठीं प्राण पाखडतील, पण स्वतःसाठीं एक शब्द निघायचा नाहीं कधीं यांच्या तोंडून ! त्यामुळं कॉंग्रेसचं राज्य होऊनसुद्धां आमचं नष्टचर्य मात्र कायमच राह्यलंय !—"

बोलतां बोलतां राधाबाईच्या डोळ्यांतलें पाणी गालांवर ओघळलें. तव्यावर टाकलेली भाकरी करपूं नये म्हणून चुलींतील लांकडें बाहेर ओढून कृष्णा तो संवाद उत्सुकतेनें ऐकत होती. स्वयंपाकघराच्या मधोमध तिपाईवर ठेवलेल्या कंदिलाचा प्रकाश भिंतीला ओठंगून बसलेल्या राधाबाईच्या तोंडावर पडला होता.

आपल्या डोळ्यांना आलेलें पाणी कृष्णेच्या ध्यानांत आल्याचें दिसतांच राधाबाई पदरानें डोळे टिपीत उद्गारली, "तुझं लक्ष नाहीं किरे, चुलीवरल्या भाकरीकडे ! नू लाकडं बाहेर ओढल्यामुळं सगळीकडे धूर झाला आहे !—"

"नाहीं ग आई, माझं लक्ष आहे भाकरीकडे ! म्हणूनच जाळ कमी केलाय मी !" कृष्णा लांकडें पुन्हा चुलींत सरसावीत म्हणाली. "खरंच दादा, बाबांची नोकरी कां नाहीं परत मिळूं त्यांना आतां ?—"

"ते खटले सरकारनं भरले होते, म्हणून काढून घेतां आले, किरे, ठाकूरसाहेबांना ! तसं कांहीं बाबांच्या नोकरीचं नाहीं ! ती सरकारी नोकरी थोडीच आहे ? शिवाय सात वर्षांपूर्वी गेलेल्या नोकरीचा प्रश्न आता कसा उकरून काढणार ?—"

"न काढायला काय झालं? सात वर्षांपूर्वी कायदेभंगाच्या चळवळींत ज्यांना दंड झाले, त्यांचे पैसे न् गेलेल्या जमिनी नाहीं का परत मिळाल्या त्यांना? मग यांची नोकरी यांना परत न मिळायला काय झालं? पण हे स्वतःबद्दल कांहीं बोलतील तर ना?—"

राधाबाई हें वैतागानें बोलत आहे, तोंच दाराशीं येऊन थांबलेल्या मोटारीचा आवाज झाला.

आणि विठोबा, अण्णासाहेब आणि काळे आंत आले.

"वशा, अरे दिवा न् पानदान आण पाहूं लवकर!—काय अण्णासाहेब चहा घ्यायचाय का थोडा? आज आपलं भाषण फार सुंदर झालं!—"

"पण तुमच्यावर कांहीं परिणाम झाला का त्याचा, विठोबाजी? असेंब्लीची बैठक पुढल्या आठवड्यांत सुरू होते आहे. त्या वेळेला कांहीं हालचाल करायची बुद्धि होते आहे का तुम्हाला? निदान एक दिवसाचा बैठा संप न् मिरवणूक तरी?—"

"नाही अण्णासाहेब, मार्चपर्यंत आपण अशीच चळवळ चालूं ठेवूं. त्यांना आपलीं आश्वासनं पुरीं करायला आपण वेळ दिला नाहीं, असं म्हणायला जागा देतां कामा नये आपण त्यांना! आजच्याच 'महाराष्ट्रां'त आलंय कीं, पश्चिम वऱ्हाडांतली जादा सारावाढ रद्द केल्याचं या बैठकींत अंदाजपत्रकावरील चर्चेच्या वेळीं जाहीर करण्यांत येईल म्हणून! शेतकऱ्यांच्या पाठोपाठ कामगारांचा प्रश्न हातीं घ्यावाच लागेल त्यांना! म्हणून जरा धीरानं वागलं पाहिजे आपण—"

"हेंच तर आवडत नाहीं तुमचं मला 'महाराष्ट्रां'तलं तें अंदाजपत्रकाबद्दलचं भाकित चुकीचं आहे अगदीं! वऱ्हाडांतल्या सारावाढींतली एक पै नाही कमी होत यंदा! न् कामगारांच्याहि तोंडाला पानं पुसलीं जाणार आहेत! तुम्हांला हें कळलं पाहिजे विठोबाजी, कीं एकदां हे दिवाण

नोकरशाहीच्या आहारीं गेले, म्हणजे कांहीं मिळायचं नाहीं त्यांच्या हातून आपल्याला! कालच्या 'लोकहितां'त वाचलं ना तुम्ही! स्वतःच्या बरोबरच्या दिवाणांना अवाक्षरानंहि न विचारतां किंवा पक्षाची संमति घेण्याची परवा न करतां प्रियदर्शन बेधडक गव्हर्नरकडे जेऊन आला!—"

"पण राजाजीहि जेवले मद्रासच्या गव्हर्नरबरोबर असं वाचलं मी 'महाराष्ट्रां'त!—"

"अहो, पण त्यांच्या जेवण्यांत न् याच्या जेवण्यांत जमीनअस्मानचा फरक आहे. गव्हर्नरनं याला एकट्यालाच मुद्दाम जेवायला म्हणून बोलावलं! उलट, राजाजी ज्या गाडीनं प्रवास करीत होते, त्याच गाडींत गव्हर्नर होता; त्यानं यांना गप्पा मारायला म्हणून आपल्या डब्यांत बोलावलं; त्यांच्या गप्पा चालू असतांनाच गव्हर्नरची जेवणाची वेळ झाली; न् त्यानं राजाजींना फार आग्रह केल्यामुळं ते शिष्टाचाराखातर त्याच्याबरोबर जेवले! तें कांहीं मुद्दाम जमवून आणलेलं जेवण नव्हतं आपल्या गव्हर्नरच्या जेवणासारखं! अहो, आपल्याकडल्या या जेवणाला राजकीय स्वरूप न् महत्त्व आहे! म्हणून मी आज त्याचा आपल्या भाषणांत उल्लेख केल्याबरोबर शेम शेमचे आवाज उठले सगळ्या बाजूंनीं! कॉंग्रेस असेंब्ली पक्षाच्या सभेंत जाब द्यावा लागणार आहे या जेवणाबद्दल प्रियदर्शनला!—"

वसंतानें आणून ठेवलेल्या पानदानांतील एक सुपारीचें खांड अण्णासाहेबांनीं अभिमानानें तोंडांत टाकलें; व आपल्या नेहरू शर्टच्या ढोळदार खिशांतून खादीचा रुमाल काढून गळ्याला आलेला घाम टिपला.

"पण त्यांत एवढं जाब विचारण्यासारखं काय आहे हें समजत नाहीं मला—"

विठोबानें सुपारी कातरतां कातरतां विचारलें.

" अहो, मी किंवा रुईकर जर उद्यां मिलच्या मॅनेजरकडे जेवायला गेलों; तर तुमच्या मनांत कांहीं तरी संशय येईल कीं नाहीं आमच्याबद्दल? तसंच आहे हें! शिवाय कॉंग्रेसनं जरी दिवाणगिऱ्यांवरला बहिष्कार उठवला असला, तरी सरकारी अधिकारी न् समारंभ यांच्यावरला सामाजिक बहिष्कार कांहीं उठवलेला नाहीं अजून! त्या दृष्टीनं प्रियदर्शनचं हें कृत्य शिस्तभंगाच्या सदरांत येतं!—"

" मग गुलाबचंद शेठजींनीं कांहीं कारवाई सुरू केली कीं नाहीं?—"

" ते कशाला घाई करतील उगाच! पक्षाच्या सभेंत हा काय खुलासा करतो याची वाट पहाताहेत ते!—"

" अण्णासाहेब, हें तुमचं म्हणणं कांहीं आपल्याला पटत नाहीं बुवा! गुलाबचंद गप्प बसला असला, तर तो लोभामुळं किंवा भयामुळं गप्प बसला असेल! मुख्य प्रधानाच्या वाटेला जाणं ही कांहीं सोपी गोष्ट नव्हे!—"

इतका वेळ स्वस्थ बसलेले काळे पानाच्या शिरा काढीत मध्येंच खंवचटपणानें बोलले.

त्यांच्या त्या खोंचदार शंकेमुळें अण्णासाहेबांचा चेहरा एकदम खाडदिशीं उतरला. पण लगेच ते त्वेषानें नाकपुडया फेंदारीत उद्गारले—

" मुख्य प्रधान! कसला आला आहे मुख्य प्रधान! हा काय पंत आहे, राजाजी आहे का खानसाहेब आहे याच्या मुख्य प्रधानकीमुळं लोकांनीं दबून जायला! हत्तिणीच्या सोंडेंत माळ द्यावी न् ती ज्याच्या गळ्यांत पडेल त्याला राजा बनवावं, तशा रीतीनं मुख्य प्रधान झाला आहे हा! तुम्हांला माहित नाहीं काळे! असले दहा मुख्य प्रधान गुंडाळून ठेवील गुलाबचंद!—"

" अहो, तें सारं खरं अण्णासाहेब! गुलाबचंदाच्या पाताळयंत्रीपणाविषयीं मुळींच शंका नाहीं मला! पण सध्यां तो जरा नाजूक पेंचांत

सांपडला असल्याची वदंता आहे सगळीकडे!—"

"कसला पेंच?—"

विठोबानें उत्सुकतेनें विचारलें.

"अहो, त्यांनीं न् वाजपेयींनीं मिळून त्या सरकारी खाणींच्या ठेक्यांत दहा हजार रुपये हबकल्याची दाट वदंता आहे! ती 'हिंदुस्थान लिमिटेड' म्हणून नवीन कंपनी निघाली आहे ना! तिच्यामार्फत व्यवहार झाला म्हणतात हा सगळा! आपला मोहन मॅनेजिंग डायरेक्टर आहे त्या कंपनीचा!—"

"अण्णासाहेबहि एक डायरेक्टर आहेत त्या कंपनीचे! मोहनच सांगत होते मला परवां! आमच्या वशाला नोकरी देणार आहेत त्या कंपनीत ते?—"

विठोबाच्या तोंडून ही माहिती बाहेर पडतांच अगदीं आश्चर्यानें थक्क झाल्यासारखा चेहरा करून काळे नरमाईनें म्हणाले—

"असं का! आपल्याला नव्हतं बुवा हें माहित! माफ करा हं अण्णासाहेब! कांहीं चुकून तोंडून निघून गेलं असलं तर!—"

अण्णासाहेबांच्या कपाळावर उठलेली घर्मबिंदूंची ओळ आणि त्यांचा उतरलेला चेहरा काळ्यांच्या तीक्ष्ण नजरेंतून सुटला नाहीं; व चुना लावलेल्या पानावर कात टाकीत ते खालच्या मानेनें म्हणाले—

"आम्ही काय आपलं कानांवर आलं तें बोललों! मग काय विठोबाजी, चहा बोलावतां कीं पान खायचं आम्ही?"

त्याबरोबर अण्णासाहेब उद्गारले, "ही काय चहाची वेळ आहे का, काळे? शिवाय आज उकाड्यानं प्राण चालला आहे अगदीं! बाकी काळे, तुम्ही गप्पा तर खूप सुनावतां एक एक! अहो, मी ज्या कंपनीचा डायरेक्टर आहे, तिच्याविषयीं तुम्ही मला माहिती पुरवायची हें धाडस कांहीं और आहे तुमचं! गदाधरजींच्याबद्दल आतां जें तुम्ही बोललांत,

त्याबद्दल बदनामीची फिर्याद होऊं शकेल तुमच्यावर, याची जाणीव आहे का तुम्हांला!—"

"हें पहा अण्णासाहेब, मला कांहीं कल्पना नव्हती तुम्ही डायरेक्टर आहांत त्या कंपनीचे याची! मी आपलं जें कानांवर आलं तें बोललों—"

"अहो, कानांवर काय आलं न् बोललांत काय? उद्यां मी दहा हजार रुपये खाल्ले असं सुद्धां कानांवर येईल तुमच्या! तुमच्याबरोबर एका बैठकींत बसणं हें धोक्याचं होणार असं दिसतं!—"

अण्णासाहेब रागारागानें उठत म्हणाले.

"काय निघालांत इतक्या लवकर? मग चहा नाहीं का घेत?—'

"छे, छे, आठ वाजायला आले आतां! या आठवड्यांत जरा जास्त काम आहे माझ्या मागं!—"

ते त्यांच्यासमोर लीनतेनें उभ्या राहिलेल्या विठोबाकडे न बघतां तडक बाहेर पडले.

"काय काळे, हा काय प्रकार आहे खरोखरी?"

"तें मी कसं सांगूं विठोबाजी?" काळे साळसूदपणानें म्हणाले. "मी खरोखरीच माझ्या कानांवर आलं तें बोललों. अण्णासाहेब इतके रागावतील अशी कल्पना नव्हती मला!—"

"आज सकाळीं शेळक्यांनीं सांगितली ही बातमी मला प्रथम. पण मला ती खरी नाहीं वाटली त्या वेळीं—"

"म्हणजे आतां खरी वाटली कीं काय?—"

पानदानांतली एक विडी उचलून ती शिलगावीत काळे उद्गारले.

"छे हो! खरी कशी वाटेल? मोहन न् अण्णासाहेब यांच्यासारखीं आपलीं माणसं ज्या कंपनींत आहेत, तिच्याबद्दलच्या असल्या

कंडया खऱ्या कोण मानील? न् दहा हजार रुपये खाल्लेले पचतील तरी कसे?"

"पचतील कसे हें विचारूं नका, विठोबाजी! अहो, दिवाणा-सारखा बडा माणूस जेव्हां पैसे खाणार, तेव्हां ते हजारांनीं न् लाखांनींच खाणार! हत्तीचा घास हा त्याच्या आकाराला शोभेसाच असायचा! खाल्ले कसे हें जर विचाराल, तर त्याला मात्र कांहीं अर्थ आहे! आजपर्यंत त्या खाणींचा ठेका ज्या भावानं विकला जात असे, त्याच्या-पेक्षां पांच हजार रुपये कमी भावानं तो विकला गेल्यामुळं उघडकीला आला म्हणतात सारा प्रकार! आणि तो ठेका विकला कोणाला म्हणाल तर वऱ्हाडच्या हरिजन संघाचे अध्यक्ष शेठ राधाकिसनजी यांना!—"

"काय म्हणतां काय तुम्ही, काळे?"

"अहो, मी नाहीं म्हणत, विठोबाजी! सगळं गांव म्हणतंय! माझं कशाला नांव घेतां उगाच? असेंब्लीकडे प्रश्न सुद्धां गेले आहेत! त्या गिरिजाशंकरनं ते नामंजूर मात्र करतां कामा नयेत! म्हणजे काय खरोखरी घडलं असेल तें येतं बघा चव्हाट्यावर! गेल्या दोन चळवळींत या खादीवाल्यांनीं जे काय स्वार्थत्याग केले असतील, त्यांची ही दामदु-प्पटीनं भरपाई केली जाते आहे असं समजा तुम्ही आतां!—"

"काय खरोखरी प्रकार असेल हरि जाणें! आपण तर अगदीं सुन्न होऊन गेलों तुम्ही सांगितलेली सारी हकिकत ऐकून! असेंब्लीपर्यंत गेलं म्हणतां हें प्रकरण? बाकी त्यांतहि कांहीं नवल नाहीं! शेळक्यांनीं तर असंहि सांगितलं सकाळीं कीं, मुख्य प्रधानांकडे या प्रकाराबद्दल तक्रार गेली असून, त्यांनीं सी. आय. डी. ला चौकशी करण्याचा हुकूम सोडला आहे!—"

"मी तुम्हांला आणखी एक बातमी सांगतों, बिठोबाजी! वाजपेयींच्या पुढच्या सगळ्या केसेस अण्णासाहेबांकडे येत असतात

आपल्या! त्यामुळंच काम वाढलंय अलिकडे त्यांचं!—"

विठोबा अगदीं स्तब्ध होता.

कांहीं वेळानें तो झोंपेंतून दचकून उठून बोलावें त्याप्रमाणें एकदम उद्गारला—

"छे! आपला नाहीं बुवा विश्वास बसत या गांवगप्पांवर!—"

"माझाहि नाहीं बसत, विठोबाजी!—"

काळे विडीचा एक दमदार झुरका घेऊन विठोबाला साथ देते झाले.

पण हे उद्गार काढतांना त्या दोघांनीहि एकमेकांच्या नजरेला नजर देण्याचें टाळलें.

# पाकळ्या झडून गेलेलें फूल

परवां मी मोहनना पुन्हा विचारलं. तेव्हां तूं हिंदु झाल्याशिवाय तुझ्याशीं लग्न करणं मला शक्य नाहीं, असं उत्तर दिलं त्यांनीं मला. त्यांच्या त्या दांभिक हट्टी उत्तराची चीड आली मला. आणि मी लगेच त्यांना म्हणालें, "हिंदु झाल्याशिवाय तुमच्याशीं लग्न करण्याचा निश्चय केलाय मी!" ते बोलले नाहींत कांहीं यावर. पण त्यांनीं ज्या क्रुद्ध, द्वेषपूर्ण नजरेनं माझ्याकडे बघितलं, ती विसरणार नाहीं मी कधीं. त्यांची ही अट जर प्रामाणिकपणाची असती, तर मी कदाचित् विचार केला असता हिंदु व्हायचं कीं नाहीं याचा. पण, मला जाणीव आहे, केवळ अडवायचं म्हणून, लग्न कायमचं टाळतां आलं तर टाळावं म्हणून अट घालताहेत ते ही! जुन्या काळच्या राजकन्या स्वयंवराच्या वेळीं पण लावीत असत. तो पण लावण्यांत पुष्कळदां लग्न करण्यापेक्षां मोडण्याचाच हेतु जास्त असे. तसा हा यांचा पण आहे. पण तो

मोडूनच लग्न करावं लागणार आहे मला त्यांच्याशीं!

मी हिंदु होण्याबद्दलचा त्यांच्या हा हट्ट दांभिक आहे अगदीं. आम्ही धर्मानं ख्रिस्ती असलों, तरी संस्कृतीनं हिंदु आहोंत, याचा पूर्ण अनुभव घेतला आहे त्यांनीं गेल्या सहा महिन्यांत. गेल्याच रामनवमीच्या रात्रीं ममीनं गाइलेलीं तुलसीरामायणांतलीं भजनं!—— इतकीं भावमधुर भजनं हिंदु घरांत कधींहि ऐकलीं नसतील त्यांनीं! त्याच रात्रीं आम्ही प्रथम बोललों; नव्हे, तेव्हांपासून नंतर कितीदां तरी बोललों कीं, सीलोनांत किंवा जपानांत जशीं ख्रिस्ती बायको आणि बौद्ध नवरा हीं एका कुटुंबांत आपआपला धर्म न बदलतां राहूं शकतात, तसं हिंदुस्थानांत का होऊं नये? अनेक धर्मांचं आश्रयस्थान असलेली ही भरतभूमि!—— हिच्या कुशींतून खरंखुरं हिंदी राष्ट्र जर निर्माण व्हायचं असेल, खरीखुरी भारतीय संस्कृती जर उत्पन्न व्हायची असेल, तर हिंदु, मुस्लिम आणि ख्रिस्ती या तिन्ही धर्मांच्या माणसांनीं आपआपला धर्म न सोडतां एका कुटुंबांत नांदायला शिकलं पाहिजे; कमल, अर्धचंद्र, आणि क्रॉस यांनीं एकमेकांची शोभा वाढवीत एका निशाणावर झळकायला शिकलं पाहिजे. चीनमध्यें, जपानमध्यें, सीलोनमध्यें जर धर्मत्याग करायला न लागतां भिन्न धर्मांच्या स्त्रीपुरुषांचे विवाह आणि संसार होतात, तर ते हिंदुस्थानांत का होऊं नयेत? रामनवमीच्या त्या रमणीय चांदण्यांत ममीच्या भजनानंतर झालेलं हें बोलणं—तें सुद्धां स्वप्नच होतं का एक?

तें स्वप्न!—त्या स्वप्नाच्या उदात्ततेनें मोहित झाल्यामुळंच मी त्यांच्या प्रणययाचनेचा स्वीकार केला ना? आणि त्यांनीं माझ्या गळ्यावर हात ठेवून घेतलेली शपथ खरी मानली ना? तें चांदण्यांतलं बोलणं, ती प्रणयपूर्तीच्या ऐन घडीला घेतलेली शपथ आणि आतां घातलेली ही हिंदु होण्याची अट!——काय म्हणायचं या वर्तनाला? आणि तरी हे स्वतःला साम्यवादी म्हणवतात! माणसांचीं मतं हा, मला वाटतं, त्यांच्या मनाचा पोषाख असावा; न् अंगावरले कपडे जसे आपण सोयीप्रमाणं

बदलतों, तसाच हा मनाचा पेहरावहि सोयीप्रमाणं बदलण्याचा शिष्टाचार असावा.---मला राग आला, चीड आली, ती या फसवणुकीची. ज्यांचा धर्मावर विश्वास नाहीं, विवाहसंस्था ही ज्यांना जुनाट न् जुलमी वाटते, अनिर्बंध प्रीतीचे जे अहर्निश पोवाडे गातात, त्यांनीं मी हिंदु होण्याचा हट्ट धरावा यापरता ढोंगीपणा तो कोणता?---मला हिंदु होणं कठीण नाहीं. कारण सामाजिक दृष्टीनं, सांस्कृतिक दृष्टीनं हिंदूच आहोंत आम्ही. माझ्या ममीचं आजोळ हिंदु आहे; न् त्यामुळें हिंदुत्वाचे सारे संस्कार आणि ऋणानुबंध कायम आहेत आमच्या घरांत.—पण मी हिंदु काय म्हणून व्हायचं? आपली स्वतःच्या धर्मावर, खरोखरी कोणत्याच धर्मावर श्रद्धा नाहीं, हें हजारदां सांगितलंय त्यांनीं मला. पण माझी स्वतःच्या धर्मावर श्रद्धा आहे. त्यांनीं दिलेलीं साम्यवादावरलीं पुस्तकं वाचून सुद्धां ती श्रद्धा डळमळलेली नाहीं. तेव्हां जो धर्म मला अत्यंत प्रिय आहे, तो मी कां सोडायचा? आमच्या लग्नाच्या आड धर्मभेद येत नाहीं; त्यांचा स्वभावधर्म, त्यांचे निरंकुश मनोधर्म येत आहेत. जिला ते अनिर्बंध प्रीति म्हणतात, ती खरोखरी त्यांची बंधातीत राहूं इच्छिणारी भोगलालसा आहे. ती आड येते आहे आमच्या लग्नाच्या!

त्यांना माझा केव्हां केव्हां अतिशय संताप येतो. मी लग्नाचा विषय काढतांच त्यांना चीड येते. तरीसुद्धां रोज संध्याकाळीं मला फिरायला न्यायला येण्यासाठीं ते चुकत नाहींत. आणि मीहि त्यांच्याबरोबर मुकाट्यानं जातें. मी एकटी असतें, तेव्हां गेल्या दोन महिन्यांतल्या सगळ्या प्रकारांचा विचार केला, म्हणजे शिसारी येते त्यांची मला; पुन्हा तोंड पाहूं नये त्यांचं असं वाटतं. पण संध्याकाळीं त्यांची गाडी दारांत येऊन उभी राहिली, ते मला नेण्यासाठीं माझ्या खोलींत आले, म्हणजे मुकाट्यानं बाहेर पडतें मी त्यांच्याबरोबर! ममीचे नाराज डोळे!—त्यांची नाराजी मनावर घ्यावीशी वाटत नाहीं मला त्या वेळीं. असं कां होतं? त्यांच्याविषयींच्या माझ्या मनांतल्या सगळ्या कोमल भावना

झडून जळून गेल्या आहेत ना? मग मला त्यांच्याबरोबर जावंसं का वाटतं? भावनांचे कोणते अगम्य लागेबांधे मला त्यांच्याकडे ओढून नेतात? आणि मी त्यांना इतकं टाकून बोललें असतां ते तरी माझ्या-कडे का येतात पुनःपुन्हा? खरोखरी त्यांच्या भोगलोलुप दृष्टीनं पाह्यलं तर मी म्हणजे आतां एक निव्वळ मनसोक्त वास घेऊन कुस्क-रलेलं फूल आहे!—तें फूल त्यांना पुनःपुन्हा हातांत घ्यावंसं का वाटावं? आम्ही दोघंहि एकमेकांवर रागावतों, चिडतों; पण फक्त लग्नाचा प्रश्न निघाल्यावर! इतर वेळीं आम्हांला एकत्र पाहणारांना शंकाहि यायची नाहीं कीं, आम्ही एकमेकांचा केव्हां केव्हां अत्यंत द्वेष करित असूं! जॉननं झिडकारलेल्या हेरोदियानं आपल्या नृत्यावर खूष झालेल्या पित्याजवळ जॉनच्या मस्तकाचा मोबदला मागितला. पण मारेकऱ्यांनीं तें मस्तक जेव्हां तबकांत घालून तिच्यापुढें आणून ठेवलं, तेव्हां सूडाची इच्छा तृप्त झालेल्या त्या प्रेमिकेनं अश्रूंनीं स्नान घातलं त्याला! आम्हांला एकमेकांविषयीं केव्हां केव्हां जो अतिशय द्वेष वाटतो, तो अशाच तऱ्हेचा नाहीं का?

खरोखरी हा काय प्रकार आहे? एकमेकांविषयीं आम्हांला केव्हां केव्हां इतका द्वेष वाटतो, एकमेकांचा इतका तिटकारा येतो कीं, त्या क्षणाला आमचे सगळे संबंध तुटले असंच वाटतं!—पण पुन्हा संध्या-काळीं!—असं कां होतं? एकमेकांच्या डोळ्यांत पाणी आणल्यानंतर, विषापेक्षां जहरी शब्द एकमेकांना बोलल्यानंतर पुन्हा एकमेकांविषयीं इतकी आसक्ति कशी वाटते? हा प्रेम कीं मोह? कोणताही मधुर रस जळून उकळून गेल्यावर नंतर खालीं शेवटीं जें शिल्लक उरतं, त्याची साखर बनते! गेल्या दोन महिन्यांत आम्ही एकमेकांना बोललेले दुःशब्द आणि गाळलेले अश्रु!—त्यानंतर अजून जें हें आकर्षण, जी ही आत्मी-यता शिल्लक उरली आहे, तिला काय म्हणायचं? नदीचं पात्र आटून निखालस कोरडं पडल्यावर सुद्धां कुठंहि कोपरभर खणलं असतां स्वच्छ

पाणी हाताला लागतं. तसं तर होत नसेल ना एकमेकांच्या सान्निध्यांत आल्यावर आमच्या वठून गेलेल्या प्रणयभावनेचं? काय होतं कुणाला ठाऊक! पण एकमेकांविषयींची आसक्ति, एकमेकांच्या सहवासाविषयींची आतुरता आणि अतृप्ति ही आमच्या दोघांच्याहि हृदयांतून अन् शरीरांतून अद्याप पुरती गेलेली, मेलेली नाहीं. ती आसक्ति, ती आतुरता आणि अतृप्ति–ती पुन्हा खेचून आणते आम्हांला एकमेकांकडे! ते मला म्हणाले सुद्धां होते एकदां कीं, इतकं एकमेकांना टाकून बोलल्यानंतर, इतकीं एकमेकांविषयीं मनं विटल्यानंतर आतां या लग्नापासून कोणालाच सुख व्हायचं नाहीं. त्या क्षणीं तें खरंहि वाटलं मला.— पण मग—मग या आसक्तीचा अर्थ काय करायचा?

त्यांच्याविषयीं अद्याप वाटणाऱ्या या आसक्तीमुळं, या आत्मीयतेमुळंच या प्रकाराबद्दल ममीजवळ किंवा पपांजवळ बोलण्याचा हिय्या मला होत नाहीं. असं वाटतं कीं, ते इतके चंचल, इतके वंचक न् इतके मायावी आहेत हें मला एकटीला कळलंय तेवढं पुरे. पपांना न् ममीला तें कळायला नको. त्यांचे जावई व्हायचे आहेत ते! आपल्या भाबड्या न् उल्लू मुलीला एका संभावित बदमाषाच्या गळ्यांत पडावं लागलं असं वाटण्याचा प्रसंग त्यांच्यावर यायला नको! त्यांचं खरं स्वरूप कळल्यामुळं माझ्या जीवनाला जो काय कडवटपणा आला आहे तेवढा पुरे. आमचं सगळं कौटुंबिक जीवन आणखी कडवट होऊन जायला नको! ममीनं मनोमन काय जाणलं असेल त्याला उपाय नाहीं. पण मी ज्याच्याशीं लग्न करणार, त्यानं माझी फसवणूक केली न् केवळ भीतीनं अखेर तो माझ्याशीं लग्न करायला तयार झाला, असं तरी वाटायला नको तिला! पपांना खरा प्रकार कळल्यावर ते एकादे वेळीं त्यांना जरब दाखवून लग्न करायला भाग पाडण्याऐवजीं उलट संतापानं मोडता घालायचे आमच्या लग्नाला! असल्या बदमाषाशीं लग्न करण्यापेक्षां तूं अविवाहित रहा जन्मभर असं म्हणायेच ते मला! अलिकडे संशय येतो मला.—

पण त्यावर सुद्धां ते म्हणतील एकादे वेळीं कीं, "मी तसंच वाढवीन तुझ्या मुलाला! असल्या बदमाषाशीं लग्न करून सारा जन्म दुःखाच्या खाईत होरपळत काढण्यापेक्षां मला तो डाग पुरवेल. जीजसनं मेरी माग्दलन सारख्या जगानं तिरस्करणीय मानलेल्या स्त्रीचा उद्धार केला आणि पुनरुत्थानानंतर प्रथम तिला दिव्य दर्शन दिलं. त्याच्या असीम दयेला क्षम्य वाटेल तुझी ही चूक!—" असं जर पपांनी म्हटलं तर मी काय करूं?—म्हणून ते कसे आहेत हें त्यांना कळायला नको. मला कळलंय तेवढं पुष्कळ आहे. माझ्या डोळ्यांतून आजपर्यंत दुःखाश्रु गळले आहेत तेवढे पुरेत. पण माझ्या लग्नाच्या वेळीं त्यांच्या डोळ्यांतून आणखी अश्रु गळायला नकोत!

पण मग या स्थितींतून मार्ग कसा काढायचा? ते तर सुखा-सुखी माझ्याशीं लग्न करायला तयार होतील असं दिसत नाहीं. मग मी काय करूं? समोर येऊन उभ्या राहिलेल्या गर्भवती शकुंतलेला ओळख द्यायला दुष्यंताला निदान दुर्वासाच्या विस्मृतीच्या शापाची तरी सबब होती. पण माझ्याशीं लग्न करायचं नाकारायला त्यांना कोणती सबब आहे? एकदां वाटतं, शेगांवला जाऊन बापूंना आपली ही कर्मकहाणी सांगावी न् त्यांच्याकडून यांचं मन वळवावं! पण बापूंना हा सारा प्रकार कळणं म्हणजे ते सार्वजनिक आयुष्यांतून उठणंच नाहीं का? त्यांच्या जीवनांत अशा रीतीनं विषार कालवल्यावर मग त्यांच्याशीं लग्न करायचा मला काय हक्क आहे? ते स्वार्थी असले आणि त्यांनीं मला फसवलं असलं, तरी मी स्वार्थबुद्धीनं त्यांचा असा नाश करणं योग्य होईल का? आणि त्यांच्यापेक्षां माझा चांगुलपणा तो तरी मग काय उरला छे, पपांना साऱ्या गोष्टी सांगण्यापेक्षांहि हा मार्ग अधिक वाईट. पण मग मी कसं करूं? ममीला तरी विश्वासांत घेऊं का? पण तिला झालं तरी मी काय सांगूं? मी फसलें न् ते माझ्याशीं लग्न करीत नाहींत असं सांगणं तर इष्ट नाहीं मुळींच. मग काय सांगूं?

माझी खात्री आहे कीं, पपांनीं जर त्यांना माझ्याशीं लग्न करायला सांगितलं, तर त्यांची हिंमत नाहीं व्हायची नकार द्यायची! पपांचा दर्जा, त्यांचं कर्तृत्व, त्यांची संपत्ति या सगळ्या गोष्टींचा वचक वाटतो त्यांना. पपांचं मन मोडायची प्राज्ञा नाहीं त्यांची! आम्ही दोघं एकत्र असतों, पुष्कळ वेळ एकत्र असतों, हें लक्षांत आलंय पपांच्या. आमच्या लग्नाला त्यांची प्रतिकूलता असणं शक्य नाहीं. पण त्यांना मोहनजवळ तो विषय काढायला कुणी न् कसं सांगायचं? ममीच एकटी करूं शकेल तें काम. पण मग—ममीला विश्वासांत घेतलं पाहिजे मला!

  

ममीजवळ प्रथम जेव्हां मी ती गोष्ट काढली, तेव्हां केवढा रागाचा आव आणला तिनं! एका अर्थानं तिचं म्हणणं रास्त होतं. आमच्या समाजांत माझ्याशीं लग्न करायला उत्सुक असलेले किती तरी सुशील न् सधन तरुण आहेत. त्यांच्या अनुनयाला वश न झालेली मी—कोणत्या मोहानं मी यांच्या वासनेला बळी पडलें? ममीचं म्हणणं असं कीं, मी ख्रिस्ती राहिलें तरी आमचीं मुलं बापाच्या धर्माचीं, हिंदूच समजलीं जातील. कदाचित् दोन्हीहि समाजांत थारा मिळणार नाहीं त्यांना. डॉ. गौर यांच्या कुटुंबाचं उदाहरण आमच्या डोळ्यापुढं होतंच. ते स्वतःला हिंदु म्हणवीत व दिल्लीच्या असेंब्लींतील हिंदु सभासदांचे पुढारीहि होते ते. पण लेडी गौर या ख्रिस्ती होत्या. त्यांच्या मुलींचा धर्म खरोखरी कोणता होता हें शेवटपर्यंत उमगलं नाहीं कुणालाच! आईबरोबर त्या चर्चमध्यें जात. पण त्यांचीं नांवं केव्हां हिंदु तर केव्हां ख्रिस्ती सांगितलीं जात असत; व त्यांचीं लग्नंहि बहुतेक हिंदूंशींच झालीं. हिंदु समाजाच्या कोत्या दृष्टीमुळं हिंदु आणि ख्रिस्ती यांच्या संमिश्र कुटुंबांची स्थिति पुष्कळदां ना अरत्र ना परत्र अशी होते. बंगालमध्यें मात्र ब्राह्मो आणि ख्रिस्ती यांचे समाज सलग, सहानुभवी असे असून त्यांच्यांत सगळ्या प्रकारचे व्यवहार सुखानं

होतात असं ममी सांगते; न् मी एकाद्या बंगाली हिंदूशीं किंवा ब्रह्मोशीं लग्न केलं असतं तर वाटलं नसतं ममीला त्याचं कांहीं. पण मोहनशीं लग्न करण्याची कल्पना आवडली नाहीं तिला. म्हणूनच माझ्याशीं स्नेह वाढवायला त्यांना जें पपांनीं उत्तेजन दिलं, तेंहि तिला पसंत नव्हतं. स्त्री ही स्थितिवादी असल्याबद्दल पुष्कळदां दोष दिला जातो तिला. पण तो बरोबर आहे का? जीवनाची धारणा करण्याची जबाबदारी जिच्यावर आहे, तिला भविष्यकाळाविषयीं बेफिकीर राहून कसं चालेल? झाडाच्या फांद्या आकाशांत जितक्या उंच विस्तारलेल्या असतात, त्यापेक्षां कितीतरी दूरवर आणि खोलवर त्याचीं मुळं जमिनींत पसरलेलीं असतात; न् त्या मुळांच्या पसाऱ्यावरच त्याचं स्थैर्य, त्याचा जिवटपणा अवलंबून असतो. मानवजातीची उन्नति जरी तिच्या उच्च ध्येयांमुळं होत असली, तरी तिचं स्थैर्य, तिचा जिवटपणा हा भूतकाळांत अनादि पसरलेल्या तिच्या परंपरेवर, संस्कारांवरच अवलंबून नाहीं का? स्त्रीला या गोष्टीची जाणीव एका परीनं उपजतच असते; न् म्हणून भविष्यकाळ ज्यामुळं बिकट होईल असं कोणतंही परंपरेशीं विसंगत असलेलं कृत्य करायला तयार होत नाहीं ती!

ममीनं किती छान जमवून आणलं सगळं! आम्ही सिनेमाहून परत आलों; न् ते नेहमीप्रमाणं वऱ्हांड्यापर्यंत मला पोंचवायला आले. त्यांना पाहतांच ममी हसून इंग्रजींत म्हणाली, "वेळ आहे का तुम्हांला थोडा, मोहन? त्यांचं कांहीं काम आहे तुमच्याशीं!" तिनं इतक्या सहज उच्चारले ते शब्द कीं, त्यांना कांहींसुद्धां शंका आली नाहीं. आणि त्यांनी विचारलं, "ते वर अभ्यासिकेंत असतील?"—"हो, तिथंच भेटा तुम्ही त्यांना; तुमची वाटच पहाताहेत ते!"—ते हलक्या पावलांनीं जिना चढून वर गेले. माझी छाती इतकी धडधडूं लागली!—मी ममीकडे बघितलं. ती अगदीं शांत होती.—मी तशीच हळूच वर गेलें न् मागच्या खोलींतून अभ्यासिकेंत जाऊन पडद्यामागें उभी राहिलें. मोहन

पपांच्या समोर बसले होते; न् आम्ही पाहून आलेल्या बोलपटाविषयीं बोलणं चाललं होतं. थोडं औपचारिक बोलणं झाल्यावर पपा एकदम इंग्रजींत म्हणाले, "हें पहा, मी मुद्दाम आज वर बोलावलं तुम्हांला, मोहन! तुमचा न् रोजचा परिचय झाल्याला सात आठ महिने होतील आतां. तुमचा सहवास सारखा वाढतोय. मला वाटतं, आतां फार दिवस असं चालूं देणं इष्ट होणार नाहीं. आपण आज ठरवून टाकूं केव्हां लग्न करायचं तें. तुमची कांहीं आर्थिक अडचण असेल, तर मला तसं मोकळ्या मनानं सांगा!" "नाहीं, आर्थिक अडचण कांहीं नाहीं," ते अगदीं जिरल्यासारखे होऊन अत्यंत नरमाईनें बोलत होते. "पण, पण,—!" "मी धार्मिक अडचणींना महत्त्व देत नाहीं मुळींच! आपल्याला सिव्हिल मॅरेज करायचं ना? थांबा, मी पाहतों मॅजिस्ट्रेटसाहेब सांपडतात का!" पपांनीं लगेच फोनच्या आंकड्यांवर बोटें फिरविलीं. ते अगदीं स्तब्ध, अगदीं निश्चल होते. खुर्चीला खिळल्यासारखे जडमूढ होऊन बसले होते. कशाची निदर्शक होती ती निश्चलता?— त्यांना विचार करण्याची संधि न देतां विद्युद्वेगानं घडत गेल्या सगळ्या गोष्टी. त्यांच्या अनपेक्षित स्वरूपानें आणि अगम्य वेगानें बधिरता आली का त्यांना? पपांनीं फोन घेतला. ते थोडंसं कांहीं बोलले; न् लगेच रिसीव्हर मोहनच्या पुढें करून म्हणाले, "तुम्ही बोलून घ्या त्यांच्याशीं. रीतसर नोटीस उद्यां पाठवूं!"—एकाद्या भारलेल्या माणसाप्रमाणं त्यांनीं रिसीव्हर मुकाट्यानं हातांत घतला; व आपण लग्नाची नोटीस देणार असल्याचं त्यांनीं मॅजिस्ट्रेटला सांगितलं. लगेच पपांनीं घंटी वाजवली. चपराशी आंत आल्याबरोबर ते म्हणाले, "कॉफी आण लवकर न् मेमसाहेबांना पाठव!"—पण पुढला प्रकार पहायला मी थांबलें नाहीं.

मी खोलींत येऊन आपल्या अंथरुणावर पडलें. माझ्या डोळ्यांतून अश्रु वहात होते. पण कसले? सुखाचे कीं दुःखाचे? खरोखरी तें

सांगणं कठीण आहे. त्यांची हीन मनोवृत्ति, त्यांचं खरं स्वरूप यत्किंचितहि उघडकीला न येतां साऱ्या गोष्टी पंधरावीस मिनिटांत निश्चित झाल्या याबद्दल आनंद वाटला मला. पण या आनंदाच्या पलिकडे काय होतं? मृगजळाच्या मोहक ऊर्मीच्या पलिकडे जसं रखरखीत वाळवंट असतं तसं या आनंदाच्या पलिकडे!—काय होतं पलिकडे? फसवणूक, निव्वळ फसवणूक. मी स्वतः फसलें आणि माझ्या आईवडलांनाहि फसवलं. ममीला कदाचित् अंदाज असेल या फसवणुकीचा; नव्हे, असलाच पाहिजे. पण पपा?— ते मात्र निखालस फसले आहेत. या फसवणुकीनं सुरू झालेलं हें वैवाहिक जीवन—कशा रीतीनं शेवट होईल याचा? शहारे आले माझ्या अंगावर हा प्रश्न मनांत उभा रहातांच. तोंच दार वाजलं. मी उठून डोळे पुसले न् दार उघडलं. तेव्हां चपराशी मला म्हणाला, "साहेब वर बोलावताहेत आपल्याला." मी केस नीटनेटके केले आणि अगदीं अजाण चेहरा करून पपांच्या अभ्यासिकेंत गेलें. तीं तिघं कॉफी घेत होतीं. मला बघितल्यावर हातांतला कप खालीं ठेवून पपा इंग्रजींत उद्गारले, "मी अभिनंदन करतों तुझं पोरी, इतका हुषार नवरा मिळव-ल्याबद्दल!" मला समजेना, काय बोलावं काय करावं हें. मी हळूच त्यांच्या-कडे पाहिलं.—तेहि हंसत होते आतां. मनापासून हंसताहेत का? कीं हें सुद्धां नाटकच आहे एक?—ही शंका डसून गेली माझ्या मनाला. पण पपांनीं मला विचार करायला वेळ दिला नाहीं. ते म्हणाले, "उद्यां नोटीस दिल्यावर तारीख ठरवून टाकूं लग्नाची. मोहन, मी फार आभारी आहें तुमचा सगळ्या गोष्टी इतक्या चटकन निकालांत काढल्याबद्दल!" ते उठून उभे राहिले. पपा आणि ममी त्यांना पोंचवायला मोटारीपर्यंत गेलीं. मी तिथेंच उभी राहून खिडकींतून पहात होतें. किती आनंदांत असल्यासारखे दिसत होते तें!

सकाळीं मी निजून उठलें आणि एकदम माझ्या मनांत आलं कीं त्यांना जाऊन भेटावं. ते स्वतः मला न्यायला आल्याशिवाय अलिकडे मी जात नसे त्यांच्याकडे; न् सकाळीं तर कधींच गेलें नव्हतें. त्यामुळं लगेच वाटलं कीं, आज एकाएकीं उठून मी त्यांच्याकडे कशी जाऊ? मला बघून त्यांच्या मनांत काय येईल? त्यांना असं तर वाटणार नाहीं कीं, पपांनीं त्यांच्याकडून तशा रीतीनं लग्नाची अचानक कबुली घेतल्यावर त्यांना हिणवण्यासाठीं मी भेटायला आलें? आणि त्यांचा दाबून ठेवलेला सगळा राग बाहेर पडेल? खरंच, काय येईल त्यांच्या मनांत? कसे वागतील ते माझ्याशीं?—या विचारांत मी मग्न असतांनाच त्यांचा चपराशी आला. मला वाटलं, त्यांचं कांहीं तरी पत्र आणलं असावं त्यानं कालच्या प्रकाराबद्दल आणि माझी छाती धडधडूं लागली. छातीवर दोन्ही हात ठेवून मी उभी होतें. तोंडांतून शब्द फुटेना माझ्या. त्यानें मला सलाम केला आणि मुकाट्यानं हातांतलं तबक टेबलावर ठेवलं. त्या तबकावर घातलेला सुंदर रुमाल मी भीत भीत उचलला.—गुलाबाची टवटवीत फुलं होतीं तीं! त्या फुलांच्या मधोमध एका लहानशा सुबक कार्डावर त्यांच्या त्या गोल गोल रेखीव हस्ताक्षरांत फारशी कवितेची ओळ लिहिलेली होती,——"तुझी प्रीति गुलाबाच्या फुलांप्रमाणं मोहक आणि मधुर आहे." ती ओळ मी वाचली आणि माझे डोळे अश्रूंनीं भरून आले. ते अश्रु—आनंदाश्रु होते ते! गेल्या दोन महिन्यांत मी जीं दुःखांचीं आसवं गाळलीं, जो दारुण मनोदाह मुकाट्यानं सहन केला, त्याचा क्षणार्धांत विसर पडला मला. आणि माझ्या मनांत आलं, ते भोगलंपट असतील, नाटकी असतील, पण माझ्यावर जडलेलं त्यांचं प्रेम खरं आहे, अंतःकरणापासूनचं आहे; न् म्हणूनच ते काल इतक्या सहजासहजीं तयार झाले लग्नाला. त्यांच्या सगळ्या पाशवी वासनांवर, सगळ्या वंचक वृत्तीवर माझ्यावरल्या त्यांच्या प्रीतीनं अखेर जय मिळवला. त्या निर्मळ, सात्त्विक जयाचीं साक्षीदार

आहेत हीं फुलं!—मी टेबलावर ठेवलेल्या त्या तबकावर वाकलें आणि हळूच त्या फुलांचं चुंबन घेतलं. माझ्या डोळ्यांतले अश्रु त्या दंवानं भिजलेल्या फुलांवर पडले. त्यांचा तो लाजरा रंग, तो शीतल ओलावा, तो गोड गंध!—मुग्ध प्रीतीसुद्धां अशीच नसते का?—मी त्या तबकांत मधोमध ठेवलेलं सगळ्यांत टपोरं फूल उचललं आणि तें माझ्या ब्लाउज-वर खोंवायला लागलें. तोंच त्याच्या पाकळ्या खसदिशीं गळून माझ्या अंगावर पडल्या.—फक्त दोन तीन पाकळ्यांसह देंठ तेवढं शिल्लक राहलं माझ्या हातांत! माझ्या मनाला चरका बसला त्या अंगावर पडलेल्या पाकळ्या, तें झडून गेलेलं फूल पाहून!—देवा, असं तर होणार नाहीं आमच्या प्रीतीचं?

# सार्वजनिक जीवनांतील कोलितें

"—मग लग्नाचा विधि शेगांवला होणार असेल, मोहन?—"

"नाहीं, इथंच गुप्तासाहेबांच्या बंगल्यावर होईल; न् नंतर शेगांवला जाऊं आम्ही बापूंचा आशीर्वाद घ्यायला—"

"छान कल्पना आहे. आमच्याकडे जुन्या कुटुंबांत अजूनहि अशी पद्धत आहे कीं, लग्न झाल्यावर वधूवरांना कुलदेवतेचं दर्शन घ्यायला पाठवायचं! तुम्हां खादीवाल्यांचं गांधी हें कुलदैवत न् शेगांव हें मूळधाम आहे!—"

"आणि तूं नाहींस का खादीवाला, अण्णा?"

"मी खादीवाला असलों, तरी सक्तीमुळं, स्वेच्छेनं नव्हे. बाकी हिंदु सभेनं सुद्धां तुझं अभिनंदन करायला हरकत नाहीं या लग्नाबद्दल!—"

"हिंदु सभेनं कशाबद्दल अभिनंदन करायचं माझं ? रोजला कांहीं मी हिंदु करून घेणार नाहीं आहे लग्नापूर्वी !—"

"अरे, हिंदु कशाला करून घ्यायला पाहिजे ? ती ख्रिस्ती राहिली तरी तुमचीं मुलं हिंदूच समजलीं जाणार ना ? जोधबाई अकबराच्या जनानखान्यांत राहून जन्मभर तुळशीची पूजा करीत होती. पण म्हणून कांहीं सलीम मुसलमान व्हायचा चुकला नाहीं ! ज्या दिवशीं रोज लग्न करून तुझ्या घरांत येईल, त्या दिवशीं ती आपोआप हिंदु समाजांत मिसळून जाईल. बाकी मोहन तूं वस्ताद खरा ! आजपर्यंत अनेक पोरींना फशीं पाडून शेवटीं हिला उजवायला जो तूं तयार झालास, त्यांतसुद्धां धंदेवाईक दृष्टि कसाला लागली तुझी !—"

"काय बोलतोस अण्णा तूं ? अरे, गुप्तासाहेबांकडून एक पै घेतलेली नाहीं मी —"

"अरे, घ्यायला कशाला हवी ? न मागतांच जिथं आपोआप सगळं कांहीं मिळणार आहे, तिथं मागण्यासाठीं हात पसरायचा अप्रयोजकपणा कोण करील ? आणि गुप्तासाहेबांकडून पैसाच घ्यायला हवा असं नाहीं कांहीं ! पब्लिक वर्क्स खात्यांतल्या बड्या इंजिनियरचा जावई झाल्यावर तूं नुसत्या इमारती मालाच्या ठेक्याचा धंदा केलास तरी लक्षाधीश होऊन जाशील ! नदीच्या कांठीं खणलेल्या विहिरींत जसं बारमहा तुडुंब पाणी असतं, तशी गुप्तासाहेबांच्या आश्रयाला असणाऱ्या ठेकेदारांची सदोदित चलती असते. त्यांचं वजन, त्यांचा दर्जा, त्यांची लोकप्रियता यांचा केवढा फायदा मिळणार आहे यापुढें तुला ! उगाच नाहीं तूं लग्नाला तयार झालास !—"

अण्णासाहेबांचें तें बोलणें ऐकून मोहन नुसता हंसला; कांहीं बोलला नाहीं.

मोहनच्या प्रशस्त बंगल्यांतील एका बाजूच्या खोलींत ते दोघे पोकर खेळत बसत होते. हिरवें छायक (Shade) घातलेल्या लोंबत्या विद्युद्दीपाचा सुंदर प्रकाश टेबलावर पडला होता. सिगारेटचा डबा, मद्याच्या दोन बाटल्या, दोन तीन चषक आणि रक्षापात्र एवढ्याच वस्तु टेबलावर ठेवलेल्या होत्या. तें टेबल येवढें मोठें होतें कीं, एका वेळीं दहा माणसें त्यावर पोकर खेळूं शकलीं असतीं. पण या वेळीं ते दोघेच समोरासमोर पत्ते खेळत होते.

"पण काय रे, रोज इथं रहायला आल्यावर तुला एक वेगळा बंगला घ्यावा लागेल नाहीं, मोहन?"—

"का बरं?—"

"अरे, आपलं हें पिणं, खेळणं आणि इतर सगळ्या गोष्टी तिच्यासमोर कशा चालूं शकतील?—"

"तें सगळं मी कधींच ठरवून टाकलंय, अण्णा! लग्न झाल्यापासून वर्षभर मी व्रतस्थ राहणार आहें अगदीं!"

मोहन तोंडांतली सिगारेट काढून हंसत हंसत म्हणाला.

"पण तुझ्या या व्रतामुळं आमची उपासमार न् गैरसोय होईल त्याची वाट काय? तुझ्या बंगल्यासारखी निवांतपणानं प्यायला न् खेळायला सोयीची जागा नाहीं दुसरी! आणि मोहन, थापा कशाला मारतोस उगाच? पिणं, खेळणं न् सारी रात्र मजेंत घालवणं हें जीवन आहे तुझं! तूं या व्रतस्थ रहायच्या थापा तुझ्या भोळसर खिस्ती बायकोजवळ मार. आम्हांला नको सांगूं! बोल, काय सोय करणार आहेस तूं आपली? आमची भागीदारी असली पाहिजे त्यांत!—"

"अण्णा, माझ्याबद्दल ज्या तक्रारी ईश्वरदासजींकडे गेल्या आहेत, त्यांतली मुख्य तक्रार काय आहे माहित आहे का तुला? मी माझ्या बंगल्याचा अनैतिक कामासाठीं उपयोग करतों असा स्पष्ट आरोप

केलेला आहे माझ्यावर त्या पत्रांत! तेव्हां तो आरोप खोटा पाडण्यासाठीं तरी मला बंद केला पाहिजे कांहीं दिवस हा आपला क्लब! त्या आरोपांची शहानिशा करून घेण्यासाठीं ईश्वरदासजी कोणत्या क्षणाला इथं येऊन उभे राहतील याचा नेम नाहीं!—"

"पण ईश्वरदासजींची कंपनी तूं सोडलीस ना मोहन?—"

"सोडली याचा अर्थ येवढाच कीं, पूर्वीसारखं तेवढंच एक काम मी करीत नाहीं आतां. ती कंपनी सोडून चालेल कसं माझं? धंद्यांत काय किंवा राजकारणांत काय जी प्रतिष्ठा मला आज आहे, ती ईश्वरदासजीं-मुळें आहे हें विसरूं नकोस तूं! आपली ती नवी कंपनी काढतांना सुद्धां मी संमति न् सल्ला घेतला होता त्यांचा. त्यांच्या इतका ज्या दिवशीं मी मोठा होईन, त्या दिवशीं त्यांची कंपनी सोडायची कीं नाहीं हें ठरवीन मी! तोंपर्यंत त्यांचा एजंट—"

"आमचा 'हस्तक' हा मराठी शब्द वापर तूं, मोहन! धंद्यापासून तों राजकारणापर्यंत साऱ्या बाबतींत तूं हस्तक आहेस ईश्वरदासजींचा! मला वाटतं त्यांनीं अलिकडे ठेवलेल्या त्या तरुण पारशिणीची तब्येत सुद्धां तूंच सांभाळतोस मधून मधून मुंबईला जाऊन!—"

"तुझ्या तोंडाला कुणी लागावं, अण्णा! ईश्वरदासजींच्या कानांवर गेलेले माझ्याविषयींचे हे सारे प्रवाद जिरविण्यासाठीं तरी मला कांहीं दिवस अगदीं सोंवळेपणानं रहायला पाहिजे—"

"मग शेगांवलाच जाऊन का नाहीं रहात तूं?"

अण्णासाहेब चघक भरीत हंसत हंसत उद्गारले.

पण त्यांचा तो टोमणा मनावर न घेतां मोहन म्हणाला—

"बाकी माझी कांहीं हरकत नाहीं अण्णा, तूं आपल्या नांवावर एक बंगला भाड्यानं घेऊन हा धंदा चालवीत असशील तर! मला

भागीदारीहि नको त्यांत! मी आपला रोज खेळायला येत जाईन तास दीड तास—"

"आणि नोटा घेऊन जात जाईन खिसे भरभरून असंच की नाहीं! बाबा रे, असले धंदे सफाईनं करायला तुझ्यासारखा बहुगुणी हिम्मतबाज मनुष्यच हवा! माझ्यासारख्या अर्धवटाला जमायचं नाहीं तें! शिवाय माझ्या नांवावर मी बंगला घेतला कीं, सी. आय. डी. ची नजर ताबडतोब वळायची त्याच्याकडे! पोलिस अधिकाऱ्यांच्या अड्डयांत रोज जाऊन बसायची आणि त्यांना मधून मधून आपल्या बंगल्यावर खेळायला बोलवायची तुझी कला साधणं शक्य नाहीं मला! डॉ. बद्रिनाथच्या बंगल्यावर रोज भरणाऱ्या अड्डयांत सामील होऊन तूं छान जम बसवला आहेस आपला पोलिसखात्यांत!—"

"अरे, पण तूं का नाहीं येत डॉ. बद्रिनाथच्या बंगल्यावर? तुला मी रोज न्यायला तयार आहे आपल्याबरोबर!—"

"नको रे बुवा! मला तुझ्यासारखं जमत नाहीं वाटेल त्या अड्डयावर बसायचं न् मिसळायचं! मी त्या विठोबाकडे जाणं सुद्धां कमी करणार आहे हळूहळू!—"

"का , त्या धर्मराजाला कंटाळायला काय झालं तुला?"

"परवां त्या काळ्यानं माझ्या तोंडावर आपल्या कंपनीनं दहा हजार रुपये खाल्ल्याची बातमी विठोबाला सांगितली!—"

"कां तूं आतांशा त्याला बीर कमी पाजतोस वाटतं? तुला एक साधी गोष्ट समजत नाहीं, अण्णा! आपण खाल्लेलं जर बिनबोभाट पचायला हवं असेल, तर आपल्या भोंवतालच्या सगळ्या भुकेकंगालांच्या तोंडावर मधून मधून तुकडे फेंकीत राहलं पाहिजे! आपल्यांत जी चित्राहुतींची आणि काकबळीची पद्धत आहे ना, ती मोठी मार्मिक आहे या दृष्टीनं! जेवायला बसण्यापूर्वी बाहेर येऊन कावळ्यांच्या तोंडावर

तुम्ही चार शितं फेंकलींत म्हणजे ते कावकाव करण्याची धास्ती नाहीं मग! तूं त्या काळ्याला माझ्याकडे पाठव; मी आत्तां बंद करतों त्याचं तोंड!—"

"त्याचं एक तोंड तूं बंद करशील; पण गांवांत जीं हजार तोंडं हजार परींनीं या बाबतींत बोलताहेत तीं कशीं बंद करणार आपण! बाररूममध्यें बसणं अशक्य होऊन गेलंय अलिकडे मला! आणि काय रे, सी. आय. डी. ची चौकशी खरंच चालू आहे का त्या बाबतींत? काल बाररूममध्यें सुद्धां बोलत होती मंडळी!—मोहन, तुला फार प्रेम आहे प्रियदर्शनविषयीं! पण तो खरोखरी एक दिवस आपल्या सगळ्यांना गड्ड्यांत घालणार!—"

"आपण ज्या दिवशीं गड्ड्यांत जाऊं, त्या दिवशीं तोहि आपल्या बरोबर गड्ड्यांत गेलेला दिसेल तुला, अण्णा!"

मोहन हातांतले पत्ते खालीं टाकून आवेशानें उद्गारला. पण त्याच्या चेहऱ्यावर मात्र चिंतेची छटा उमटल्याशिवाय राहिली नाहीं. त्यानें डब्यांतून सिगारेट काढून ती पेटवली; व तिचा एक झुरका जोरानें घेऊन म्हटलें—

"अण्णा, मी तुला आतांपर्यंत एक गोष्ट सांगितली नाहीं. पण तूं विषय काढलाच आहेस म्हणून सांगतों. परवां प्रियदर्शननं मला मुद्दाम भेटायला बोलावलं होतं!—"

"काय म्हणतोस? त्यानं सरळ सरळ विचारलं तुला त्या खाणींच्या प्रकरणाबद्दल?—"

अण्णासाहेब भीतियुक्त आवाजांत विचारते झाले. कपाळाला पडलेल्या आठ्या, डोळ्यांचा झालेला संकोच, किंचित् उघडलेली पसरट जिवणी आणि उत्कंठेनें पुढें सरसावलेली मान यांमुळें त्यांचा चेहरा मोठा गंमतीदार दिसत होता.

पण मोहनचें लक्ष त्यांच्या चेहऱ्याकडे किंवा प्रश्नांकडेहि नव्हतें तो एक लांबलचक झुरका घेऊन संथपणानें म्हणाला--

"मीहि कल्पना केली होती तो काय विचारील याची; न् त्या तयारीनंच गेलों होतों. त्यानं मला वऱ्हाडांतल्या एका सदस्यानं विचारलेल्या प्रश्नांची प्रत दाखवली; न् नंतर स्नेहभावानं मला कंपनीचा या प्रकरणांत कितपत संबंध आहे याचा खुलासा करायला सांगितलं. मी त्याला म्हटलं, "आमच्या कंपनीनं फक्त शेठ राधाकिसनजींच्या वतीनं सरकारशीं बोलणं केलं. यापेक्षां आमचा अधिक कांहीं संबंध नाहीं." माझ्या या उत्तरानं त्याचं समाधान कांहीं झालं नसावं. पण मग त्यानं जास्त चौकशी मात्र केली नाहीं —"

"पण सी. आय. डी. कडून गुप्त चौकशी चालू आहे हें खरं का?--"

"तें कसं सांगणार? मी परवां संध्याकाळीं डॉ. ब्रिद्रनाथच्या बंगल्यावर गेलों असतां खडा टाकून पाह्यला. प्रांतिक सी. आय. डी.तला तो कृपाशंकर नेहमीप्रमाणं तिथं होता. पण त्यानं कांही दाद दिली नाहीं. उलट तोच मला विचारूं लागला की, कॉंग्रेसचा मुख्य प्रधान आपल्या एका सहकाऱ्याविरुद्ध सी. आय. डी. चा उपयोग कसा करून घेईल?—"

"मग खरा प्रकार काय आहे?—"

"तें कसं सांगणार? मी सारखा त्याच तपासांत आहे. मात्र पं. गदाधरजींना कांहीं तरी सुगावा लागलेला दिसतोय!--"

"कशावरून?—"

"काल गुलाबचंदजी मला सांगत होते कीं, पंडितजींनीं पार्लमेंटरी कमिटीच्या एका सभासदाला खाजगी रीतीनं पत्र घालून मुख्य प्रधान

आपल्या सहकाऱ्यांविरुद्ध सी. आय. डी. चा उपयोग करतात याबद्दल तक्रार केली आहे!——"

"छान! पंडितजींनीं मोठंच धैर्य दाखवलं म्हणायचं! तरी मी तुला सांगतोंय सारखं कीं, हा प्रियदर्शन मुख्य प्रधान असेपर्यंत कांहीं आपल्याला सुखानं नांदूं द्यायचा नाहीं!——"

"नाहीं नांदूं देणार तर कापून काढूं त्याला! मी तुला सांगितलं नाहीं का पूर्वीच! आपल्या पंडितजींच्या मुत्सद्देगिरीपुढं कांहीं चालायचं नाहीं प्रियदर्शनचं!——"

"पण उद्यां रात्रीं पक्षाच्या सभेंत तो प्रश्न निघाला तर?——"

"अरे, निघाला तर पंडितजी आहेत ना उत्तर द्यायला! पंडितजी सध्यां इतक्या कुशलतेनं एक एक डाव खेळून राहिले आहेत कीं, प्रियदर्शन आणि उत्तमराव यांची नांगी ठेंचल्यासारखी होणार आहे अगदीं! त्या दोघांचा विचार वऱ्हाडांतल्या सात तालुक्यांचा वाढलेला शेतसारा रद्द करून शिवाय एकंदर साऱ्यांतहि पंचवीस टक्के कपात करायचा होता. पण पंडितजींनीं तूर्त तरी तो शिताफीनं हाणून पाडला आहे. बापूंचा कटाक्ष दारूबंदीवर किती आहे, हें तुला माहितच आहे. कॉंग्रेस मंत्रिमंडळाच्या पहिल्या अंदाजपत्रकांत दारूबंदीची योजना नसेल, तर आपण आपल्या नैतिक कर्तव्याला जागलों नाहीं असं बापूंच्या मनांत येईल; न् म्हणून निदान दोन औद्योगिक केंद्रांत तरी दारूबंदीचा प्रयोग यंदा केला पाहिजे, असा आग्रह पंडितजींनीं धरला. या प्रयोगामुळं उत्पन्नांत इतकी तूट येणार आहे कीं, सारा रद्द करण्याची कल्पना आपोआपच मागं पडली!——काल प्रियदर्शन शेगांवला जाऊन आला. पण नंतर काय झालं तें कळलं नाहीं अद्याप!—"

"मग शेतकऱ्यांना यंदा पैचीहि सूट मिळत नाहीं म्हणतोस?—"

"नाहीं. निदान अंदाजपत्रकांत तरी अद्याप कांहीं तरतूद केलेली नाहीं एवढं नक्की! आणि याचा शक्य तितका फायदा घेतला पाहिजे तुम्ही लोकांनीं! कामगारांच्या पगारांतली कपात रद्द करण्याचा प्रश्न तसाच भिजत पडला आहे; न् शेतकऱ्यांचाहि सारा कमी करण्याची मागणी पूर्ण होण्याची आशा नाहीं. या परिस्थितीमुळं उत्पन्न होणार असलेल्या असंतोषाचा भरपूर फायदा घेतला पाहिजे आपण! म्हणून मी म्हणतों कीं, त्या विठोबाला, काळ्याला न् शेळक्याला तूं आपल्या हातांतून निसटून जाऊं देऊं नकोस! अरे, या कोलितांच्या जोरावर आपण रान पेटवून देऊं सारं न् प्रियदर्शनला वठणीवर आणूं! पंडितजींनीं अगदीं ठरवून टाकलंय कीं, त्याची नागपुरांतील लोकप्रियता सहा महिन्यांच्या आंत संपुष्टांत आणायची न् उत्तमरावाला वऱ्हाडांत कुठं तोंड काढतां येऊं नये अशी व्यवस्था करायची!--"

"आपले पंडितजी म्हणजे चाणक्य आहेत दुसरे! त्यांच्यापुढं हा भोळा न् एकमार्गी प्रियदर्शन कसा टिकणार? पण काय रे, दारूबंदीसाठीं कोणतीं औद्योगिक केंद्रं निवडलीं आहेत पडितजींनीं?--"

"भिऊं नकोस! नागपूर कांहीं कोरडं होत नाहीं इतक्यांत, अण्णा! दारूबंदी दोन ठिकाणीं करायची एवढंच ठरलंय तूर्त; न् सध्यां हिंगणघाट आणि बडनेरा हीं दोन केंद्रं आहेत पंडितजींच्या डोळ्यांपुढं! ही बातमी कळल्यापासून उमरावतीचा तो लाला अगदीं धरणं धरून बसलाय गुलाबचंदजींच्या दारांत!--"

"शेठजींना म्हणावं सपाटून पिळून काढा त्याला या वेळीं! गेलीं वीस वर्षं उमरावती जिल्ह्यांतल्या शेतकऱ्यांना दारू ढोसून लक्षाधीश झालाय तो!--"

"हें नकोस शिकवायला शेठजींना, अण्णा! त्यांनीं लालाला स्पष्ट सांगितलं कीं, आमच्या पक्षाच्या गुप्त निधीला किती रक्कम

मोजतोस तें बोल; म्हणजे बडनेरा दारूबंदीच्या कार्यक्रमांतून बाजूला काढण्याची खटपट करतों!––"

"पण ती खटपट यशस्वी होईल का?––"

"तसं आश्वासन कुठं दिलंय शेठजींनीं त्याला? शेठजी फक्त खटपट करणार आहेत. यश येणं न येणं हें परमेश्वराच्या हातीं! पण खटपट करायला सुद्धां मेहनत पडते न् पैसे लागतात ना!––"

"पण मोहन, हा गुप्त निधि कुठला काढलाय शेठजींनीं?––"

"अण्णा, तूं तीं सोशॅलिझमवरलीं पुस्तकं वाचून मठ्ठ होत चालला आहेस दिवसेंदिवस असं वाटतं मला! अरे, असल्या व्यवहारांत उघड पैसे घेण्यामागण्याची सोय आहे का? आमच्या गुलाबचंदजींना सही करण्यापुरतंच इंग्रजी येतं हें खरं. पण लॉयड जॉर्जनं सत्ता हातांत आल्यावर कोणत्या उपायांनीं बड्या लोकांपासून पैसा काढला याचं अंतर्ज्ञान आहे त्यांना जसं कांहीं! कॉंग्रेस मंत्रिमंडळ स्थापन झाल्यापासून निरनिराळ्या निमित्तांनीं पैसा ओढताहेत ते सारखा! लालाजी गुप्तदान करणार न् शेठजी ते आपल्या पक्षाच्या गुप्त निधीसाठीं घेणार! बाकी शेठजींनीं हें गुप्तदान मागतांना लालाजींना जीं कारणं सांगितलीं, तीं ऐकून तुला सुद्धां कौतुक वाटेल त्यांच्या मुत्सद्देगिरीचं!––"

"काय सांगितलं त्यांनी?––"

"त्यांनीं लालाजींना सांगितलं की, हरिपुरा कॉंग्रेसच्या निवडणुकी लढविण्यासाठीं पैसे पाहिजेत आम्हांला! या निवडणुकींत प्रियदर्शन न् उत्तमराव हे दोघेहि पडले पाहिजेत आणि नागपूर-वऱ्हाडांतल्या कॉंग्रेस कमिट्या महाराष्ट्र ब्राह्मणांच्या हातांतून निघून आपल्या मंडळीच्या हातीं––"

"का रे, महाराष्ट्र ब्राह्मणांवर डोळा का या शेटियाचा एवढा? अभ्यंकरांनीं जर हातांशीं धरला नसता याला, तर आपल्या त्या विशुद्ध

खादीमंदिरांत खतावण्या खरडीत बसला असता हा! अभ्यंकर तुझे राजकीय बाप आहेत हें विसरूं नकोस म्हणावं इतक्यांत! ज्या घरा-ण्यांत दत्तक जाऊन गब्बर व्हायचं, तें बुडवायचा उद्योग करणाऱ्या या शेठियाला——"

"ए, इतका चवताळून जाऊं नकोस अगदीं! पहिल्यांदा घसा कर बघूं ओला आपला——"

मोहन चषकांत दारू ओतीत हंसत हंसत उद्गारला. अण्णासाहे-बांच्या नाकपुड्या रागानें फुरफुरत होत्या; व त्यांचे चपटे डोळे अधि-कच आकुंचित झाले होते. मोहननें भरलेला चषक त्यांच्यापुढें ठेवला आणि मिस्किलपणानें हंसून म्हटलें——

"तूं जेव्हां तेव्हां लहान मुलासारखा एकदम एकेरीवर येतोस, अण्णा! अरे, महाराष्ट्र ब्राह्मण म्हणजे प्रियदर्शनला पाठिंबा देणारे लोक! मी न् पंडितजी दोघेहि ब्राम्हण आहोंत. तेव्हां शेठजींच्या मनांत कांहींहि असलं, तरी ब्राह्मणांची राजकारणांतून हकालपट्टी करायला आम्ही कसे तयार होऊं? उलट पंडितजी तर मला सारखे म्हणतात कीं, नागपूरच्या महाराष्ट्र ब्राह्मणांतल्या तरुण हुषार कार्य-कर्त्यांचं एक नवीन केंद्र उत्पन्न केलं पाहिजे आपण! महाराष्ट्र ब्राह्मणां-च्या बुद्धिमत्तेविषयीं फार आदर आहे पंडितजींना! अरे, आपण प्रयत्न करून येथील तरुण कार्यकर्त्यांचं एक 'महाराष्ट्र पथक' निर्माण केलं पाहिजे त्यांना सतत पाठिंबा देण्यासाठीं! त्या पथकाचं पुढारीपण आपोआपच तुझ्याकडे येईल, अण्णा!——"

"तें पाहूं पुढं! पण आधीं तूं आपला 'महाराष्ट्र ब्राह्मण' हा जातिवाचक शब्द मागें घे!——"

"बरं घेतों बुवा! हा भलताच वाद काढलास तूं अण्णा मध्येंच! आपल्या पुढें प्रश्न आहे तो कोणत्याहि जातीचा नाहीं; तर प्रियदर्शनचा पक्ष नेस्तनाबूद करण्याचा आहे! त्याबद्दल तर मतभेद नाहीं ना? शेठ-

जींनीं लालाला असं स्पष्ट सांगितलं कीं, प्रियदर्शनला आणि उत्तमरावाला पाडायचं न् खालपासून वरपर्यंत सगळ्या काँग्रेस कमिट्या ताब्यांत घ्यायच्या म्हणजे हजारों रुपये खर्च करायला हवेत! लालाजींसारख्यांनीं मनावर घेतल्याशिवाय व्हायचं कसं तें? दहा हजार रुपये मागितले त्यांनीं लालाजवळ--!"

"अरे, पण एवढे देईल का तो?—"

"अरे, दहा नाहीं पांच हजार तर देईल! बडनेऱ्याला उद्यां दारूबंदी झाल्यावर त्याचं जें नुकसान होईल त्याच्यापेक्षां कमीच भरेल ही रक्कम! तूं पहाशील, लाला मुकाट्यानं तयार होईल रक्कम द्यायला तेवढी! अरे, तुला माहित नाहीं, हा उमरावतीचा लाला न् वर्ध्याचा तो विलिमोरिया असे दोघे असेंब्लीच्या प्रत्येक सभासदाकडे खेटे घालताहेत सध्यां! प्रत्येक सदस्याची अशा रीतीनं पायधरणी करण्यापेक्षां गुलाबचंदासारख्या प्रांताध्यक्षाकडून आपलं काम करून घेणं अधिक सोईचं नाहीं का?--"

"खरं आहे तुझं म्हणणं मोहन!" अण्णासाहेब त्याच्या त्या तपशीलवार चर्चेला थोडेसे कंटाळून उद्गारले; व नंतर चषकांत उरलेलें मद्य एका घोटांत संपवून ते सिगारेट पेटवीत मोहनला किंचित् आर्जवी स्वरांत म्हणाले, "हें बघ दोस्त, या बैठकीनंतर ज्या ज्या कमिट्या नेमल्या जातील, त्यांत आमची सोय लावून दिली पाहिजे तुम्ही!--"

"अरे, हें काय तूं सांगायला हवंस का आम्हांला, अण्णा? प्रौढ शिक्षण आणि स्थानिक स्वराज्यसुधारणा यांचा विचार करण्यासाठीं ज्या कमिट्या नेमल्या जाणार आहेत, त्यांच्या सभासदांत पंडितजींनीं आधींच नांव टाकलंय तुझं! शिवाय हायस्कूल बोर्डांतहि घेणार आहेत तुला ते! तूं मघांशीं उगाच एकदम भडकलास इतका! तुला माहित नाहीं, पंडितजी ज्या माणसाला एकदां आपला म्हणतात, त्याचं

सर्व बाजूंनीं कल्याण करतात ते मग! तुझ्याकडे अपीलं भरपूर येतात ना अलिकडे?—"

"हो रे! पण बाररूममध्यें फार टिंगल चालते त्याबद्दल! परवां फुले वकील मला सर्वांच्या समक्ष म्हणाले कीं, 'अण्णासाहेब, तुम्हांला आतां या कोर्टांत येण्याचं कारण नाहीं मुळींच! तुम्ही दिवाणाच्या बंगल्यासमोर ऑफिस उघडा आपलं!' खरोखरी, या लोकांच्या जिभा म्हणजे नागव्या तलवारी आहेत नुसत्या—!"

"पण त्यांना भिऊन कसं निभेल आपलं, अण्णा? जगाच्या नालस्तींतून कोणीहि सुटलेला नाहीं. प्रियदर्शन एवढा चोख न् निस्पृह आहे, तरी आपलं 'लोकहित' लागलंच आहे कीं हात धुवून मागें त्याच्या! तूं एक गोष्ट मात्र लक्षांत ठेव—नागपुरांतले सगळे जहाल न् समाजवादी तुझ्या मुठींत असले पाहिजेत. त्यांच्यासाठीं कितीहि पैसा खर्च करावा लागला तरी हरकत नाहीं. या कोलितांचा उपयोग आपल्याला प्रसंगीं खुबीनं करावा लागणार आहे! तेवढं एक तंत्र तूं सांभाळलंस, म्हणजे पंडितजी पुढल्या निवडणुकीच्या वेळीं नागपुरांतील कामगारांतर्फे तुलाच उभा करतील असेंब्लीसाठीं! प्रियदर्शनचा पाडाव आपल्याला करायचा, म्हणजे आंतून जसं पोखरत जावं लागेल, तसेच बाहेरूनहि सुरुंग लावावे लागणार आहेत! म्हणून नागपुरांतलं सगळं ज्वालाग्राही साहित्य तूं ताब्यांत ठेवलं पाहिजेस आपल्या!—"

"त्याची नको काळजी करूंस तूं, मोहन! असेंब्लीच्या बैठकीनंतर एक दिवस नाहीं स्वस्थ झोंप लागूं देणार मी प्रियदर्शनला! अगदीं थेट बंगल्यावर मोर्चे नेऊं त्याच्या!—"

# शेगांवच्या प्रयोगशाळेंतील बेडूक

“या अंदाजपत्रकांत शेतसारा थोडा तरी कमी केल्याचं जर आपण जाहिर केलं नाहीं, तर वऱ्हाडांत तोंड दाखवणं अशक्य होईल मला! शेतसाऱ्याच्या बाबतींत कॉंग्रेसनं कोणतंहि निश्चित आश्वासन दिलेलं नाहीं हें खरं. पण शेतकरी असं समजून चालले आहेत कीं, पंजाबराव देशमुख आणि खापर्डे यांच्या हातून आपल्यावरला जो अन्याय दूर झाला नाहीं, त्याचं निरसन कॉंग्रेस मंत्रिमंडळ पहिल्या सपाट्याला करील. छे, छे, हें अंदाजपत्रक हातांत घेऊन मी वऱ्हाडांत जाऊं शकत नाहीं!—”

उत्तमराव किंचित् वैतागानें उद्गारले.

त्यांच्या त्या काळ्यासांवळ्या पण तेजस्वी मुद्रेवर रोषमिश्रित विषादाची झांक स्पष्ट उमटली होती.

त्यांनीं हातांतला चमचा खालीं ठेवून कपाळाला आलेला घाम पुसला आणि समोर बसलेल्या प्रियदर्शनकडे तीक्ष्ण दृष्टीनें पाहून विचारलें—

"तुम्ही परवां शेगांवला गेलां होतात ना? तिथं काय बोलणं झालं तुमचं महात्माजींशीं?—"

"वर्ध्याहून परत आल्यावर लगेच मी वर्ध्याला न् शेगांवला झालेलं सगळं संभाषण अक्षरशः लिहून काढलंय तुम्हाला दाखवण्या-साठीं! उमा, जेवण झाल्यावर आपण परवां रात्रीं तयार केलेलं तें टिपण उत्तमरावांना दाखव—"

"मी टिपण वाचीनच मागाहून! पण वर्ध्याला न् शेगांवला जें बोलणं झालं, त्यावरून तुमचा स्वतःचा ग्रह काय झाला तें कळू द्या आधीं आम्हांला!—"

उत्तमरावांनीं त्रासिक आवाजांत विचारलें.

"दारूबंदीचा प्रयोग तूर्त तहकूब करण्याच्या प्रश्नावर काय मत दिलं महात्माजींनीं?—"

उत्तमरावांच्या डाव्या हाताला बसलेल्या वृद्ध गृहस्थांनीं विचारलें.

'सागर व्हिला'मधील भोजनाच्या भव्य दिवाणखान्यांत मधोमध ठेवलेल्या प्रशस्त टेबलावर ते चौघे जेवत होते. जेवण हिंदु पद्धतीचें खरें, पण टेबलावर वाढलेलें आणि संमिश्र स्वरूपाचें होतें. तुरुंगांत असतांनाच प्रियदर्शननें मांसाहार सोडला होता. पण ठाकूर कुटुंबांत मांसाहार रूढ झालेला असल्यामुळें व त्याच्या मित्रमंडळींतहि मांसा-हारी लोकांचें प्रमाण जास्त असल्यामुळें दोन्ही प्रकारच्या आहारांची सोय 'सागर व्हिला'मध्यें नेहमीं ठेवली जात असे. पात्रांच्या मधोमध रांगेने चार पुष्पपात्रें ठेवलेलीं होतीं; व दिवाणखान्याच्या चारहि कोंप-ऱ्यांतून उंच तिपाईवर ठेवलेल्या नक्षीदार धुपदाण्यांतील चंदनाचा धुरा

आणि ऊद यांचा मिश्र गंध फुलांच्या वासाबरोबरच हवेंत दरवळला होता. दिवाणखान्याच्या चारीहि दरवाजांवर वायुलतेंच्या फिक्या रंगाचीं फुलें असलेले विरविरीत निळे पडदे सोडलेले होते. आणि टेबलावर लोंबत असलेल्या झगझगीत विद्युद्दीपांतून नीलछटा असलेला प्रकाश सर्वत्र पडलेला होता. रेडिओंतील गीतालापांचे दुरून येणारे मंद सूर तिथे चाललेल्या संभाषणांत व्यत्यय उत्पन्न न करितां मनाला न कळत आल्हाद देत होते.

खुर्च्यांच्या मागल्या बाजूला खादीचा शुभ्र पोषाख केलेले दोन परिचारक उभे होते. प्रियदर्शनच्या उजव्या हाताला टेबलाच्या अग्रभागीं उंच पायांच्या खुर्चीवर अशोक बसलेला होता. पण अगदीं गंभीर वातावरणांत चाललेल्या त्या जेवणापेक्षां त्याचें लक्ष परिचारकांच्या टिवल्याबावल्या करण्यांतच जास्त गुंतलेलें होतें. प्रियदर्शनला किंवा उमाकांताला तो मधून मधून एखाददुसरा प्रश्न विचारी. पण, नेहमीं-प्रमाणें ते आज त्याची थट्टामस्करी करीत नसल्यामुळें तो त्या भारदस्त जेवणाला कंटाळल्यासारखा झाला होता. पण, आपल्या आवडत्या काकांबरोबर अनेक समारंभांना हजर रहाण्याची संवय त्याला अलिकडे झालेली असल्यामुळें मध्येंच उठून जावयाला मात्र तो तयार नव्हता.

प्रियदर्शनच्या डाव्या हाताला उमाकांत बसला होता. आणि उत्तमरावांच्या डाव्या हाताला असेंब्लींतील कॉंग्रेस पक्षाचे चिटणीस दाजीसाहेब अमरावतकर बसलेले होते. दाजीसाहेब हे सर महादेवांच्या कारकीर्दींत मध्यप्रांतीय कौन्सिलचे सभासद होते; व सरसाहेबांच्या कृपेने त्यांना रावबहादुरी मिळून त्यांचा उत्कर्ष झाला होता. बालाघाट म्युनिसिपालिटी आणि जिल्हा कौन्सिल या दोहोंच्याहि अध्यक्षपदांचा उपभोग त्यांनीं अनेक वर्षें घेतला होता. निवडणुकीच्या वेळीं ते रावबहादुरीचा त्याग करून कॉंग्रेस पक्षांत शिरले. मंत्रिमंडळांत त्यांचा समावेश केल्यानें त्यांच्या अनुभवाचा आणि मुत्सद्देगिरीचा फायदा

काँग्रेस पक्षाला मिळेल अशी प्रियदर्शनची समजूत होती. पण मुख्य प्रधानाची जागा महाराष्ट्रीयाला दिल्यानतर मंत्रिमंडळांत समतोलपणा राहण्यासाठीं पांचांपैकीं तीन जागा महाकोसलला देण्याचें ठरलें. त्यामुळें दाजीसाहेबांना मंत्रिमंडळांत घेणें शक्य झालें नाहीं. पण पक्षाची चिटणिशी त्यांना घ्यावयाला लावून प्रियदर्शननें त्यांची सल्लामसलत आपल्याला सतत मिळेल, अशी व्यवस्था केली. त्यांच्या निवडणुकीच्या वेळीं जेव्हां बिलासपूरच्या एका पंडितानें पक्षांतील दोन्ही महत्त्वाच्या जागा महाराष्ट्रीयांना मिळाल्याबद्दल जोराची तक्रार केली, तेव्हां उत्तमरावांनीं त्याला असें उत्तर दिलें कीं, "दाजीसाहेबांची संस्कृति आपल्या प्रांताच्या बनावटीप्रमाणं संमिश्र आहे; व तुम्ही जसे त्यांना हिंदी म्हणावयाला नाराज आहांत, तसेंच आम्ही त्यांना महाराष्ट्रीय म्हणावयाला नाकबूल आहोंत!--"

"आजच्या 'लोकहितां'त आलेली बातमी तुम्ही वाचलीत का उत्तमराव?" दाजीसाहेबांनीं उत्तमरावांना उद्देशून पण प्रियदर्शनकडे पहात विचारलें. "दारूबंदीच्या प्रश्नावर मुख्य प्रधानांचा आणि महात्माजींचा मतभेद झाला असा अंदाज दिला आहे त्याच्या वर्ध्याच्या बातमीदारानं!—"

"तो अंदाज कांहीं चुकीचा नाहीं फारसा!" प्रियदर्शननें गंभीरपणानें म्हटलें. "माझा आग्रह असा होता कीं, यंदा दारूबंदीच्या प्रयोगाला सुरवात न करतां प्रथम शेतसारा कमी करावा. पण महात्माजींचं मत थोडं निराळं पडलं. दारूबंदीच्या बाबतींत काँग्रेस वचनबद्ध झालेली आहे—"

"आणि शेतकऱ्यांच्या बाबतींत वचनबद्ध झालेली नाहीं? वाजपेयींनीं तयार केलेल्या अंदाजपत्रकांत शेतसाऱ्यांतली एक पैहि कमी झालेली नाहीं असं जेव्हां असेंब्लीच्या प्रत्ययाला येईल, तेव्हां सारे सभासद फाडून खायला उठतील आपल्याला! हिंदुस्थानांत दारू पिणा-

रांचं प्रमाण शेंकडा वीस सुद्धां पुरतं नाहीं. त्यांना व्यसनमुक्त करण्यासाठीं शेंकडा ऐंशी लोकांच्या डोक्यावरलं जब्बर सार्‍याचं ओझं कायम ठेवायचं हा न्याय कुठला ?––"

"महात्माजींचा या प्रश्नाकडे पहाण्याचा दृष्टिकोन अगदीं निराळा आहे, उत्तमराव ! दारूबंदीचा प्रश्न हा नैतिक प्रश्न आहे; व काँग्रेसच्या कार्यक्रमांतला तो एकच प्रश्न असा आहे कीं, ज्यामुळं काँग्रेसच्या कारभाराकडे सर्व जगानं उत्सुकतेनं पहावं ! अमेरिका कोरडी करण्याचा प्रयत्न निष्फळ ठरला; व युरोपांत मद्यपानप्रतिबंधक चळवळ सारखी चालू असूनहि मद्य हें लोकांच्या रोजच्या आहारांत आवश्यक होऊन बसलें आहे. अशा स्थितींत काँग्रेसच्या ताब्यांत असलेले प्रांत जर काँग्रेसनं आपल्या कारकीर्दींत कोरडे करून दाखवले, तर जगावर त्याचा केवढा नैतिक परिणाम होईल !––"

"पण आपण कांहीं जगावर नैतिक परिणाम करण्यासाठीं दिवाणगिर्‍या स्वीकारलेल्या नाहींत !––"

"महात्माजींच्या आणि आपल्या दृष्टिकोनांतला फरक इथंच आहे, उत्तमराव ! हिंदुस्थानांत आजपर्यंत जे पुढारी होऊन गेले, त्यांचा दृष्टिकोन संकुचित म्हणजे निव्वळ राष्ट्रीय होता. त्यांची आकांक्षा फक्त राजकीय हक्क संपादन करण्याची होती; ते कांहीं जीवनाच्या नव्या तत्त्वज्ञानाचे प्रवर्तक नव्हते. महात्माजी हे नव्या तत्त्वज्ञानाचे द्रष्टे, नव्या समाजरचनेचे मनु आहेत. जगदुद्धाराच्या प्रश्नाच एक अंग या दृष्टीनं ते हिंदी राजकारणाकडे–हिंदुस्थानाच्या दास्यमोचनाच्या प्रश्नाकडे–पहातात; राष्ट्रीय चळवळीचीं जुनीं सर्व व्यावहारिक तत्त्वें सोडून देऊन सत्य आणि अहिंसा या दोन शुद्ध नैतिक तत्त्वांवर जी हिंदी राजकारणाची पुनर्घटना त्यांनीं केली, ती याच कारणामुळं ! व दारूबंदीवर जो त्यांचा इतका कटाक्ष आहे, तोहि याच कारणामुळं ! म्हणून त्यांच्या राजकारणानं आज सगळ्या जगाचं लक्ष आपल्याकडे आकर्षून घेतलं

आहे ! त्यांचं राजकारण हें केवळ राष्ट्रीय नाहीं, केवळ हिंदी नाहीं; सर्व जगाच्या राजकारणाला आणि आंतरराष्ट्रीय नीतिमत्तेला नवीन वळण लावण्यासाठीं हिंदी राजकीय क्षेत्रांत चालविलेला तो एक अभिनव प्रयोग आहे!–"

प्रियदर्शन हें वाक्य उच्चारीत असतां उत्तमरावांनीं हातांतला चमचा खालीं ठेवून आपल्या भेदक दृष्टीनें त्याच्याकडे एकवार न्याहाळून पाहिलें. त्यांना शंका आली कीं, प्रियदर्शन हें सारें उपरोधबुद्धीनें तर बोलत नाहीं? पण त्याच्या डोळयांतलें तें शांत सात्विक तेज पहातांच त्यांची खात्री झाली कीं, गांधींच्या जगदुद्धारार्थ चाललेल्या सत्य आणि अहिंसा यांच्या प्रयोगांचें जें हें समर्थन तो करीत आहे, तें अगदीं मनापासून कळकळीनें करीत आहे. त्याची ती गंभीर, तन्मय मुद्रा पाहून ते थोडे वरमले; पण लगेच मिस्किलपणानें हंसून उद्गारले––

"मग बिचारा हिंदी शेतकरी हा शेगांवच्या प्रयोगशाळेंतलं एक गिनीपिग किंवा एक बेडूक आहे म्हणायचा !––"

त्यांच्या त्या मार्मिक उद्गारानें प्रियदर्शन एकदम भानावर आल्यासारखा झाला; व हंसून त्यांना म्हणाला––

"तुमचं हें विधान अगदीं समर्पक आहे, उत्तमराव! पण, महात्माजींच्या जागतिक दृष्टिकोनाशीं जरी आपण समरस होऊं शकलों नाहीं, तरी तो समजावून घेण्याचा प्रयत्न करायला नको का?–जगाच्या उन्नतीचा विचार गांधीजींसारख्या विश्वकुटुंबी महात्म्यानं करावा. आपल्यासारख्या सामान्य माणसांनीं आपल्या भोंवतालच्या लोकांच्या रोजच्या सुखदुःखांकडेच तांतडीनें लक्ष पुरवलं पाहिजे––"

"मग ही गोष्ट लक्षांत आणून दिलीत कां तुम्ही महात्माजींच्या? एकदम तीन चार ठिकाणीं दारूबंदी करण्यापेक्षां तूर्त एकाच औद्योगिक केंद्राच्या ठिकाणीं दारूबंदी करावी आणि शेतसाऱ्याच्या निकडीच्या प्रश्नावर तूर्त भर द्यावा असं सुचवलंत का तुम्ही त्यांना?––"

"होय, दाजीसाहेब! मी युक्तिवादांत, आपली बाजू पुढं मांडण्यांत यत्किंचितहि कसूर केली नाहीं. पण महात्माजी त्या बाबतींत मत द्यायला तयार नाहींत. ते म्हणाले, 'हे प्रांतिक धोरणाचे आणि कारभाराचे प्रश्न तुम्ही आणि तुमच्या सहकाऱ्यांनीं आपसांत सहविचारानं सोडविले पाहिजेत. मी असल्या बाबतींत कांहीं बोलूं इच्छित नाही!' म्हणून मी काल वाजपेयींना भेटलों—"

"आणि त्यांनीं अंदाजपत्रकांत फरक करण्याचं नाकारलं, असंच ना?—"

उत्तमराव रागानें मध्येंच म्हणाले.

"होय, जवळ जवळ असंच!—"

"मग आतां पक्षाच्या सभेंत पाहूं! मात्र अंदाजपत्रकाचे वाभाडे काढले जातील, तेव्हां पंडितजी तुमचे सहकारी आहेत म्हणून त्यांचा कैवार घ्यायला तुम्ही उठूं नका! त्यांना परस्पर उत्तरं देऊं द्यात सभासदांच्या टीकेला!—"

"पण हा प्रश्न समायिक जबाबदारीचा आणि धोरणाचा नाहीं का उत्तमराव?—"

"पण या समायिकपणाची चाड त्यांनीं कां बाळगूं नये? प्रांतांतील शेतकऱ्यांची विपन्नावस्था त्यांना पुरेपूर माहित असतांना त्यांनीं तुमचा सल्ला मनावर घेऊं नये आणि तुम्ही मात्र ते तुमचे सहकारी म्हणून पक्षाच्या सभेंत त्यांची बाजू घ्यावी, हा व्यवहार नव्हे!—"

परिचारकानें पुढें केलेल्या तस्तांत हात धूत उत्तमराव म्हणाले.

प्रियदर्शन टुवालानें तोंड पुशीत त्यांचें बोलणें मुकाट्यानें ऐकत होता.

"हें पहा प्रियदर्शन, तुम्ही कसेंहि वागा! पण आजच्या सभेंत वऱ्हाडांतला एकहि सभासद गप्प बसणं शक्य नाहीं! कारण सात

तालुक्यांच्या वाढलेल्या शेतसाऱ्यांतली एक पैहि जर कमी झाली नाहीं आणि शेतकऱ्यांना थोडी देखील कायमची सूट जर आम्ही देऊं शकलों नाहीं, तर वऱ्हाडांतल्या सभासदांना आज आपल्या गांवीं तोंड काढणं अशक्य होणार आहे! वाजपेयींना जशी स्वतःची इभ्रत आहे, तशीच प्रत्येक सभासदालाहि स्वतःची इभ्रत आहे. बारडोलीच्या शेतकऱ्यांसाठीं, सर्व गुजरातच्या शेतकऱ्यांसाठीं अधिकारसूत्रं हातीं आल्यापासून सरदार कसे झटताहेत तें पहा! आणि वऱ्हाडच्या शेतकऱ्यांविषयींची ही आपल्या सहकाऱ्यांची उपेक्षाबुद्धि पहा!—"

"खरं आहे तुमचं म्हणणं, उत्तमराव! पंडितजी जरी मुख्य प्रधानांपुढं वाकले नाहींत, तरी पक्षाच्या बहुमतापुढं वाकावंच लागेल त्यांना! आणि तें बहुमत जेव्हां उग्र स्वरूप धारण करून आजच्या सभेंत प्रकट होईल, तेव्हां प्रियदर्शननीं त्याला चुचकारण्याचा किंवा दबकावण्याचा प्रयत्न करूं नये! त्यांचं पंडितजी ऐकायला तयार नाहींत. आतां त्यांनीं पक्षाला जें काय करतां येण्यासारखं असेल तें करूं द्यावं!—"

वृद्ध दाजीसाहेब परिचारकानें पुढें केलेल्या टुवालाला हात पुशीत म्हणाले.

त्यांच्या त्या बोलण्याला प्रियदर्शन कांहीं उत्तर देणार, तोंच त्याच्याशीं बोलण्याची संधि मिळण्यासाठीं आसुसलेला अशोक हळूच त्याचा हात धरून म्हणाला—

"ताता, आद पत्ते नाई थेलणार तुमी आमच्या बलोबल?—"

प्रियदर्शननें त्याला चटकन् उचलून कडेवर घेतलें आणि त्याच्या हिरमुसलेल्या तोंडावरून हात फिरवीत म्हटलें—

"आज कीं नाहीं सभा आहे अशोक, आपल्या मोठ्या दिवाणखान्यांत. मला न् मामाला काम आहे आतां. तूं आज आत्याबरोबर पत्ते खेळ! उद्यां रात्रीं आम्हीं खूप खूप खेळं तुझ्याबरोबर—"

अशोकचा हिरमुसलेला चेहरा अगदीं उतरून गेला प्रियदर्शनचे ते उद्गार ऐकून. पण तो मुकाट्यानें प्रियदर्शनच्या कडेवरून खालीं उतरून म्हणाला—

"मग मी आंत दाऊं आत्याकडे? मामासुद्धां नाईं येत माझ्या बलोबल?—"

"नाहीं. त्याला काम आहे आज, अशोक!—"

प्रियदर्शननें म्हटलें. आणि लगेच तो परिचारकाकडे वळून म्हणाला—

"छोट्या धनीसाहेबांना पोंचवून दे ताईसाहेबांकडे—"

आणि ते चौघे प्रियदर्शनच्या अभ्यासिकेंत आले.

तिथें मधोमध असलेल्या वर्तुलाकार टेबलावर फळांनीं भरलेल्या प्लेटस्, विडयांचें तबक आणि सिगारेटस्चा डबा हें मुखशुद्धीचें साहित्य ठेवलेलें होतें.

ते आंत येऊन बसल्याबरोबर परिचारकानें ट्रे मधून आणलेले कॉफीचे पेले त्यांच्यापुढें ठेवले.

"तुमचं म्हणणं खरं आहे, दाजीसाहेब! पंडितजी माझं ऐकायला तयार नाहींत. त्यांचं वय न् राजकारणांतली त्यांची वडीलकी यामुळं कांहीं एका मर्यादेपलिकडे मी जाऊं शकत नाहीं त्यांच्याशीं वागतांना! तेव्हां पक्षांतील बहुमताचा प्रभाव जें काय करायला पाहिल, तें करायला त्याला मुभा देण्याशिवाय गत्यंतर नाहीं आतां!—"

"मी तरी तेंच म्हणतों! तुम्ही अध्यक्ष असल्यामुळं वादविवादांत भाग घेण्याचं तुम्हांला कारणच नाहीं. तुम्ही आज सर्वांना मनमोकळे-पणानं बोलायची संधि द्या म्हणजे झालं!—"

चांदीच्या तबकांतला एक सोनेरी वर्ख लावलेला विडा उचलीत दाजीसाहेब म्हणाले.

"मला वाटतं आम्ही दिवाणखान्यांत गेलेलं बरं आतां. पंचवीस मिनिटं आहेत सभेला अजून. पण मंडळी यायला सुरवात होईल हळु-

हळू. मी बरोबर नऊला पांच मिनिटं असतांना आपल्याला निरोप पाठवितों. चल उमा--"

दाजीसाहेब उमाकांताला घेऊन बाहेर पडले.

आतां त्या खोलींत फक्त ते दोघेच होते.

पण दोघेहि अगदीं स्तब्ध होते.

इतके कीं, टेबलावर ठेवलेल्या घड्याळाची टकटक स्पष्ट ऐकूं येत होती.

कांहीं वेळ त्या निःशब्द स्थितींत गेल्यावर उत्तमरावांनीं डब्यांतून एक सिगोरेट काढून ती शिलगावली; व तिचा एक झुरका घेऊन म्हटलें—

"प्रियदर्शन, ही रस्सीखेंच फार दिवस चालणं शक्य नाहीं!--"

"मलाहि जाणीव आहे या गोष्टीची!--"

त्यानें उठून फेऱ्या घालावयाला सुरवात केली.

जणूं कांहीं, त्याच्या मनाची आवरून धरलेली अस्वस्थता त्या हालचालीच्या रूपानें व्यक्त झाली.

"मला वाटतं, आपल्या दोघांपुरतं आपण कसं वागायचं तें एकदां ठरवून टाकावं आणि खाजगी बैठकींत आपलं म्हणणं मान्य होण्यासाठीं जें काय करतां येण्यासारखं असेल तें सगळं करावं--"

"तें आपण करीतच आहोंत नाहीं का पहिल्या दिवसापासून?--"

"होय. पण तेंच अधिक कणखरपणानं, अधिक निग्रहानं करावं लागणार आहे आतां. कारण पंडितजींचा विरोध दुहेरी आहे; न् त्यांना जर एकदां तरी आपल्या कणखरपणाची चुणूक आपण दाखविली नाहीं, तर ते लवकरच आवाक्याबाहेर जातील आपल्या! त्यांच्या पाताळयंत्रीपणापुढं आपला निभाव लागणार नाहीं!--"

"खरं आहे तुमचं म्हणणं! मी त्या खाणींच्या लिलांवाच्या

प्रकरणाची चौकशी करण्याचं काम सी. आय. डी. कडे सोंपवलं याबद्दल त्यांनीं थेटपर्यंत तक्रार केल्याचं वर्ध्याला कळलं मला !—"

"एलिचपूरचे आपले वामनराव पाटील तो प्रश्न उपस्थित करणार आहेत आजच्या बैठकींत —"

"पंडितजी उत्तर देतील त्यांना —"

"पण तुम्ही केलेल्या चौकशींत काय निष्पन्न झालं ?—"

"अजून चौकशी संपलेली नाहीं. त्या व्यवहारांत दहा हजार रुपये दाबल्याची जी वदंता आहे, ती चुकीची नाहीं असं म्हणायला जागा उत्पन्न झाली आहे या चौकशीनं एवढं मात्र खरं! पण तो सारा व्यवहार इतक्या शिताफीनं झाला आहे कीं, लेखी पुरावा अद्याप कांहींही हातीं लागला नाहीं—"

"पण लिलांव नेहमीपेक्षां पांच हजार रुपयांनीं कमी गेला याला काय उत्तर आहे त्यांच्याजवळ ?—"

"सरकारजवळ त्या प्रश्नाला अगदीं समर्पक उत्तर आहे. राधाकिसन शेठजींशिवाय दुसरा बोलीदारच मुळीं हजर नव्हता लिलांवाच्या वेळीं !--"

"काय समर्पक उत्तर! असले प्रकार सत्य आणि अहिंसा यांच्या नांवाखालीं चालावेत हं ! याच्यापेक्षां जुनी राजवट काय वाईट होती? तिच्यांत निदान सोनपितळाला सोनं म्हणण्याचा तरी अट्टाहास नव्हता! प्रियदर्शन, तुमचा खरोखरीच विश्वास आहे का गांधींच्या राजकारणावर ? तुम्हांला माहितच आहे,--टिळकांचा अनुयायी म्हणून मी राजकारणांत प्रवेश केला आणि त्यांचा अनुयायी म्हणूनच मी आजही राजकारणांत नांदतों आहें. गांधींचं तत्त्वज्ञान मला कधीं पटलं नाहीं; त्यांचं व्यक्तित्व मला कधीं आकर्षक वाटलं नाहीं. टिळकांच्याहि भोंवतालीं मतलबी लोक होते; व त्यांचा उपयोगहि त्यांनीं करून घेतला. पण टिळकांनीं आपल्या वर्तनाला किंवा राजकारणाला भलभलत्या तत्त्वांचा मुलामा

कधीं दिला नाहीं. उलट सत्य आणि अहिंसा यांचा उठल्या सुटल्या जप करणाऱ्या गांधींच्या गोतावळ्यांत आज जिकडे तिकडे ढोंगीपणा बोकाळलेला दिसतो! कॉंग्रेसच्या अंतःशुद्धीवर सदा न् कदा प्रवचनं झोडणाऱ्या चळवळीचं अंतरंग इतकं हिडीस असावं हं! खरंच! प्रियदर्शन, तुमचा विश्वास आहे या राजकारणावर?—"

"माझा विश्वास गांधींवर आहे, उत्तमराव! त्यांच्या राजकारणावर नाहीं! त्यांच्या भोंवतालचे लोक, त्यांचे अगदीं पट्टशिष्यसुद्धां पाताळयंत्री आणि मतलबी आहेत याचा अगदीं भरपूर अनुभव आला आहे मला गेल्या सात वर्षांत. त्यांतून आतां तर सत्ता हातांत आल्यामुळं त्यांचं हें खरं स्वरूप दिवसेंदिवस जास्त उघडकीला येत जाणार याबद्दलहि मला शंका नाहीं. पण म्हणून कांहीं गांधी स्वतः वाईट ठरत नाहींत किंवा अविश्वसनीयहि ठरत नाहींत. अंतराळांत एका विशिष्ट उंचीच्या पलिकडे गेल्यावर माणसाला जशी भोवंड येते म्हणतात, तसंच अत्यंत उच्च तत्त्वांच्या बाबतींतहि माणसांचं होत असतं! गांधींना ज्या तत्त्वांचं आचरण करणं आतां सुलभ झालेलं आहे, तीं उच्च तत्त्वं इतर माणसांना झेंपण्यासारखीं नाहींत; गांधींच्या अत्युच्च भूमिकेवर इतरांना चढणं शक्य नाहीं. पण हा गांधींचा दोष नव्हे—"

"मीहि तो त्यांचा दोष समजत नाहीं, प्रियदर्शन! पण त्यांनीं मनुष्यस्वभाव लक्षांत घेऊन का वागूं नये? दुसरं असं कीं, ते आपल्या तत्त्वांप्रमाणं वागतात असं जें तुम्ही म्हणतां तेंहि मला पटत नाहीं. स्वतःच्या पट्टशिष्यांच्या विसंगत किंवा मतलबी वर्तनावर जो पांघरूण घालतो, तो सत्याचरणी कसला? स्वतः पाप करणं आणि स्वतः निष्पाप राहून दुसऱ्यांच्या पापांवर फक्त पांघरूण घालणं यांत व्यवहाराच्या दृष्टीनं फरक करतां येण्यासारखा असला, तरी शुद्ध नैतिक दृष्टीनं हीं दोन्ही कृत्यं सारखींच निंद्य ठरतात. मला चांगलं आठवतं.–'गांधींशीं उपनिषदांची चर्चा करण्यासाठीं मी तिथळला गेलों होतों,' अशी राजाजींनीं दिलेली

मुलाखत जेव्हां मी वर्तमानपत्रांत वाचली, तेव्हां चीड आली होती मला त्या थापेबाजपणाची! हें सारं चालतं कसं गांधींना ? त्यांचं तें सत्य आणि अहिंसा हे निव्वळ मुखवटे आहेत !—"

"तुम्ही गांधींना अन्याय करता आहांत, उत्तमराव ! ते स्वत:ला नेहमीं साधक म्हणवीत असतात. सत्याच्या काय, अहिंसेच्या काय किंवा ब्रह्मचर्याच्या काय आचरणांत आपण अद्याप उणे आहोंत याची त्यांना तीव्र जाणीव आहे; व ती आजपर्यंत अनेकदां त्यांनीं बोलून दाखवली आहे, तुम्ही त्यांचे शुद्ध हेतु पहा; त्यांची सत्यसाधनासाठीं चाललेली धडपड पहा. त्या धडपडींत, त्या अपेशी साधनेंत त्यांचा मोठेपणा, त्यांचा महात्मेपणा आहे! त्यांच्या विसंगति किंवा त्यांचीं स्खलनं पाहून त्यांच्याविषयीं मत बनवूं नका. त्यांचे शिष्य ढोंगी आहेत; व या शिष्यांच्या तोंडावरले सोज्यळ मुखवटे दूर करतांच युरोपांतल्या झोटिंगांना आणि मुत्सद्द्यांना लाजविणारे क्रूर आणि कारस्थानी पुरुष दृष्टीला पडतील हें खरें. पण स्वतः गांधी तसे नाहींत; त्यांच्या तोंडावर कसलाहि मुखवटा नाहीं—"

"कदाचित् तुम्ही म्हणतां तें बरोबर असेल, प्रियदर्शन! कारण, तुम्ही गांधींच्या सहवासांत राहिलेले आहांत. पण मला मात्र तें पटत नाहीं. आतां कॉंग्रेस सत्ताधारी झालेली आहे. ही सत्ता, हा राज्याधिकार, हीच गांधींच्या सत्यनिष्ठेची आणि प्रामाणिकपणाची कसोटी ठरणार आहे. पाहूं या, या कसोटीला ते कितपत उतरतात ! ही गांधींच्या कसोटीची वेळ—"

"वेळ झाली सभेची —"

त्याच क्षणीं आंत आलेला चपराशी आदबीनें सलाम करून म्हणाला.

"ठीक आहे. चला उत्तमराव—"

# शेतसारा आणि दारूबंदी

'सागर व्हिला'मधील त्या भव्य आणि सुशोभित सभागृहांत आज असेंब्लींतील कॉंग्रेसपक्षाची सभा भरली होती. या सभागृहानें मध्यप्रांतीय राजकारणांतल्या अनेक घडामोडी गेल्या पंधरा वर्षांत पाहिल्या होत्या; व सर महादेव दिवंगत झाल्याला जरी आतां सात वर्षें होऊन गेलीं होतीं, तरी त्या सभागृहाच्या उत्तर भिंतीवर टांगलेलें त्यांचें पूर्णाकृति तैलचित्र—त्या चित्रांत रेखाटलेली त्यांची ती उभी उग्रगंभीर मूर्ति—ती पाहून असें वाटे कीं, ते जणूं आपल्यासमोर भाषण करावयाला उभे राहिले आहेत! सभागृहाच्या मध्यभागीं मोठें थोरलें काळेंभोर लंबवर्तुळ टेबल आणि त्याच्या भोंवतीं त्याच रंगाच्या सुबक पाऊणशें खुर्च्या असा त्या वेळच्या बैठकीचा थाट असे. आज खुर्च्यांच्या ऐवजीं सभागृहाला दिलेल्या फिक्या निळसर रंगाला शोभेल असा अस्मानी रंगाचा सुंदर काश्मिरी गालिचा अंथरलेला होता; व त्यावर

रांगेनें खादीचे पांढरेशुभ्र अभ्रे घातलेले लहान मोठे तकिये ठेवलेले होते.

सभागृहाच्या एकंदर सजावटींत सुंदरता आणि गांभीर्य यांचा उत्कृष्ट मिलाफ झालेला होता. सर महादेवांच्या तैलचित्राखालीं उंच संगमरवरी बैठकीवर त्यांचे गुरु ना. गोखले यांचा सुंदर अर्धपुतळा ठेवलेला होता. दक्षिण भिंतीवर सर महादेवांच्या तैलचित्राइतकेंच मोठें असें महात्माजींचें स्मितवदन पूर्णाकृति तैलचित्र टांगलेलें होतें; व त्याच्याखाली गोखल्यांच्या पुतळ्याशीं सदृश असा टिळकांचा अर्धपुतळा ठेवलेला होता. सभागृहाच्या पूर्वपश्चिम भिंतींवर राष्ट्रीय सभेच्या कांहीं प्रमुख अध्यक्षांचीं छायाचित्रें लावलेलीं होतीं; व या दोन रांगांच्या मधोमध दोन्ही दरवाजांच्या वरच्या बाजूला न्या. रानडे आणि दादाभाई नौरोजी यांचीं अर्ध रंगचित्रें टांगलेलीं होतीं. सभागृहाच्या चारी कोपऱ्यांत ग्रीक पद्धतीचे सुबक नग्न पुतळे उभे केलेले होते. त्यांच्या हातांतल्या पुष्पपात्रांत ठेवलेल्या गुच्छांचा मधुर सुगंध सर्वत्र दरवळला होता. कांचेच्या लखलखीत झुंबरांतून पडणारा विद्युत्प्रकाश सभागृहाची शोभा द्विगुणित करीत होता; व अगदीं वरच्या बाजूला भिंतीमध्यें बसवलेले विजेचे पंखे आवाजाचा उपद्रव न देतां वाऱ्याचा पुरवठा करीत होते. बैठकीवर बसलेल्या सभासदांच्या पुढें मधून मधून छोटया तिपायांवर वर्खाच्या विडयांचें तबक, सिगारेटचे डबे आणि पितळी रक्षापात्रें ठेवलेलीं होतीं.

सभागृहाच्या अग्रभागीं कॉंग्रेस पक्षाचा नेता प्रियदर्शन बसला होता. त्याच्या उजव्या हाताला लोडाशीं किंचित् ओठंगून पक्षाचे उपनेते पं. गदाधर वाजपेयी आणि डाव्या हाताला पक्षाचे चिटणीस श्री. दाजीसाहेब अमरावतकर बसले होते. तिघांच्याहि पुढें छोटेखानी बैठीं मेजें आणि त्यावर लिहिण्याचें साहित्य ठेवलेलें होतें. प्रियदर्शनच्या मागें त्याचा खाजगी चिटणीस उमाकांत बसला होता.

बरोबर नवाच्या ठोक्याला सभेच्या कामाला सुरवात झाली.

प्रथम प्रियदर्शननें हिंदींत प्रास्ताविक भाषण करून, पं. वाजपेयी हे सभेपुढें अंदाजपत्रकाचा कच्चा मसुदा मांडतील आणि त्यावर सभासदांनीं खुल्या दिलानें चर्चा करावी, अशी सूचना केली.

त्यानंतर आपल्या छातीवर लोंबत असलेलीं चष्म्याचीं भिंगें नाकावर बसवीत पंडितजी उभे राहिले. त्यांचा चेहरा स्मश्रुहीन होता; व त्यांच्या भुंवयाहि अगदीं विरळ असल्यामुळें त्यांच्या केसांचा शुभ्रपणा उठून दिसत असे. त्यांनीं आत्मविश्वासाच्या ऐटीनें एकवार सर्वत्र नजर फेकली; व हातांत धरलेल्या अंदाजपत्रकाच्या कच्च्या मुद्रणावृत्तीकडे बघून बोलावयाला प्रारंभ केला.

तोंच छत्तिसगडमधील एका हरिजन सभासदानें उठून विचारलें, "अंदाजपत्रकाच्या इंग्रजी प्रतीप्रमाणें हिंदी प्रत काढून ती सभासदांना का वाटण्यांत आली नाहीं? सर्वच सभासदांना कांहीं इंग्रजी येत नाहीं. शिवाय हिंदी ही राष्ट्रभाषा आहे; व निदान कॉंग्रेस पक्षाचं तरी सारं कामकाज हिंदींतूनच चाललं पाहिजे!—"

तो सभासद हें बोलत असतांनाच 'ये बात बराबर है। हिंदी में क्यौं नहि दिया?' असे उद्गार तीन चार सभासदांनीं मोठमोठ्यानें काढले.

ही गडबड चालू असतांना पंडितजी उभेच होते. ते आपल्या दोन्ही हातांनीं सभासदांना शांत रहाण्याची सूचना करीत म्हणाले, "आपण थोडे शांत रहा. आम्ही अंदाजपत्रक हिंदींतून छापून काढणार आहोंत. पण तें पक्षापुढें ठेवून त्याची मंजुरी घेतल्यानंतरच त्याला पक्केपणा येणार असल्यामुळें आम्ही त्याच्या या कच्च्या मसुद्याचें भाषांतर छापलें नाहीं. पण मी स्वतः आतां त्यांतले मुख्य मुद्दे आपल्याला समजावून सांगणार आहे—"

याप्रमाणें प्रस्तावना करून पंडितजी आपल्या हातांतल्या इंग्रजी

भाषणाच्या अनुरोधानें बोलावयाला सुरवात करणार, तोंच एक महाराष्ट्रीय सभासद उठून म्हणाला—

"मला कांहीं प्रश्न विचारायचे आहेत. अंदाजपत्रकावर चर्चा सुरू होण्यापूर्वी हे प्रश्न विचारण्याची परवानगी जर सभापतींनीं दिली, तर तें फार सोईचं होईल. कारण—"

"ये बात बिलकूल अच्छी है! अंदाजपत्रकावरील चर्चा किती लांबेल याचा कांहीं नेम नाहीं; व मग आम्हांला प्रश्न विचारण्याची संधि कदाचित् मिळणार नाहीं. म्हणून आम्हांला आधीं प्रश्न विचारण्याची परवानगी द्या. मी माझे प्रश्न चिटणिसांकडे आगाऊ पाठविलेले आहेत—"

त्या महाराष्ट्रीय सभासदाचें बोलणें संपण्यापूर्वींच एका हिंदी सभासदानें मध्येंच उठून गडबडीनें म्हटलें.

त्याचें बोलणें चालू असतांनाच 'ये बात सच है' 'इनको अनुमती दे दो' असे एकदम चार पांच आवाज उठले.

बिचारे वृद्ध पंडितजी तो गलका शांत होईल, अशा अपेक्षेनें वाट पहात पायांवर खडेच होते.

तो गलका कमी झाल्यावर पंडितजी बोलण्याचा प्रयत्न करणार, तोंच खादीचा शुभ्र युरोपियन पोषाख केलेला एक महाराष्ट्रीय सभासद उठून म्हणाला, "सभापति महाराज, आतांच दोन सभासदांनीं आपल्याला विनंती केली. मलाहि स्वतःला कांहीं प्रश्न विचारायचे आहेत. तेव्हां आपण जर आधीं प्रश्न विचारण्याची परवानगी द्याल, तर अंदाजपत्रकावरील चर्चा सुरळीत पार पडेल!—"

तो सभासद बोलत असतांनाच पंडितजी एक प्रकारच्या वैतागानें खालीं बसले.

प्रियदर्शन दाजीसाहेबांशीं बोलत होता.

पंडितजी खालीं बसतांच तो उठून म्हणाला, "मी आधीं प्रश्न विचारायला परवानगी देतों. मात्र मी अर्ध्या तासापेक्षां जास्त वेळ प्रश्नांना देणार नाहीं. कारण अंदाजपत्रकावरील चर्चा आज पुरी झाली नाहीं, तर त्याचा मसुदा पक्का करून न् तें छापून घेऊन परवां असेंब्लीला सादर करणें आम्हांला शक्य होणार नाहीं. ज्या सभासदांनीं चिटणिसांकडे आगाऊ प्रश्न पाठवले आहेत, त्यांच्या प्रश्नांचीं उत्तरें प्रथम दिलीं जातील—"

त्यानें याप्रमाणें प्रस्तावना केल्यावर दाजीसाहेब आपल्या हातांत प्रश्नांचा कागद घेऊन उभे राहिले.

तोंच तो प्रश्न पाठविणारा हिंदी सभासद म्हणाला, "आपण माझे प्रश्न वाचून दाखवूं नका. मी हजर आहें. मीं स्वतःच विचारतों—"

नंतर त्यानें आपल्या हातांतील कागद डोळ्यांसमोर धरून पुढील प्रश्न विचारले—

"मुख्य प्रधान ना. गव्हर्नरांकडे जेवायला गेले होते ही गोष्ट खरी आहे काय? जर ते गेले असतील, तर त्यांनीं जाण्यापूर्वी आपल्या सहमंत्र्यांचा सल्ला घेतला होता काय? त्यांचें हें कृत्य शिस्तभंगाच्या सदराखालीं येत नाहीं काय?—"

त्याला उत्तर द्यावयाला प्रियदर्शन जेव्हां उभा राहिला, तेव्हां सभागृहांत पूर्ण शांतता उत्पन्न झाली.

तो म्हणाला, "मी गव्हर्नरांकडे जेवायला गेलों होतों ही गोष्ट खरी आहे. या बाबतींत मी माझ्या सहमंत्र्यांचा सल्ला घेतला नाहीं. कारण ही बाब अत्यंत खाजगी आणि व्यक्तिगत आहे असें माझें मत आहे—"

"सरकारी अधिकाऱ्यांशीं कोणत्याहि प्रकारचे सामाजिक संबंध ठेवूं नयेत, असा कॉंग्रेसचा निर्बंध आहे ना?—"

दुसऱ्या एका हिंदी सभासदानें मध्येंच विचारलें.

प्रियदर्शन त्या प्रश्नाला उत्तर देणार, तोंच उत्तमराव उठून म्हणाले, "मद्रासचे मुख्य प्रधान ना. राजगोपालाचार्य हे मद्रासच्या गव्हर्नरां-बरोबर नुकतेच जेवल्याची बातमी आपण वाचलेली नाहीं काय?—"

त्याबरोबर 'ऐका, ऐका,' असे पांच सहा आवाज एकदम उठले.

तो हिंदी सभासद थोडासा गोंधळला आणि म्हणाला, "मी ती बातमी वाचली आहे. पण तो प्रकार आगगाडींत आणि अगदीं अचानक घडला—"

तेव्हां वृद्ध दाजीसाहेब उठून हंसत हंसत म्हणाले, "आमच्या मराठींत एक सुभाषित आहे. तें असं कीं, विस्तवावर जरी न कळत पाय पडला, तरी तो भाजल्याशिवाय रहात नाहीं! राजाजी मद्रासच्या गव्हर्नरबरोबर अचानक जेवले असले, तरी तें त्यांचं कृत्य शिस्तीच्या सदराखालीं आणतां येणार नाहीं असं नाहीं!—"

दाजीसाहेब बोलत असतांनाच पंडितजी उठून उभे राहिले आणि पोक्तपणानें माना वेळीत म्हणाले, "मुख्य प्रधानांनीं दिलेलं उत्तर कदाचित् कांहीं सभासदांना समाधानकारक वाटणार नाहीं. पण हा प्रश्न इतका क्षुल्लक आहे कीं, त्यावर आपण जास्त वेळ खर्च करावा असं मला वाटत नाहीं—"

ती जणूं कांहीं आपल्याला सूचना आहे असें समजूनच तो हिंदी सभासद "मला या बाबतींत आणखी वाद घालण्याची इच्छा नाहीं" असें म्हणून खालीं बसला.

त्याबरोबर पंडितजी धिम्मेपणानें आपली दृष्टि चौफेर टाकीत म्हणाले, "मला वाटतं, आतां कोणाला कांहीं प्रश्न विचारायचे नसतील. तेव्हां मी—"

"नाहीं. माझे प्रश्न मला अद्याप विचारायचेच आहेत—"

मघांचचा तो पाश्चात्य पोशाख केलेला महाराष्ट्रीय सभासद एकदम उठून म्हणाला.

तेव्हां पंडितजी थोडेसे रागावून उद्गारले, "आतां तुमचे सगळ्यांचे प्रश्न संपल्याचें सभापतींनीं जाहीर केल्यावरच मी बोलायला उभा राहीन !—"

नंतर तो महाराष्ट्रीय सभासद आपला चेहरा अत्यंत गंभीर करून म्हणाला, "पंडितजींच्या भाषणांत मला व्यत्यय आणावा लागला, याबद्दल मी मनापासून दिलगीर आहे. पण मी जे प्रश्न आतां विचारणार आहे, ते केवळ व्यक्तिविषयक नाहींत. प्रांताच्या आर्थिक हिताशीं त्यांचा निकट संबंध आहे—"

दाजीसाहेब चष्म्याच्या भिंगांतून दृष्टि वर काढून त्या सभासदाकडे पहात मध्येंच उद्गारले, "वामनराव, आपण जरा लवकर प्रश्न विचाराल, तर बरं होईल—"

"आपल्या सूचनेबद्दल मी आपला आभारी आहें. सभासदांचा जास्त वेळ घेण्याची माझी इच्छा नाहीं. मला फक्त एकच प्रश्न विचारायचा आहे. प्रांतिक सरकारनें नुकताच जो खाणींचा लिलांव केला, तो नेहमीपेक्षां पांच हजार रुपायांनीं कमी गेला, ही गोष्ट खरी आहे काय ?"

"होय, खरी आहे," दाजीसाहेबांनीं उत्तर दिलें.

त्याबरोबर 'कारणं सांगा', 'कारणं सांगा' असा एकदम गलका झाला.

तेव्हां प्रियदर्शननें उठून म्हटलें, "कारण अगदीं सरळ आहे. तें असं कीं, लिलांवाच्या वेळीं दुसरा बोलीदारच मुळीं हजर नव्हता—"

"हा लिलांव मुद्दाम पोळ्याच्या सणाच्या दिवशीं ठेवण्यांत आला ही गोष्ट खरी आहे काय?—"

"मुद्दाम ठेवण्यांत आला हें विधान बरोबर नाहीं. उद्योग-खात्यानं लिलावांची जी तारीख ठरविली, त्या दिवशीं पोळ्याचा सण असण्याचा योगायोग जुळून आला!--"

"प्रांतांतील लोकप्रिय पत्रांतून या लिलावाची जाहिरात देण्यांत आली नाहीं, ही वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झालेली तक्रार खरी आहे काय?--"

"नाहीं. काँग्रेस पक्षाच्या सर्व पत्रांतून ही जाहिरात दिली होती--"

"याचा अर्थ 'महाराष्ट्र' आणि 'उदय' या नागपूर-वऱ्हाड प्रांतांत जास्तींत जास्त प्रसार असलेल्या मराठी पत्रांत ही जाहिरात दिली नव्हती असा करायचा काय?--"

"मला नक्की माहित नाहीं. आम्ही या बाबतींत जास्त चौकशी करूं!--"

"लिलांवाच्या वेळीं जर दुसरा बोलीदार हजर नव्हता, तर लिलांवाची तारीख पुढें का ढकलली नाहीं?--"

"सरकारचा तसा रिवाज नाहीं!--"

"हें उत्तर तर अगदीं नोकरशाही थाटाचं झालं!--".

एक सभासद बसल्या जागीं हळूच पण सर्वांना ऐकूं जाईल अशा रीतीनें उद्गारला.

त्यावरोबर सभागृहांत हंशा पिकला.

तो हंशा ओसरल्याबरोबर वामनरावांनीं पुढें विचारलं, " 'हिंदुस्थान लिमिटेड' या अगदीं अलिकडेच स्थापन झालेल्या एका नव्या कंपनीनें लिलांवाच्या वेळीं राधाकिसन शेठजींच्या वतीनें बोली केली ही गोष्ट खरी आहे का?--"

"होय, खरी आहे--"

" या कंपनीचे अध्यक्ष आणि मॅनेजिंग डायरेक्टर हे उद्योग-मंत्र्याचे खाजगी स्नेही आहेत--"

" ते माझेहि खाजगी स्नेही आहेत!--"

" तें जाणतों मी! पण मला प्रश्न पुरता विचारूं द्या! उद्योग-मंत्र्यांचा या नव्या कंपनीला आश्रय आहे ही गोष्ट खरी आहे काय?--"

तो प्रश्न ऐकतांच पंडितजी एकदम उठून रागानें उद्गारले, " मी त्या कंपनीचा भागीदार सुद्धां नाहीं!--"

त्यावर वामनराव अगदीं शांतपणानें म्हणाले, " भागीदार आणि आश्रयदाता या दोन अगदीं भिन्न चिजा आहेत! माझा प्रश्न असा होता कीं, नागपूर प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या अध्यक्षाच्या नेतृत्वाखालीं स्थापन झालेल्या या नव्या कंपनीला उद्योगमंत्र्यांचा आश्रय आहे कीं नाहीं?-"

" प्रांतांत सुरू होणाऱ्या सर्वच नव्या उद्योगधंद्यांना आश्रय देणें हें उद्योगमंत्र्यांचें एक कर्तव्य आहे!--"

प्रियदर्शनच्या तोंडून हें उत्तर बाहेर पडतांच 'ऐका ऐका' असे उपरोधपूर्ण आवाज सभागृहांत उठले; व थोडासा हंशाहि पिकला.

" हिंदुस्थान लिमिटेड या कंपनीनें कोणते नवीन उद्योगधंदे हातीं घेतले आहेत याची माहिती सभासदांना मिळेल काय?--"

" ज्या सभासदांना त्या माहितीची जरूर असेल, त्यांनीं ती कंपनीकडून मागवावी!--"

"ज्यांच्यातर्फे हिंदुस्थान लिमिटेड कंपनीनें ही बोली केली, ते राधाकिसन शेठ वऱ्हाडांतील हरिजन संघाचे अध्यक्ष आहेत. त्यांच्याकडून हिंदुस्थान लिमिटेड कंपनीला या किफायतशीर लिलांवाबद्दल किती कमिशन मिळालें हें सरकारला माहित आहे काय?--"

" सरकारला त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं!"

" या व्यवहारांत सरकारचें जें पांच हजार रुपयांचें नुकसान झालें, तें उद्योगमंत्र्यांच्या पगारांतून भरून घेतलें जाण्याची

व्यवस्था होईल काय ?—"

"ऑर्डर! ऑर्डर! तुमचा हा प्रश्न गैरशिस्त आहे, वामनराव! प्रश्न विचारण्यासाठीं दिलेली मुदतहि संपली आहे—"

तोंच दुसरा एक वऱ्हाडचा सभासद उठून म्हणाला, "पंडितजींना जर या बाबतींत कांहीं खुलासा करण्याची इच्छा असेल, तर आपण त्यांना तशी संधि का देत नाहीं ?—"

या त्याच्या प्रश्नावर पंडितजी आतां काय बोलतात, याकडे सर्वांचे डोळे लागले.

पण प्रियदर्शन म्हणाला, "ज्या कंपनीनें लिलावांत बोली केली, तिच्याशीं पंडितजींचा कोणत्याहि प्रकारचा संबंध नाहीं हें आपण त्यांच्या तोंडून ऐकलेंच आहे. यापेक्षां आणखी कोणता खुलासा आपल्याला त्यांच्या तोंडून हवा आहे ? मला वाटतें, अशा तऱ्हेच्या प्रश्नोत्तरांत अधिक वेळ घालविण्यापेक्षां आपण आतां जर अंदाजपत्रकावरील चर्चेला सुरुवात केली तर बरें होईल. तो विषय अत्यंत महत्त्वाचा आहे—"

नंतर सभागृह अस्वस्थ असतांनाच पंडितजी आपल्या भाषणाची कच्ची प्रत हातांत घेऊन बोलावयाला उभे राहिले. पण त्यांचा तो मघांचचा उल्हास आतां उरला नव्हता. त्यांचे हात कांपत असलेले स्पष्ट दिसत होते; व त्यांचा आवाजहि नेहमींप्रमाणें सुरेल आणि स्वच्छ येत नव्हता. त्यांनीं अंदाजपत्रकांतील आंकडेमोड समजावून सांगावयाला सुरवात करतांच अर्धे अधिक सभासद उठून गेले. त्यांच्यापैकीं कांहीं बगीचांत हिंडून गप्पा मारीत होते; तर कांहीं व्हरांड्यांत ठेवलेल्या वेताच्या खुर्च्यांवर बसून चकाट्या पिटीत होते. कांहीं वेळानें त्यांच्या त्या चकाट्या इतक्या मोठ्या आवाजांत येऊं लागल्या कीं, शेवटीं प्रियदर्शनला घंटा वाजवून सर्वांना आंत येण्याचा इषारा देणें भाग पडलें.

बाहेर रेंगाळत असलेले बहुतेक सर्व सभासद आंत आले, तेव्हां पंडितजींचें भाषण संपत आलें होतें.

पण तें पुरतें संपण्याची वाट पहाण्याचीहि कांहीं सभासदांची तयारी नव्हती.

त्यांच्यापैकीं एकजण आंत आल्याबरोबर म्हणाला, "पंडितजीनीं सबंध अंदाजपत्रकाचं हिंदी भाषांतर करण्याची गरज नाहीं. अंदाजपत्रकाची इंग्रजी प्रत बहुतेकांनीं वाचलीच आहे. तेव्हां पंडितजीनीं जरी करवाढ आणि शेतसाऱ्याचा प्रश्न यांबद्दलचा भाग समजावून सांगितला तरी पुरे—"

"प्रांताच्या जमाखर्चाविषयीं सभासदांना इतकी बेपर्वाई असावी याबद्दल मला खेद वाटतो!—"

पंडितजी एकदम रागानें उद्गारले.

त्याबरोबर बॅ. वामनराव पाटील उठून म्हणाले, "हा प्रश्न बेपर्वाईचा किंवा खेदाचा नाहीं; वेळेचा आहे. आमच्यांपैकीं बहुतेकांनीं अंदाजपत्रक वाचलें आहे. तेव्हां त्यांतील प्रत्येक तपशील समजावून सांगत बसण्यापेक्षां आतां चर्चेला सुरवात केलेली बरी असं आमचं म्हणणं आहे!—"

"ठीक आहे. मी बसतों. आपण चर्चेला सुरवात करा!—"

पण वामनरावांनीं यत्किंचितहि न वरमतां बोलावयाला प्रारंभ केला. ते म्हणाले, "मी ज्या वेळीं हें अंदाजपत्रक वाचलें, त्या वेळीं पंडितजींसारख्या मुरब्बी कॉंग्रेस पुढाऱ्यानें तें तयार केलें नसून, फायनॅन्स सेक्रेटरीनें तें तयार केलें असावें अशी मला दृढ शंका आली!—"

"आपण व्यक्तिविषयक उल्लेख न करतां बोलाल तर फार बरं होईल, वामनराव!—"

प्रियदर्शन मध्येंच म्हणाला.

"अंदाजपत्रकावर बोलतांना तें तयार करणाऱ्या व्यक्तीचा उल्लेख न करणं अशक्य आहे असं मला वाटतं! माझी या अंदाजपत्रकाविरुद्ध पहिली तक्रार अशी आहे कीं, त्यांत शेतकऱ्यांसाठीं कांहींहि केलेलं नाहीं—"

"नाहीं कसं ? तहकुबी दिली आहे, माफी दिली आहे, तगाई कर्ज देण्याची व्यवस्था केली आहे, गुरचराईंचे दर कमी केले आहेत–"

"हें तर सगळं पूर्वीचेंहि सरकार करीत असे. मग त्या नोकरशाही राजवटींत आणि काँग्रेस मंत्रिमंडळांत फरक काय ?—"

"फरक इतकाच कीं, काँग्रेस मंत्रिमंडळ या अंदाजपत्रकाच्या हिंदी आणि मराठी प्रती काढून वाटील !— "

एक सभासद बसल्या जागेवरूनच उद्गारले.

त्याबरोबर सभागृहांत जोराचा हशा पिकला.

"माझ्या अंदाजपत्रकाची जर अशा रीतीनें टवाळी होणार असेल, तर मला इथं थांबण्याचं कारण दिसत नाहीं—"

पंडितजी रागारागानें उद्गारले.

"माझा टवाळी करण्याचा मुळींच उद्देश नाहीं. माझी या अंदाजपत्रकाविरुद्ध मुख्य तक्रार ही आहे कीं, काँग्रेसच्या ब्रीदाला आणि आश्वासनांना शोभेल अशी कोणतीहि गोष्ट त्यांत शेतकऱ्यांसाठीं केलेली नाहीं. शेतकऱ्यांना असह्य झालेला सारा जर सरकारनें सरसकट पंधरा टक्यांनीं तरी कमी केला असता, तर मी नव्या करवाढीविरुद्ध चकार शब्दहि काढला नसता. प्रांतांतील शेतकरी वर्ग गेल्या आठ वर्षांच्या नापिकीनें त्रस्त झालेला असून, जें थोडेंसें पीक येतें त्यालाहि मंदीमुळें भाव येत नाहीं. ही स्थिति लक्षांत घेऊन शेतसारा पंधरा टक्के तरी कमी करायला नको होता काय ? शिवाय वऱ्हाडांतील सात तालुक्यांतला–"

"अहो, नरसिंगपूर भागांतील शेतकऱ्यांना विसरूं नका. तेथेंहि जादा सारावाढ झालेली आहे !—"

एक हिंदी सभासद मध्येंच ओरडून म्हणाले.

"मी प्रांताचा कोणताच भाग विसरलों नाहीं. फक्त पंडितजींनीं काय केलेलें नाहीं आणि काय करायला पाहिजे होतें याची आठवण त्यांना देत आहे !—"

त्याबरोबर 'ऐका' 'ऐका' असे आवाज सभागृहांत उठले.

"माझे मित्र श्री. उत्तमराव देशमुख हे प्रांताचे महसूलमंत्री आहेत. ते शेतकऱ्यांच्या जातीचे आणि रक्ताचे आहेत. त्यांना वऱ्हाडांतील भीषण परिस्थितीची पूर्ण कल्पना आहे. त्यांनीं पंडितजींना जर त्या परिस्थितीची जाणीव करून दिली असती, तर, मला वाटतं, पंडितजींनीं वऱ्हाडला थोडी तरी दया दाखवली असती!—"

"उत्तमराव आपल्या कर्तव्याला जागले नाहींत असं तुम्हाला म्हणायचं आहे काय?—"

वऱ्हाडच्या एका सभासदानें मध्येंच विचारलें.

"तें मी कसं सांगू? मंत्रिमंडळाच्या खाजगी बैठकींत काय घडतें, किंवा मंत्री एकमेकांचा सल्ला कितपत घेतात, याची माहिती थोडीच आपल्याला पुरवण्यांत येते? पण उत्तमरावांनीं जर वऱ्हाडांतल्या शेतकऱ्यांची बाजू—"

"वऱ्हाडांतल्या का? सर्व प्रांतांतल्या म्हणा!—"

"बरोबर! सर्व प्रांतांतल्या शेतकऱ्यांची बाजू पंडितजींपुढें मांडली असती, तर त्यांचें अंदाजपत्रक यापेक्षां अगदीं निराळ्या प्रकारचें झालें असतें अशी माझी खात्री आहे!—"

"आणि, समजा, उत्तमरावांनीं शेतकऱ्यांची बाजू मांडूनहि जर पंडितजींनीं अंदाजपत्रक तयार करतांना ती लक्षांत घेतली नसेल तर?—"

"तर ती अत्यंत दुःखाची गोष्ट आहे असंच आपल्याला म्हणावं लागेल! पण आपल्या दिवाणांनीं अंदाजपत्रक तयार करतांना एकमेकांचा विचार घेतला नसेल असं मला वाटत नाहीं. मग खरा प्रकार काय असेल तो असो!—"

"जो काय प्रकार खरोखरी घडला असेल, तो उत्तमरावांनीं का सांगू नये?—"

"ऑर्डर, ऑर्डर ! वामनरावांना बोलूं द्या. त्यांच्या भाषणांत तुम्ही अडथळे उत्पन्न करूं नका !–"

प्रियदर्शनने त्या वारंवार मध्यें बोलणाऱ्या सभासदाला उद्देशून म्हटलें.

"छे, छे ! त्यांच्या मध्यें बोलण्यानें माझ्या भाषणांत अडथळे उत्पन्न होत नाहींत. उलट त्याला चालना आणि चेतना मिळते !––"

वामनरावांनीं प्रियदर्शनला दिलेल्या या उत्तरामुळें हंशा पिकला.

तो थांबल्यावर वामनराव म्हणाले, "मला ज्या एका मुद्द्याकडे सभागृहाचें लक्ष वेधायचें होतें, त्यावर मी बोललों आहे. शेतसारा कमी होणार नसेल, तर नव्या करवाढीला पाठिंबा देणें आम्हांला कठीण जाणार आहे. हें अंदाजपत्रक जर जसेंच्या तसेंच असेंब्लीला सादर करण्यांत येणार असेल, तर खुल्या अधिवेशनांत त्यावर टीका करण्याची आणि काट आणण्याची परवानगी आम्हांला देण्यांत यावी, अशी माझी सभापतींना विनंती आहे. वऱ्हाडांतले आम्ही सारे सभासद—अर्थात् दिवाण वगळून ! (हंशा)—या अंदाजपत्रकाच्या विरुद्ध आहोंत. आमच्यासारखेंच मत महाकोसलमधील बहुतेक सभासदांचें असलें पाहिजे, असें मला वाटतें." (ऐका, ऐका)

वामनरावांच्या मागून जबलपूर खेडेविभागाचे सभासद पं. कुंजविहारी शुक्ल हे बोलावयाला उभे राहिले.

ते म्हणाले, "पं. वाजपेयी हे वकील आहेत. त्यांचा शेतकऱ्यांशीं संबंध आला असला, तरी तो फक्त कोर्टकचेऱ्यांमध्यें ! शेतकऱ्यांच्या दुर्धर परिस्थितीची त्यांना कल्पना नाहीं. नाहीं तर अशा प्रकारचें नोकरशाही राजवटीला शोभणारें अंदाजपत्रक त्यांनीं तयार केलें नसतें. नरसिंगपूर वगैरे भागांत जी जादा सारावाढ झाली आहे ती कमी करण्याचा सवाल त्यांच्या नजरेंतून अजिबात सुटला याचें मला नवल वाटतें !––"

"त्यांत नवल कांहींच नाहीं. तुम्ही आतांच सांगितलं कीं, पंडितजी हे शेतकरी नाहींत, तर कायदेपंडित आहेत. अर्थात् त्यांना स्वतःला शेतकऱ्यांपासून फी घेण्याची संवय झालेली असल्यामुळें त्याच्यापासून सारा घेणाऱ्या सरकारची बाजू तेवढी त्यांनीं सहानुभूतीनं लक्षांत घ्यावी--"

"ऑर्डर, ऑर्डर! तुम्ही मध्यें बोलूं नका!"

"माझं भाषण संपलंच होतं. त्यांना बोलूं दे!--"

"माझंहि भाषण संपलंच आहे!--" (हंशा)

यानंतर हिंदी आणि मराठी मिळून आणखी दोन तीन सभासदांचीं याच प्रकारचीं भाषणें झालीं. त्या प्रत्येक भाषणागणिक सभागृहांतील गलका आणि टिंगलखोर विधानें करण्याची प्रवृत्ति सारखी वाढतच होती. शेवटीं प्रियदर्शननें ती पुनरुक्तिपूर्ण चर्चा बंद केल्यावर पंडितजी उत्तर द्यावयाला उभे राहिले.

त्यांनीं प्रथम शेतकऱ्यांविषयीं आपल्याला किती कळकळ वाटते याचें वर्णन करावयाला सुरवात केली. तें वर्णन चालूं असतांना एक सभासद मध्येंच उद्गारला--

"मग ही कळकळ अजूनहि अंदाजपत्रकामध्यें भरीव स्वरूपांत व्यक्त झाली, तर आम्हांला हवीच आहे!--"

त्याबरोबर पंडितजी थोडे रागानेंच मुख्य मुद्द्याकडे वळले. तो मुद्दा असा होता कीं, प्रांतांत एकदम चार ठिकाणीं दारूबंदी करण्याचें ठरविल्याकारणानें उत्पन्नांत जी तूट येणार आहे, तिच्यामुळें शेतसारा कमी करणें अशक्य झालें आहे--

ते हा मुद्दा विशद करीत असतांनाच एका सभासदानें उठून विचारलें, "दारूबंदीचा कार्यक्रम पुढं ढकलतां येणार नाहीं का? यंदाच्या वर्षीं आपण दारूबंदी न केली, तर काय हरकत आहे?--"

"दारूबंदीचा कार्यक्रम हा खास महात्माजींचा कार्यक्रम आहे; व म्हणून सर्वच प्रांतांच्या अंदाजपत्रकांत त्या कार्यक्रमावर विशेष भर दिलेला आहे. अशा स्थितींत आपल्या प्रांतानं दारूबंदीचा कार्यक्रम तहकूब करणं कसं योग्य दिसेल ?—"

पंडितजींच्या या गंभीर आवाजांत सावकाश दिलेल्या उत्तरानें क्षणमात्र सभागृह अगदीं निःशब्द करून सोडलें.

आणि पंडितजींच्या त्रस्त मुखावर तत्क्षणींच विजयसूचक हास्यरेषा उमटली.

तोंच वामनरावांनीं विचारलें, "अंदाजपत्रक तयार करतांना महात्माजींची इच्छा आणि मतं यांना मान द्यायचा कीं प्रांताची परिस्थिति आणि निकड लक्षांत घ्यायची ?—"

हा प्रश्न त्यांच्या तोंडून बाहेर पडतांच 'ऐका' 'ऐका' असे आवाज एकदम चारी बाजूंनीं उठले.

तो गलका शांत होतांच पंडितजी म्हणाले, "कॉंग्रेस मंत्रिमंडळें हीं महात्माजींचीं मंत्रिमंडळें आहेत—"

"महात्माजी मतदार नाहींत. कांग्रेस मंत्रिमंडळें हीं शेतकऱ्यांच्या बहुमताच्या जोरावर निवडून आलेलीं मंत्रिमंडळें आहेत!—"

"मला मान्य आहे आपलं विधान!"

पंडितजी उपरोधानें हंसून म्हणाले.

पण त्यांच्या त्या उपरोधिक हास्याकडे दुर्लक्ष करून वामनराव म्हणाले, "मग जीं मंत्रिमंडळं शेतकऱ्यांच्या बहुमताच्या जोरावर निवडून आलीं, त्यांनीं प्रथम शेतकऱ्यांचं कल्याण पहायला नको काय?—महात्माजींचीं मतं आणि शेतकऱ्यांचं कल्याण यांच्यांत जर विरोध येत असेल—"

"मला वाटतं, वामनराव तुम्ही गैरसमजानं बोलत आहांत. पंडितजींना फक्त एवढंच सुचवायचंय कीं, दारूबंदी करण्याच्या बाबतींत कॉंग्रेस वचनबद्ध झालेली असल्यामुळं त्यावर अंदाजपत्रकांत भर दिला आहे—"

प्रियदर्शननें वादाची तीव्रता कमी करण्याच्या उद्देशानें म्हटलें.

"मी गैरसमजानं बोलत नाहीं. या वादांत महात्माजींच्या नांवाचा उपयोग करून पंडितजींनीं आमच्यावर दडपण आणण्याचा, आम्हांला गप्प बसविण्याचा प्रयत्न केला—"

"ऑर्डर, ऑर्डर! तुम्ही गैरशिस्त बोलूं नका—"

"ठीक आहे. 'लोकहितां'तल्या बातमीवरून असं दिसतं की, खुद्द आपल्यालाहि महात्माजींचा दारूबंदीविषयींचा आग्रह मान्य नाहीं! दारूबंदीचं महत्त्व आम्हांला समजत नाहीं, असं नव्हे. पण शेतसाऱ्याचा प्रश्न आम्हांला त्यापेक्षां अधिक निकडीचा, अधिक जिव्हाळ्याचा वाटतो. पंडितजी जर शेतकऱ्यांसाठीं कांहींहि करायला तयार नसतील, तर असेंब्लींत आम्हांला अंदाजपत्रकावर टीका करायला परवानगी मिळाली पाहिजे!"

'ऐका, ऐका,' असा गलका आतां पुन्हा सुरू झाला; व वामनरावांच्या मागोमाग दोन तीन सभासदांनीं उठून त्याच आशयाची विनंती प्रियदर्शनला केली.

ही गडबड चालू असतांनाच दाजीसाहेब पंडितजींजवळ बसून हळुहळू त्यांच्याशीं कुजबुजत होते. ते प्रियदर्शनशींहि नंतर बोलले; व मग प्रियदर्शन उत्तमरावांशीं दोन तीन मिनिटें बोलून उभा राहिला.

तो म्हणाला, "आपली टीका आम्ही सर्वांनीं काळजीपूर्वक ऐकली आहे. पंडितजी आतां या बाबतींत जो खुलासा करणार आहेत, तो ऐकल्यावरहि जर आपल्याला अंदाजपत्रकावर टीका करण्याची गरज वाटली, तर काय करायचं तें मागाहून ठरवूं—"

नंतर पंडितजी बोलावयाला उभे राहिले. प्रथम टीकाकारांच्या स्पष्टोक्तिबद्दल त्यांचे आभार मानून ते म्हणाले, "दारूबंदीच्या कार्यक्रमामुळेंच शेतकऱ्यांसाठीं कांहीं करणें आम्हांला शक्य झालें नाहीं. पण ज्या अर्थीं आपण सर्वांनीं शेतसारा कमी करण्याची मागणी इतक्या आग्रहानें

केली आहे, त्या अर्थीं दारूबंदीच्या कार्यक्रमांत फरक करून शेतसारा थोडा तरी कमी करण्याचा प्रयत्न आम्ही करूं! मात्र ही घोषणा आतांच निश्चित रीतीनें करणें शक्य नाहीं. सरकार सर्व परिस्थितीची पहाणी केल्यावर असेंब्लीच्या या बैठकींत केव्हां तरी आपला निर्णय जाहीर करील, एवढें आश्वासन मी आपल्याला देतों."

हा खुलासा करून पंडितजी खालीं बसले.

नंतर प्रियदर्शन उठून म्हणाला, "पंडितजींनीं आतां दिलेलें आश्वासन मोघम आहे. पण यापेक्षां निश्चित असें कांहीं आज बोलणें शक्य नाहीं, हें आपल्याला पटेल अशी मला आशा आहे. तेव्हां असेंब्लीच्या बैठकींत अंदाजपत्रकावर टीका करण्याचा आग्रह न धरतां आपण आम्हांला संधि देऊन पाहावी, अशी मी आपल्याला विनंती करितों."

"मुख्य प्रधानांची ही विनंती सभासदांना निस्संशय मान्य होईल—"

बॅ. वामनराव पाटील यांनी लगेच उठून सांगितलें आणि रात्र बरीच झाल्यामुळें सभा तहकूब करण्यांत आली.

त्यानंतर प्रियदर्शनच्या विनंतीनुसार सर्व सभासद कॉफी पिण्यासाठीं आंतल्या दिवाणखान्यांत गेले.

तेथे कॉफीपान आणि गप्पा रंगांत आल्या असतां उत्तमराव वामनरावांच्या पाठीवर थाप मारून हळूच म्हणाले, "वामनराव, तूं आज छान मात केलीस बुढ्ढयावर!—"

"चुकतोस तूं उत्तमराव! तो बुड्ढा म्हणजे चाणक्य आहे अगदीं! शेवटपर्यंत पदरांत खरोखरी किती पडेल याबद्दल शंकाच आहे मला! बाकी बडनेऱ्याला कांहीं आतां दारुबंदी होत नाहीं हें खास!—"

"का रे?—"

"आपला उमरावतीचा लाला गेले दोन दिवस इथं तळ देऊन बसला आहे! त्याची तपश्चर्या फळाला येणार या निमित्तानं!"

# सुसंस्कृत पशुत्वाची भेसूर प्रतीति

मी किती भीत होतें.--पण एका शब्दानं जाणीव नाहीं दिली मोहननीं मला. मला सारखं वाटे, पपांकडून सारं तशा रीतीनं ठरवून घेतल्याबद्दल ते मला बोंचून खातील. पण छे! पूर्वी कधीं आम्ही भांडलो नाहीं, आमच्यांत कधीं कांहीं कुरबुर झाली नाहीं अशा रीतीनं वागले नंतर ते. लग्नापूर्वीच्या त्या आपल्या सगळ्या लाजिरवाण्या वर्तनावर हा जो विस्मरणाचा पडदा त्यांनीं टाकला, तो कोणत्या उद्देशानं? आपलं वर्तन अप्रशस्त झालं या जाणिवेनं कीं जें आपल्यावर लादण्यांत आलं तें गोड करून घेण्याच्या बुद्धीनं? लग्नानंतर संध्याकाळीं झालेल्या उपाहाराच्या वेळीं मी जेव्हां कुंकू लावून बाहेर आलें, तेव्हां किती आश्चर्य वाटलं त्यांना! आनंदानं त्यांचे डोळे कसे फुलून गेले अगदीं! मला वाटतं, त्यांनीं कुंकुमतिलक लावलेली ख्रिस्ती स्त्री कधीं पाहिलेली नव्हती! वास्तविक ममीनं ती कल्पना सुचवली.--मला पसंत नव्हतं

कुंकू लावणं.—पण तिनं आपल्या हातानं माझ्या कपाळीं कुंकुमतिलक लावला आणि मला बाहेर पाठवली. नवऱ्याला खूष ठेवण्याचं शिक्षण बायका किती सहजासहजीं देतात आपल्या मुलींना!

दुसऱ्या दिवशीं आम्ही शेगांवला गेलों. संध्याकाळीं प्रार्थनेनंतर बापूंसमोर जेव्हां आम्ही गेलों,—त्यांना यांनीं सांगितलेलं होतं सगळं कांहीं आधींच!—तेव्हां किती प्रसन्न नेत्रांनीं त्यांनीं माझ्याकडे पाहिलं! जगांतली सगळी अनघता, सगळं वात्सल्य आणि सगळी मंगलता त्या डोळ्यांतून माझ्याकडे पहात होती, माझ्यावर बरसत होती जणूं! माझ्या अंगावरले खादीचे शुभ्र कपडे पाहून त्यांना झालेला आनंद!—मला वाटतं, मोगऱ्याचीं ताजीं फुललेलीं पांढरीं सफेत फुलं बघून मला सुद्धां कधीं आनंद झाला नसेल इतका! चार पांचच वाक्यं बोलले ते.—"ही नव्या संयुक्त जीवनाची जबाबदारी आहे; व एकमेकांसाठीं आत्यंतिक त्याग करायला तयार असल्याशिवाय संयुक्त जीवन कधीं यशस्वी होत नाहीं," या त्यांच्या मेघगर्जनेसारख्या गंभीर शब्दांनीं माझ्या सगळ्या भावना हादरवून सोडल्या! मोहननीं लग्नानिमित्त हरिजन निधीला शंभर रुपयांची देणगी दिली. आणि बापूंनी मला आपल्या नेहमींच्या वापरांतला एक चरखा दिला. तो देतांना ते हंसत हंसत म्हणाले, "रजनी, पुन्हा जेव्हा तूं मला भेटायला येशील, तेव्हां या चरख्यावर कांतलेल्या सुताची साडी नेसून ये!"

शेगांवहून परत येतांना मला सारखं वाटत होतं, पवनारच्या बंगल्यावर थांबण्याची गोष्ट काढतील ते. पण त्या बंगल्यावरून जातांना दोन्ही वेळां किती वेगानं मोटार नेली त्यांनीं! मला सारखं वाटत होतं, त्या बंगल्यावर थोडा वेळ थांबावं आणि गच्चीवरून नदीची शोभा डोळे भरून पहावी, तिच्या फेनल धाराप्रवाहाचं जोडप्यानं दर्शन घ्यावं. आमच्या पहिल्या मीलनाची साक्षीदार आहे ती! प्रणयी स्त्रीपुरुषांच्या मीलनाला नदीइतकी योग्य साक्षीदार दुसरी कोणती मिळूं शकेल?

काकासाहेबांनीं 'लोकमाता' म्हटलं आहे नद्यांना. स्त्री ही सुद्धां लोकमाताच नाहीं कां? जीवनांतलं सगळं सातत्य, सगळी सफलता आणि सगळं अद्वैत यांचं नदी हें प्रतीक नव्हे कां मूर्तिमत? जीवन सतत गतिमान् असावं लागतं;--तें गतिमान् असण्यांतच त्याची शुचिता आणि सफलता आहे. नदी म्हणजे जीवनाच्या त्या अविरत गतीचं मूर्तिमंत प्रतीक! आणि मीलनांतलं अद्वैत? नदीइतकं सहजसुंदर तें कुणाला साधलं आहे का कधीं? त्या मीलनांतली पूर्णता, समरसता!--स्त्रीपुरुषांना आपल्या प्रणयजीवनांत ती आणतां येईल का कधीं? मला सारखं वाटत होतं, पवनारच्या त्या धाराप्रवाहांत एकवार जोडप्यानं उतरावं आणि त्या लोकमातेचे तुषाराश्रु आपल्या अंगावर घेऊन पुलकित, पुनीत व्हावं! पण ते कांहीं थांबले नाहींत.--आणि मला कांहीं त्यांना सुचवायचा हिय्या झाला नाहीं.

शेगांवहून परत आल्यावर आम्ही लगेच छिंदवाड्याला गेलों. मधुचंद्रासाठीं त्यांच्या मनांत पचमढीला जायचं होतं खरोखरी. पण पचमढीचा सरकारी ऋतु सुरू व्हायला अद्याप महिना होता पुरता. म्हणून छिंदवाड्याला अगदीं गांवाबाहेर एकीकडे असलेला तो बंगला त्यांनीं आठ दिवसांसाठीं घेतला होता. संध्याकाळीं आम्ही जेव्हां त्या बंगल्यांत जाऊन पोंचलों, तेव्हां चांगलाच गारवा आला होता हवेंत; व वाऱ्याच्या झुळकांनीं डोलणाऱ्या झाडांतून चांदण्याचे कवडसे भुईवर पडले होते. वायलचं पातळच जणु नेसली होती भूमि; न् अवखळ वारा सारखा त्याच्याशीं खेळत होता. त्यांनीं आल्याबरोबर स्नान केलं आणि मलाहि करायला लावलं. जेवतांना ते सारखे बोलत होते, हंसत होते. जेवणानंतर आम्ही झाडाला बांधलेल्या हॅमॉकवर पडून खूप गप्पा मारल्या. मला तो गारवा आतां त्रासदायक वाटत होता. पण ते गप्पांत इतके रंगले होते--मला हिय्या होईना त्यांना आंत चला म्हणायचा! चंद्रकोर अगदीं क्षितिजावर आली; झाडांचा काळेपणा सांद्र होत चालला;

भुई सांवल्यांनीं झांकून गेली; वाऱ्याच्या झुळका गारच गार येऊं लागल्या! एक प्रकारचा उदासपणा, एक प्रकारची भीषणता सृष्टीवर आली. माझे श्रांत डोळे घटकेंत मिटत, घटकेंत उघडत. मला बघवत नव्हतं सृष्टीच्या त्या काळवंडत चाललेल्या रूपाकडे! मला सोसवत नव्हता तो अंगाला झोंबणारा गार वारा! शेवटीं मी त्यांना म्हटलं, "मोहन, आतां आंत जाऊं या." त्यांनीं मला हात देऊन हॅमॉकवरून अलगत खालीं उतरवलं आणि आम्ही आंत आलों.

मला वाटलं होतं, आम्ही तसेच बिछान्यावर जाऊन पडूं. पण आंत येतांच ते म्हणाले, "तूं नीज, मी जरा माझ्या खोलींतून कपडे बदलून येतों." वास्तविक त्यांच्या त्या बोलण्याला कांहीं अर्थ नव्हता. कारण स्नान केल्यानंतर त्यांनीं रात्रीचाच पोशाख केला होता. पण, मला वाटलं, थंडीमुळं त्यांना कदाचित् गरम कांहीं घालायचं असेल. माझ्या डोळ्यांत इतकी सुस्ती भरली होती, माझं अंग उबेसाठीं इतकं आतुर झालं होतं कीं, ते नंतर केव्हां माझ्याजवळ येऊन निजले हें कळलं नाहीं मला! आणि कळलं तेव्हां किती भयंकर रीतीनं कळलं! मला त्यांनीं जवळ ओढली आणि मी निशंःक मनाने त्यांच्या कुशींत शिरलें! पण त्याच क्षणीं त्यांचा श्वास, तो दर्पयुक्त श्वास माझ्या कपाळावर, डोळ्यांवर, गालांवर, ओंठांवर आदळला! तो जोराचा श्वास आणि तो घोगरा आवाज! त्या श्वासाबरोबर आणि त्या आवाजाबरोबर आलेला तो भपकारा!—त्यांच्या कुशींत विश्वस्त मनानं शिरतांना जे गोड शहारे माझ्या अंगावर आले होते, ते सारे क्षणार्धांत नष्ट होऊन माझ्या शरीरावर भीतीनं काटा उठला. मला एकदम शिसारी आली! आमच्या भांडणाच्या वेळीं त्यांच्या वृत्तींतलं एक पशुत्व मी पाहिलं होतं; दुरून पाहिलं होतं. पण हें दुसरं पशुत्व! मला कल्पना नव्हती त्याची! पवनारच्या बंगल्यावर किंवा सेमिनरी हिलवर जेव्हां पूर्वीं दोन तीन वेळां आम्ही एकत्र आलों, तेव्हांची त्यांची ती आर्जवी आणि प्रणयविवश वृत्ति,

शरीराला आणि मनाला गोड झिणझिण्या आणणारा मृदुतर स्पर्श! आज कुठं गेलं तें सारं? त्याच्या ऐवजीं हें पशुत्व!---त्या पशुत्वाची लगट असह्य झाली मला! माझ्या हृदयांतल्या पुनरपि अंकुरित झालेल्या सगळ्या कोमल भावनांचा चुराडा केला त्या पशुत्वानं!

त्यानंतर रात्रभर जागीच होतें मी. ते घोरत होते; माझ्या शेजारीं अस्ताव्यस्त पसरलेले होते. मी हळूच त्यांच्या जवळून उठलें आणि बगिचांत आलें. आकाशाची पश्चिमेकडील कडा काळ्याभोर ढगांनीं ओथंबली होती; व पूर्वेच्या कडेला कुठें कुठें तांबड्या रेघा फुटल्या होत्या. झाडाच्या पानापानांतून न् उमललेल्या कळ्याफुलांतून दंव ठिबकत होतें. पांखरांची हालचाल न् किलबिल नुकती कुठें सुरू झाली होती. अर्धविकसित, अर्धप्रकाशित असं तें सृष्टीचं गंभीर रूप पाहून माझं हृदय भरून आलं; त्या सगंध, सशब्द शांततेनं माझ्या मनांतल्या गुदमरलेल्या भावना बेसुमार चाळवल्या! आणि माझ्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. लग्नानंतरची ती आमची पहिली रात्र! पण माझ्या वैवाहिक जीवनाची किती भेसूर प्रतीति आणून दिली तिनं मला!---माझे पपाहि घेत असत; पण जेवणाच्या वेळीं रात्रीं काय दोन तीन पेग घेतील तेवढेच! पण यांचा हा प्रकार! त्या धुंदींत मला जवळ ओढल्यावर प्रेमाचे म्हणून जे शब्द त्यांनी उच्चारले, ते ऐकवेनात मला! असले हे ओंगळ प्रेमालाप करायला कुठं शिकले असतील ते? त्यांच्या त्या प्रेमाची आणि त्या स्पर्शाची खंत आली मला. शिकलेलीं, सुसंस्कृत समजलीं जाणारीं आणि सार्वजनिक जीवनांत प्रतिष्ठा पावलेलीं हीं माणसं! यांच्याच्यानं असं बोलवतं आणि वागवतं तरी कसं? आणि रोज रात्रीं हेंच पशुत्व का यापुढं माझ्या कपाळीं लिहिलं आहे? मी त्यांच्या आयुष्यांतली पहिली स्त्री नव्हे हें पूर्वीच कळून चुकलं होतं मला; पण स्त्री ही त्यांच्या लेखीं केवळ एक मस्तवाल, निर्घृण उपभोगाची चीज असल्याचं त्याच रात्रीं

प्रथम अनुभवाला आलं माझ्या !

मी बागेंतून परत आलें, त्या वेळीं चांगलं फटफटीत उजाडलं होतं. ते अगदीं गाढ झोपेंत, घोरत पडले होते. आजपर्यंत त्यांच्या त्या बांधेसूद शरीराची सुदृढता आणि सुरेखता पाहिली होती मी. पण आज निद्राधीन झालेल्या त्या शरीराची सगळी बेढब शिथिलता, तोंडाला पडलेल्या त्या दाट सुरकुत्या आणि विस्कटलेल्या केशकलापांतल्या त्या पांढऱ्या बटा--मला बघवेना ! मी आंत गेलें. मला पोटांतून सारखे दुःखाचे उमाळे येत होते, सारखे आठवत होते त्यांचे ते शब्द--"या लग्नापासून आपल्याला दोघांनाहि सुख व्हायचं नाहीं आतां !--" त्यांनीं वेगळ्या अर्थानं उच्चारले होते ते शब्द त्या वेळीं. पण आज निराळ्याच रीतीनं प्रतीति येत होती त्यांची मला.--मम्मी !-मम्मी जर आज जवळ असती, तर तिच्या गळ्याला मिठी मारून मुक्तकंठ रडलें असतें मी. पण इथं डोळ्यांतून पाणी काढण्याची सोय नव्हती. बरोबर आलेलीं मायेचीं नोकर माणसं--काय वाटलं असतं त्यांना ? मी मुकाट्यानं उठून केशरचना पुरी केली आणि खानसाम्याला चहा तयार ठेवायला सांगितलं. नवाच्या सुमाराला ते उठले. त्यांची ती त्रस्त, आरक्त दृष्टि, तीं श्रांत, शिथिल गात्रं आणि तो सुरकुतलेला, बेढब चेहरा ! ते मुकाट्यानं न्हाणीघरांत गेले आणि पंधरा मिनिटांनी माझ्यासमोर येऊन बसले. खानसाम्यानं चहा आणून टेबलावर ठेवला. तो मी ओतीत असतां तोंडांतली सिगारेट काढून त्यांनीं विचारलं, "तूं केव्हां उठलीस, रोज ? मला कां नाहीं उठवलंस तूं त्याच वेळीं ?"--त्यांचा आवाज सुस्त, जड येत होता. मी त्यांची आतुर नजर टाळून म्हटलें, "तुम्हांला गाढ झोंप लागली होती, म्हणून उठवलं नाहीं मी !"
"तुला कशी काय वाटते ही जागा ? काल छान गेली नाहीं आपली रात्र ?"-त्यांनीं झटकन माझा हात धरून तो आपल्या उष्ण ओंठांवर दाबला. त्याबरोबर कसंसंच वाटलं मला !

छिंदवाड्यांतल्या त्या उरलेल्या सहा रात्री युगासारख्या काढल्या मी. आमचा दिवस खरोखरीच छान जात असे. इतका कीं, तो संपून रात्र येणार आहे याचा विसर पडत असे मला केव्हां केव्हां! पपांच्या आणि त्यांच्या ओळखीचे अनेक बडे लोक छिंदवाड्याला होते. त्यांच्याकडे आम्हांला उपाहार आणि अहेर झाले. आम्ही घरीं असलों म्हणजे पत्ते किंवा बॅडमिंटन खेळत असूं; केव्हां केव्हां मी पियानो किंवा फिड्ल त्यांना वाजवून दाखवीत असे. त्यांनीं व्याख्यानेंहि दिलीं दोन कॉंग्रेस कमिटीतर्फे; व 'अधिकारग्रहण आणि आगामी लढा' या विषयावरलं त्यांचं व्याख्यान ऐकून मला अभिमान वाटला त्यांच्या वक्तृत्वाचा. रात्रीं दहा अकरा वाजेपर्यंत वेळ मजेंत जात असे आमचा. पण त्यानंतर ते कपडे बदलायला म्हणून आपल्या त्या बंद खाजगी खोलींत जायचे! आणि मग---! मला वाटे, माणसाचं जीवन इतकं दुहेरी कसं असतं? दिवसा आणि रात्रीं जसे निरनिराळे कपडे आपण घालतों तसंच जीवनाचंहि आहे का? रात्रीची वेळ ही काय माणसांतल्या सगळ्या पशुत्वाला बाहेर पडूं देण्याची, मोकाट वावरूं देण्याची वेळ आहे का? दिवसा प्रकाशाच्या भीतीनं गुहांत दडून वेळ काढणारे हिंस्र पशु जसे रात्रीं बाहेर पडतात, तसंच माणसांतल्या पशुत्वाचंहि आहे का? दिवसा तोंडावर चढवलेला तो सोज्वळ मुखवटा---तो बाजूला काढून ठेवूनच जणुं ते रात्रीं माझ्याजवळ येत! दिवसभर बंद असलेल्या आपल्या त्या खाजगी खोलींत जाऊन ते काय करतात हें पाहण्याची मला कधीं इच्छा झाली नाहीं. मला फक्त येवढंच वाटे कीं, त्यांच्या जीवनालाहि असेच बंदिस्त, खाजगी कप्पे असतील का? आणि त्या शंकेनं माझं मन बेचैन होऊन जाई!

होय, अनेक कप्पे, अगदी चोरकप्पे होते त्यांच्या जीवनाला. छिंदवाड्याहून आम्ही परत आलों आणि माझ्या अनुभवाला हें सारं तीव्रतेनं आलं. सकाळचा प्रातरुपाहार आणि दुपारचं जेवण हीं दोन्ही आमचीं बरोबर होत असत; व संध्याकाळीं पांचला ते घरीं परत आले,

म्हणजे रात्रीं नऊपर्यंत माझ्याबरोबर असायचे. तेवढ्या वेळांत आम्ही केव्हां फिरायला जात असूं, केव्हां टेनिस खेळत असूं, केव्हां सिनेमाला जात असूं. पण रात्रीं जेवून ते जे बाहेर जात, ते केव्हां केव्हां एक वाजल्या सुद्धां परत येत असत. तो सारा वेळ मला एकटीला घरीं तळमळत, तळमळत काढावा लागे. पहिल्या पहिल्यांदा मी समोर घड्याळ ठेवून वाचीत बसत असे ते येईपर्यंत; न् ते आल्यावर तक्रार करीत असे त्यांच्या त्या नेमानं रात्रीं बाहेर जाण्याबद्दल. त्यावर ते हंसून म्हणायचे, "रोज, मी घरांत इतका पैसा आणतों, तो कोठून न् कसा आणतों हें माझं मला माहित! मी रात्रीं परत आल्यावर तूं एकादे वेळीं माझी झडती घेऊन पहा! माझे खिसे नोटांनीं भरलेले सांपडतील तुला!" खरं होतं त्यांचं तें म्हणणं. पण यापेक्षां जास्त मात्र ते कधींहि बोलले नाहींत. त्यांनी जणूं ठरवून टाकलं होतं की, आपल्या जीवनाचा कांहीं भाग मला कधींहि दिसतां कामा नये, कधींहि कळतां कामा नये! त्यांची ती आधुनिक पद्धतीनं सजविलेली सुंदर अभ्यासिका---बाहेर जातांना ते नेहमीं तिला कुलुप लावून जायचे! ते घरांत असतांना मी त्या अभ्यासिकेंत आलेली त्यांना चालत असे; पण जातांना मात्र तिला कुलूप लावून बाहेर पडायचे! मला पुष्कळदां वाटे, ती अभ्यासिका हें त्यांच्या जीवनाचं प्रतीक आहे. तिच्यांतल्या कांही बंद कपाटांच्या किल्ल्या जशा मी कधींहि पाहिलेल्या नाहींत, तशीच त्यांच्या जीवनाच्या कांहीं अंगांचा बोध होण्याचीं साधनं मला कधींहि मिळायचीं नाहींत. पाण्याच्या सपाटीवर डौलानं संचार करणाऱ्या बोटीचा कांहीं भाग जसा सदैव पाण्यांत बुडालेला असतो, तसं पुरुषांच्या जीवनाचं असतं का?

मोटारींत त्यांच्या शेजारीं गप्पा मारीत बसून जातांना जेव्हां लोक मला पाहतात, तेव्हां त्यांना वाटतं, ही किती सुखी आहे! पुष्कळदां दिवसाचे आठ आठ दहा दहा तास मी त्यांच्याबरोबर मोटारींत काढले आहेत. पण रात्रीं नवानंतर मात्र ते कधींहि आपल्याबरोबर मला नेत

नाहींत. एकदां मी त्यांना म्हणून पाहिलं कीं, "दिवसा जसे तुम्ही मला घेऊन केव्हां केव्हां हिंडतां तसं रात्रींहि का नाहीं नेत एकादे वेळीं?" तेव्हां ते हसून मला म्हणाले, "रोज, रात्र ही फक्त निशाचरांना भटकण्यासाठीं आहे. तुझ्यासारख्या अश्राप मुलीला बघवणार नाहीं रात्रीचं हिडीस अंतरंग!"—"सुसंस्कृत पुरुषांना तरी कसं बघवतं रात्रीचं हिडीस अंतरंग?"—"त्यांची नजर मेलेली असते! त्यांना पाहावंच लागतं तें!–" हें त्यांचं ठरलेलं उत्तर होतं. पुष्कळदां ते अपरात्रीं आले, म्हणजे आमच्या खोलींत येऊन मला उठवीत नसत; शेजारीं त्यांची जी स्वतंत्र खोली होती, तिच्यांतच निजत असत. महिन्यांतून आठ दहा दिवस तरी असा प्रकार घडे! छिंदवाड्यास असतांना त्यांच्या वृत्तींतलं जें पशुत्व मी अनुभवलं त्यापेक्षां हा एकांत बरा वाटे मला. पण वारंवार मनांत येई कीं, हे रात्रीं कुठं जात असतील? काय करीत असतील? रात्रीं नवाचे ठोके पडले कीं, त्यांच्या मनाला आणि शरीराला जणूं ओढ लागल्यासारखी होते! मग मी आजारी असलें, कंटाळलें असलें, कितीहि विनवून सांगितलं, तरी ते थांबायचे म्हणून नाहींत! ते गेल्यावर माझं मन अतिशय तळमळतं,—कुठं गेले असतील हे?—त्यांच्या खोलींत त्यांचा स्वतंत्र फोन आहे. माझ्या देखत ते सहसा उपयोग करीत नाहींत त्याचा. केव्हां अचानक कुणाचा फोन आलाच, तर ते दिवाणखान्यांतल्या फोनवर न बोलतां स्वतःच्या फोनवर जाऊन बोलतात! मला वाटे, व्यापारधंद्यांतल्या गोष्टी यांना इतक्या माझ्यापासून लपवण्याचं काय कारण? अखेर एकदां मी त्यांना हटकलं या सगळ्या गुप्ततेबद्दल. तेव्हां ते मला म्हणाले, "रोज, स्त्री कितीहि शिकलेली असली, तरी ती पुरुषाशीं समरस होऊं शकत नाहीं. पुरुषाच्या जीवनाला अनेक अंगं असतात. तो बहिर्मुख असतो. त्याच्या त्या व्यापक जीवनांत स्त्रीला गोडी वाटत नाहीं; तें जाणून घेण्याची तिला इच्छा नसते; ऐपतहि नसते!"

पण मला एका शब्दानेंहि त्यांनीं कधीं दुखवलं नाहीं; लग्नापूर्वी

त्यांच्या रागाचा जो काय अनुभव आला असेल, तेवढाच. त्यानंतर आजवर कधींहि त्यांना रागावलेले मी पाहिले नाहींत. त्यांच्या जीवनाच्या त्या गूढ अंगांविषयीं मी केव्हां उत्सुकता तर केव्हां असमाधान व्यक्त करीत असतें. पण माझं त्याबद्दलचं बोलणं ते हसण्यावारी नेतात नेहमीं! "कुणाच्याहि जीवनांत फाजील डोकावून बघूं नये, रोज. प्रत्येकाचं व्यक्तित्व जसं भिन्न असतं, तसंच जीवनहि भिन्न असतं; न् त्या भिन्न जीवनांत फाजील मन घालणं हें सुसंस्कृतपणाला सोडून आहे!"—हें त्यांचं आत्मसमर्थन पटत नसे मला. "विवाहित स्त्री-पुरुषांनीं सुद्धां एकमेकांच्या जीवनांत मन घालूं नये का? मग त्यांच्या मीलनांत अर्थ काय?"—"त्या मीलनाचा अर्थ तसा होत नाहीं, रोज! स्त्रीपुरुषांचं मीलन म्हणजे कांहीं दोन प्रवाहांचं मीलन नव्हे. युतीच्या वेळीं दोन ग्रह जवळ आलेले, एकमेकांना अगदीं भिडलेले दिसतात; पण त्यांच्यांत लाखों मैलांचं अंतर असतं. त्यांच्या भोंवतालचीं विशिष्ट वलयं कायमच असतात. आणि तरीहि ते एकमेकांना आकर्षित करतात; एकमेकांवर परिणाम करतात. तसंच स्त्रीपुरुषांचं असलं पाहिजे! एकमेकांचं व्यक्तित्व, विशिष्ट जीवन न गमावतां त्यांना साहचर्याचं सुख भोगतां आलं पाहिजे. मराया स्टोप्सचं मत तुला माहित आहे ना? विवाहित स्त्रीपुरुषांनीं वेगळं राहिल्यानं त्यांची एकमेकांविषयींची आसक्ति कायम राह्यला मदत होते असं म्हटलंय तिनं! तुझी ही मीलनाची कल्पना अगदीं पुराणी आहे, रोज!"—हा त्यांचा युक्तिवाद मला तेवढ्यापुरता समर्पक वाटे. पण मागाहून मनांत येई कीं, स्वतःच्या विशिष्ट जीवनाचं समर्थन करण्यासाठीं हें तत्त्वज्ञान यांना सुचतं! मला तसं विशिष्ट जीवन नाहीं, त्यामुळं तें तत्त्वज्ञानहि मला पटत नाहीं. स्त्रियांना पुष्कळदां जो पुरुषांचा हेवा वाटतो, तो त्यांच्या जीवनाच्या खुरटेपणामुळं, कोतेपणामुळं तर नव्हे? स्त्रीचं जीवन संकुचित असल्यामुळंच ती अंतर्मुख होते; लहानसान

गोष्टींत मन घालून झुरते. माझासुद्धां एका परीनं तसाच प्रकार नाहीं का? त्यांचं जीवन सरळ नाहीं आणि स्वच्छ नाहीं हें मला आतां पुरेपूर कळून चुकलं आहे. मग त्यांत फाजील मन घालून मी स्वतःला दुःखी करून घेण्यांत काय स्वारस्य आहे? त्यापेक्षां त्यांचे व्याप त्यांच्यापाशीं आणि माझा संसार माझ्यापाशीं अशी वृत्ति मी का ठेवूं नये?—मनाची मी पुष्कळ समजूत घालतें. पण रात्र आली म्हणजे नाना प्रकारच्या दुःशंकांनीं मन अगदीं विव्हळ होऊन जातें.

परवां घडलेल्या त्या प्रकारानं मी स्तंभित होऊन गेलें अगदीं. मध्यरात्रीच्या सुमारास ते नेहमींप्रमाणं मोटारींतून आले. पण मोटर कमानीखालीं उभी न करतां त्यांनीं बंगल्याच्या मागल्या बाजूला अंधारांत उभी केली; व आंत येऊन ते मला म्हणाले, "मी मोटारींतून एका बेशुद्ध स्थितींतल्या बाईला आणलंय! तिला मी तुझ्या कपडे करायच्या खोलींत आणून निजवतों. चटकन् अंथरुण तयार कर तिच्यासाठीं! नोकरांना उठवूं नको!" मला आश्चर्य वाटलं. पण विचार करायला वेळ नव्हता. मी तात्बडतोब माझ्या खोलींत जमिनीवरच बिछाना तयार केला; व त्यांनीं तिला आपल्या खांद्यावरून आंत आणून अलगत निजविली. दिव्याच्या प्रकाशांत मी पाहिलं—ती स्त्री युरोपियन होती. तिचे ओठ न् गाल रंगविलेले होते.—सगळे अवयव कसे अगदीं नाजूक न् रेखीव वाटले मला! पिऊन ती अगदीं बेहोष झाली होती. ते जरी ती बेशुद्ध स्थितींत आहे असं म्हणाले, तरी तो बेहोषपणा दारूचा आहे हें लगेच लक्षांत आलं माझ्या!—त्यांचेहि डोळे अगदीं तारवटलेले होते. पण त्यांची प्रत्येक हालचाल सावधपणानं चालली होती. तिला त्या अगदी एकीकडल्या खोलींत आणून ठेवल्यावर ते दिवाणखान्यांत आले; व सुरईतील तीन पेले पाणी घटघटा प्याल्यानंतर मला म्हणाले, "रोज, तुला चमत्कार वाटला असेल नाहीं हा सगळा प्रकार बघितल्यानंतर? आणि आहेहि खराच तो चमत्कारिक! ही फ्रेंच बाई माझी मैत्रिण आहे. सदरमध्यें

नृत्याचे वर्ग न् वसतिगृह चालवते ती. तिच्यावर एकाएकीं संकट गुदरल्यामुळं मला आणावी लागली तिला इथं! तिची चौकशी करायला कोणीहि माणूस इथं आला, तरी अशा प्रकारची कोणतीहि स्त्री आपल्या घरांत नाहीं असं सांगायचं त्याला! मी तुला मागाहून समजावून सांगेन सगळं!"––इतकं बोलून ते उठले आणि आपल्या खोलींत जाऊन निजले. मला किती तरी वेळ झोंप येईना. त्या स्त्रीची ती बेहोष पण कमनीय मूर्ति सारखी डोळयापुढं दिसत होती मला!

दुसऱ्या दिवशीं मी थोडी उशीरां निजून उठलें. पण त्यापूर्वीच ते तिला घेऊन निघून गेले होते. मी चौकशी केली. नोकराचाकरांनाहि दाद नव्हती ते केव्हां गेले याची. कालच्या प्रकारानं माझं मन अत्यंत अस्वस्थ झालं होतं. त्या स्थितींतच मी चहा घेत असतां घंटी वाजली. म्हणून मी चपराशाला चौकशी करायला सांगितलं. तो म्हणाला, "बाहेर एक गृहस्थ आले आहेत. ते आपल्याशीं बोलूं चहातात." मला पाहतांच व्हरांडयांत बसलेल्या मध्यम वयाच्या पंजाबी इसमानं खुर्चीवरून उठून आर्जवी आवाजांत त्यांची चौकशी केली. ते घरांत नाहींत असं मी त्याला सांगितल्यावर त्यानं विचारलं, "काल रात्रीं ते केव्हां घरीं आले?"–– "आम्ही फिरायला गेलों होतों. बहुधा बाराच्या सुमारास आलों असूं परत!"—माझें तें उत्तर ऐकतांच त्यानं आपल्या घाऱ्या डोळयांनीं रोखून पाहिलं माझ्याकडे; व विचारलं, "काल तुम्ही एकटयाच त्यांच्या-बरोबर होतात? तुमच्याकडे कोणी दुसरी स्त्री आलेली नव्हती?"–– "नाहीं. मी प्रथमच्च ऐकतें आहे हें तुमच्या तोंडून!" मी म्हणालें. तो साध्या वेषांतील पोलिस ऑफिसर असावा हें लगेच लक्षांत आलं माझ्या. "ठीक आहे. ते आल्यावर मला फोन करायला सांगाल का त्यांना या नंबरवर?" त्यानं मला एका चिठीवर नंबर लिहून देऊन म्हटलें. नंतर तो उठला आणि हातांतली सुदर बेताची छडी फिरवीत बाहेर पडला. मी आंत आलें.––माझं मलाच आश्चर्य वाटत होतं, त्याच्याशीं इतक्या धीटपणानं मी कशी वागलें याचं! तोंच 'हितवाद'चा अंक चपराशानं आणून माझ्यापुढं ठेवला. त्यांत पहिल्याच पानावर मोठ्या मथळ्या-

खालीं अशी बातमी दिलेली होती कीं, "सदरमध्यें एका युरोपियन स्त्रीनें आपल्या घरीं जुगाराचा अड्डा चालविला आहे, असा पोलिसांना संशय होता. म्हणून त्यांनीं काल मध्यरात्रीं अचानक तिच्या घरावर छापा घातला. पण छाप्याच्या वेळीं ती स्त्री घरांत सांपडली नाहीं; व पोलिसांना जरी घरांतलें वातावरण संशयास्पद वाटलें, तरी त्यांना प्रत्यक्ष असा पुरावा मात्र कांहीं सांपडला नाहीं, असें समजतें."—ही बातमी वाचतांच काल रात्रीं घडलेला प्रकार आणि सकाळची ती पंजाबी ऑफिसराची चौकशी यांचा क्षणार्धात उलगडा झाला मला!

माझं मन अतिशयच बेचैन झालं ती बातमी वाचून.--त्या जुगाराच्या अड्ड्याशीं यांचा काय संबंध? ते जुगार खेळायला जात असतील कां तिथं? आणि केव्हां केव्हां जीं नोटांचीं पुडकीं ते रात्रीं घेऊन येतात, तीं त्या अड्ड्यावरच मिळालेलीं असतील का?— नाहीं नाहीं त्या शंकाकुशंकांनीं सतावून सोडलं मला. कुणाजवळ कांहीं बोलायची सोय नव्हती. सनीची शिकवणी आटोपून वसंता त्यांची चौकशी करायला आला, तेव्हां त्याच्याशीं काय बोलावं हें समजेना मला! अखेर अकराच्या सुमारास ते परत आले, तेव्हां जीवांत जीव आला माझ्या! ते आल्याबरोबर मुकाट्यानं स्नानगृहांत गेले आणि लगेच आम्ही जेवायला बसलों. थोडा वेळ स्तब्ध स्थितींत गेल्यावर ते मला म्हणाले, "रोज, 'हितवादां'तली बातमी वाचलीच असशील तूं! काल रात्रीं माझ्याबरोबर आली होती तीच ती स्त्री!" मला एकदम आठवण झाली त्या पंजाबी ऑफिसरानं दिलेल्या नंबराची. मी ती चिठी त्याच्यापुढं ठेवली; व सकाळची हकीकत सांगून त्यांना विचारलं, "पण तुमचा काय संबंध त्या अड्ड्याशीं?"—"मी फक्त पत्ते खेळायला जातों तिथं. ती बाई फार चांगली गाते न् नाचते. त्यामुळं पोलिसांचा वहीम तिच्या घरावर! आणि त्यामुळंच मलाहि तिच्याकडे जावंसं वाटतं रात्रीं!" ते माझ्या नजरेला नजर देऊन अगदीं संथपणानें म्हणाले. मी जास्त कांहीं विचारलं नाहीं त्यानंतर. पण त्यांच्या जीवनांतलं एक गूढ उकलल्यासारखं झालं मला!

# कागदी कम्युनिस्ट

“दादा, अरे हे येणार तरी कधीं आतां? दहा वाजून गेले. काय करावं माणसांनीं असं रोज रोज व्हायला लागलं तर?—”

विझलेल्या चुलीजवळ भिंतीला ओटंगून बसलेली राधाबाई बाहेर जाण्याच्या तयारीनें खालीं आलेल्या वसंताकडे बघून उद्वेगानें उद्गारली. गर्भभारामुळें तिनें आपले पाय भुईवर पसरले होते. त्यावर चढलेली सूज कंदिलाच्या प्रकाशांत तुकतुकत होती.

“तूं कुठं चाललास आणखी? ते केव्हां येणार याचा नेम नाहीं आणि तूंहि येवढया रात्रीं बाहेर जाणार का दादा?—”

“आई, मी फार लांब जात नाहीं. सिटी क्लबांत सभा चालली आहे त्यांच्या कार्यकारिणीची तेथपर्यंत जाऊन पाहून येतों आणखी किती वेळ लागणार आहे सभेला तें! पण मी तुला म्हटलं ना तूं जेऊन घे

म्हणून ? आम्ही नाहीं का जेऊन घेतलं नऊ वाजेपर्यंत वाट पाहून ! तूं विनाकारण संताप करून घेतेस आपल्या जिवाचा !——

"खरं आहे बाबा ! मुलांकडून एवढंच बोलून घ्यायचं शिल्लक राह्यलं होतं आतां ! संध्याकाळीं पांचपासून बाहेर गेलेले आहेत ते.—— मी कशी जेऊं ते परत आल्याशिवाय ? अन्न सगळं निऊन गेलंय अगदीं ! खरंच होणार आहे कां रे संप, दादा ? या संपापायीं बरखास्त व्हायचं नसलं. आणखी काय लिहिलंय कपाळीं कोण जाणे !——"

"आई, आतां आणखी कांहीं वाईट होणं शक्य नाहीं आपलं संपामुळं ! जें काय होण्यासारखं होतं तें होऊन गेलं सगळं ! शिक्षा झाली, नोकरी गेली, घर गहाण पडलं. आतां आणखी काय वाईट होणार आहे बाबांचं ? तूं कांहीं काळजी करूं नकोस. यंदा मी मॅट्रिक होतोंय न् पुढल्या वर्षी किशी मॅट्रिक होतेय. मग कांहीं काळजी करायला नको तुला कशाची !"

"अरे, पण घरांत पैसे येण्यावरच कां सुख अवलंबून असतं सर्वस्वीं माणसाचं ? पैशानं विकत न घेतां येण्यासारखी वस्तु जर जगांत कोणती असेल तर ती सुख ! तुम्ही दोघं पैसे आणाल फार तर घरांत. पण त्यांचं हें वेड जोंपर्यंत कायम आहे, तोंपर्यंत कसं सुख वाटेल माझ्या जिवाला ? तूं म्हणतोस, आतां आपलं कांहीं वाईट व्हायचं राह्यलं नाहीं म्हणून ! पण, उद्या संप सुरू होऊन जर हे पिकेटिंग करायला गेले, तर शिक्षा झाल्याशिवाय राहील कां यांना ? कॉंग्रेसचं राज्य झालं म्हणून आनंद मानायचा आपण घरीं बसून. पण खरोखरी कोणाचंहि राज्य झालं, तरी गरीबांच्या कपाळचा भोग कांहीं टळत नाहीं न् त्यांचे पांग कांहीं फिटत नाहींत ! नाहीं तर हा संपाचा प्रसंग कशाला आला असता ?"

"पण बाबांना संप नकोय आई ! तूं ऐकतेस ना रोज घरांत चालणारीं बोलणीं ? ही सगळी अण्णासाहेबांची उचल आहे !——"

"हो तर! त्यांची उचल न असायला काय झालं? संप झाला म्हणून काय त्यांची वकिली बुडायची आहे का मोटार जप्त व्हायची आहे? कोशाचे कपडे घालून न् मोटारींत बसून कम्युनिस्ट म्हणून मिरवायला काय जातं त्यांचं? उलट संपामुळं कामगारांचीं आणखी कांहीं घरं घशांत जातील त्यांच्या! मरण फक्त यांच्यासारख्या सरळ माणसांचं! असा राग येतो मला त्या अण्णासाहेबाचा आवाज कानांवर आला म्हणजे! तो शेळके सांगतो तें कांहीं खोटं नाहीं! कॉंग्रेसमध्यें कोणी विचारीना म्हणून कम्युनिस्ट बनून कामगारांच्या चळवळींत शिरला; न् पुढच्या निवडणुकींत कामगारांच्या वतीनं उभं राह्यला मिळावं म्हणून यांच्या साह्यानं संघ ताब्यांत घेण्याची धडपड करतोय! तो मोहनहि त्याच माळेचा मणि!——"

"ते दोघेहि बाबांच्या मागं लागले आहेत सारखे संप घडवून आणण्यासाठीं!——"

"पण यांचा का एवढा प्राण चाललाय संपासाठीं? कामगारांचा पगार न वाढल्यानं यांच्या तर चैनींत कांहीं अंतर पडलं नाहीं ना?——"

"अग, यांचा प्राण चालला आहे तो कामगारांसाठीं नव्हे! संप घडवून आणणं हा धंदा आहे एक, आई! संप चालू असतांना त्याच्यासाठीं गोळा केलेले पैसे खायचे न् तो फोडण्यासाठीं किंवा मोडण्यासाठीं मालकांकडून गुपचूप पैसे घ्यायचे! शिवाय आतां लोकनियुक्त दिवाण असल्यामुळं पैसे उकळण्याचं तें आणखी एक नवं साधन पैदा झालंय! एकीकडे दिवाणाच्या बंगल्यावर खेपा घालायच्या न् दुसरीकडे कामगारांच्या सभेंत डरकाळ्या फोडायच्या! असं दुहेरी राजकारण आहे अण्णासाहेबांसारख्या धंदेवाईक कम्युनिस्टांचं!——"

"खरंच बाबा! गरीबांची होळी न् यांची पुरणपोळी! नाहींतर अण्णासाहेबांची इस्टेट इतकी वाढली असती कशी गेल्या दहा वर्षांत?

परवां तो काळेच सांगत होता यांना त्या मोहनवर जुगाराचा अड्डा चालविल्याबद्दल खटला होणार आहे म्हणून! खरं कां रे ?--"

"खटला होणं नाहीं शक्य, आई! पण बोभाटा मात्र फार झाला त्या प्रकाराचा! त्यांत मोहन, अण्णासाहेब, डॉ. बद्रिनाथ, शेठ गुलाबचंद, ॲ. कमाविसदार यांच्यासारखे बडे बडे लोक सांपडले असते! पण कॉंग्रेसचं राज्य चालू असतांना कोण पकडणार यांना ? --"

"कॉंग्रेसचं राज्य काय असल्या संभावित बदमाषांची पोळी पिकविण्यासाठीं आहे का ?--"

"तसं नव्हे ग! कोणत्याहि राज्यांत कोणत्या ना कोणत्या तरी बदमाषांची पोळी ही पिकतच असते! हा मनुष्यस्वभावच आहे, आई!-"

"पण का रे दादा, 'हितवादां'त तें त्या युरोपियन बाईविषयीं काय आलं होतं? परवां काळे कांहीं तरी सांगत होते बाबांना!--"

"किशे, तुला भारी आडून ऐकण्याची संवय आहे नाहीं नाहीं त्या गोष्टी! पोरीच्या जातीनं फाजील मन घालूं नये पुरुषांच्या भानगडींत! यांच्या या सदा न् कदा छपरींत चालणाऱ्या चांभारचौकशांमुळं हीं पोरं सगळीं बिघडून गेलीं बघ, दादा! आज मधुसुद्धां म्हणत होता मी संप झाल्यावर पिकेटिंग करायला जाणार म्हणून! बाकी परवां काळे ज्या हकिकती सांगत होता ना यांना, त्या ऐकून किळस आला मला त्या मोहनचा. तूं संभाळून रहा बरं किशे! तो आला म्हणजे सारखी विचार-पूस करीत असतो हिची!--"

"आई, तुझं आपलं कांहींतरीच! त्यांनीं विचारपूस केली म्हणून काय झालं? माझं मला कांहीं कळतच नाहीं का आतां? पण दादा, रोजबाईला कसं चालतं रे हें सगळं? ती तर इतकी शिकलेली आहे!--"

"अग, शिकलेली असली तरी काय करते बिचारी! तूं पाहिलंस ना परवां ती किती दुःखीकष्टी दिसत होती तें!--"

"का रे, ती तुमची रोजबाई इतकी सुशिक्षित न् हुषार असून जर तिला आपल्या नवऱ्याला आवरतां येत नसेल, तर मग आमच्यासारख्या अशिक्षित बायकांत न् तिच्यांत कांहीं फरक नाहीं म्हणायचा!—"

"फरक आहे ना! नाहीं कसा? अशिक्षित बायका आपल्या नवऱ्याचीं गाऱ्हाणीं गांवभर सांगत सुटतात. पण सुशिक्षित बायको आपलं दुःख मुकाटयानं गिळते. नवऱ्याची बेअब्रू स्वतःच्या तोंडानं नाहीं कधीं होऊं द्यायची ती! रोजबाईंनीं जर मनांत आणलं तर गुप्ता-साहेबांकडून बंदोबस्त करूं शकतील त्या मोहनजींचा. पण सासर न् माहेर समोरासमोर असूनसुद्धां इकडचं चिटपांखरूं तिकडे फिरकायचं नाहीं, असा स्वभाव आहे रोजबाईंचा! मोहनजींचा सुद्धा एक गुण घेण्यासारखा आहे. त्यांचं वर्तन एरवीं कसंहि असो. ते कधीं एका शब्दानं दुखवीत नाहींत रोजबाईंना. आणि लोकांशीं तरी किती चांगले वागतात!—"

"अरे, न वागायला काय झालं, दादा? तो त्यांच्या धंद्याचाच एक भाग आहे. गोड बोलून गळे कापायचे धंदे आहेत हे सगळे!—"

"बाकी बाबांना कांहीं कल्पना नाहीं आई, आपल्याकडे येणारीं हीं सगळीं माणसं किती उलटया काळजाचीं आहेत याची!—"

तोंच बाहेर मोटर थांबल्याचा आवाज झाला आणि 'वशा, वशा' अशी हांक मारीत विठोबा आंत आला.

"अरे, तिला म्हणावं तूं जेऊन घे! मला जेवायचं नाहीं आतां—"

समोर आलेल्या वसंताला विठोबानें म्हटलें; व लगेच तो आपल्या मागोमाग आंत आलेल्या मंडळीला म्हणाला—

"या अण्णासाहेब, या मोहनजी! पान खाऊन मग पुढं जा. वशा, अरे पानदान आण बरं लवकर!—"

विठोबा डोक्यावरील मळकी गांधी टोपी खुंटीवर ठेवीत म्हणाला. वसंतानें मुकाट्यानें पानदान आणून तें मोहन, अण्णासाहेब आणि काळे यांच्यापुढें ठेवलें.

त्याबरोबर मोहन त्याला म्हणाला, "काय वसंता, तयारी चांगली आहे ना तुझी? परीक्षा झाल्याबरोबर आमच्या कंपनींत यायचं बरं का! नोकरी अगदीं वाट पहातेय तुझी! विठोबाजी, तुमचीं दोन्ही मुलं मोठीं हुषार न् सालस आहेत—"

वसंता उत्तरादाखल नुसतें स्मित करून आंत निसटला. विठोबा पानांच्या शिरा काढून त्यांना चुना लावण्यांत गर्क होता.

"बाकी विठोबाजी, आज आम्ही जिंकूं शकलों याचं सगळं श्रेय तुम्हाला दिलं पाहिजे. तुम्ही संपाच्या बाबतींत नेट धरला, म्हणून आज ठराव मंजूर होऊं शकला आमचा!—"

अण्णासाहेब त्यांनीं तयार केलेलें पान तोंडांत कोंबीत संतुष्ट चित्तानें उद्गारले.

"मला अजूनहि वाटतं अण्णासाहेब, पंधरा दिवसांची नोटीस देऊन संप करण्यांत घाई होते आहे आपली!—"

"मुद्दामच घाई केली आहे ती! अहो, असेंब्ली सुरू झाल्यावर पहिल्याच दिवशीं मोर्चा नेतां यावा तिथं न् ती चालू असतांना संप पुकारतां यावा अशी योजना आहे आमची! आपल्या कामगारांच्या मोर्चाबरोबरच कोष्टी आणि किसान यांचाहि मोर्चा असेंब्लीवर न्यायचा बेत आहे आमचा! हे काळे तेवढ्यासाठीं आठ दिवस जाऊन रहाणार आहेत उमरेडला! वीस हजार डोक्यांचा प्रक्षुब्ध जनसमुद्र प्रियदर्शनला दिसला पाहिजे पहिल्या दिवशीं! तरच डोकं ताळ्यावर येईल आपल्या मंत्रिमंडळाचं! तुम्ही सहा महिने वाट पहाण्याची

अट घातली होतीत आम्हांला; तिथं आम्ही सात महिने वाट पाहिली. आतां आम्ही घाई करतों असं म्हणायला जागा नाहीं तुम्हांला?—”

“पण विठोबाजींचा प्रियदर्शनवर विश्वास असल्यामुळं तुम्ही घाई केल्यासारखी वाटते आहे त्यांना, अण्णासाहेब!—”

मोहन सिगारेटचें पाकीट अण्णासाहेबांच्या हातीं देत हंसत हंसत म्हणाला.

“पण मोहन, तुमचासुद्धा अलिकडेच प्रियदर्शनवर घुस्सा झालेला दिसतोय!—”

काळे त्या पाकिटांतली सिगारेट घेऊन ती विठोबाच्या हातांतील विडीवर शिलगावीत उद्गारले.

“माझा का होईल बुवा घुस्सा त्याच्यावर? मी संपाला पाठिंबा देतों याचं कारण केवळ कामगारांना कॉँग्रेस राज्याचा फायदा मिळावा या हेतूनं! संपाला मदत करणं याचा अर्थ प्रियदर्शनवर राग काढणं असा करतां का तुम्ही काळे?—”

मोहननें हंसून विचारलें. पण काळ्यांच्या प्रश्नानें आपल्या चेहऱ्यावर झालेला बदल लपविण्याचा त्याचा हा प्रयत्न फारसा यशस्वी होऊं शकला नाहीं.

काळ्यांच्या मनांत त्याला मर्मभेदक उत्तर देण्याची प्रबळ इच्छा उद्भवली होती. पण ती त्यांनीं मोठ्या निग्रहानें आवरली.

“कॉँग्रेस राज्याचा फायदा घेण्याची तुमची कल्पना मलाहि मान्य आहे. आणि म्हणूनच मी सामील झालों या संपांत! पण संप आपण अशा रीतीनं चालवला पाहिजे कीं, आपला कार्यभाग तर साधावा आणि मंत्रिमंडळावर कोणत्याहि तऱ्हेची दडपशाही करण्याचा प्रसंग येऊं नये—”

"पण मंत्रिमंडळानें दडपशाही केल्याशिवाय चेव येणार कसा लोकांना? तुमचं म्हणणं असं दिसतं विठोबाजी, कीं निरोधन कांहीं करूं नये? पण मी साफ सांगतों कीं, आपला सार्वत्रिक संप जर पूर्णपणें यशस्वी व्हायला हवा असेल, तर निरोधन केल्याशिवाय गत्यंतर नाहीं आपल्याला! आपण निरोधन केल्यावर ते लाठीमार करतील एवढंच कीं नाहीं? करूं द्यात, अवश्य करूं द्यात! चार दोन डोकीं फुटून कामगारांच्या पवित्र रक्ताच्या चिळकांड्या उडाल्याशिवाय कॉंग्रेस मंत्रिमंडळाचं नोकरशाही धोरण लोकांच्या प्रत्ययाला यायचं नाहीं! दलितांचं रक्त भुईवर सांडल्याशिवाय कधींच क्रांति होत नसते!--"

अण्णासाहेब हातांतील सिगारेटची राख झटकीत आवेशानें उद्गारले. त्यांच्या ऊर्ध्वमुख नाकपुड्या थरथरत होत्या आणि डोळ्यांतील तांबारा ओटावर घरंगळणाऱ्या तांबूलरसाला लाजवीत होता. मघाशीं ज्या वीस हजार डोक्यांच्या प्रक्षुब्ध जनसमुद्राचा उल्लेख त्यांनीं केला, तोच जणूं आपल्यासमोर हेलावत आहे आणि त्याला उद्देशून आपण गरजत आहोंत, अशा थाटानें ते उंच सुरांत बोलत होते. त्यांनीं कपाळाला आलेला घाम घाईघाईनें पुसला आणि पुन्हा बोलावयाला सुरवात केली.

"कामगार, कास्तकार आणि कोष्टी यांचा तिरंगी मोर्चा आम्ही असेंब्लीवर नेल्याशिवाय लोकक्षोभाचें विराट् स्वरूप मंत्रिमंडळाला दिसणार नाहीं; व तें विराट् स्वरूप जोंपर्यंत त्याला दिसत नाहीं, तोंपर्यंत मुख्य प्रधानाच्या बंगल्यावर कॉफीचे घुटके घेत घेत केलेल्या शिष्टाईतून कांहींहि निष्पन्न होण्याचा संभव नाहीं. विठोबाजी, निरोधन करण्याचा जेव्हां प्रसंग येईल, तेव्हां तुम्ही लाल बावटा हातांत घेऊन पुढं झालं पाहिजे. तुम्ही स्वतः कामगार आहांत; कामगारांच्या पिळाचे आहांत; कामगारांच्या रक्तामांसाचे आहांत—"

"बाकी अण्णासाहेब, माझी समजूत मात्र अशी आहे बरं का कीं, या वेळीं आपण सर्वांनीं विठोबाजींना मागं ठेऊन स्वतः पुढाकार घेतला पाहिजे. निरोधनाचा प्रसंग आलाच तर तुम्ही स्वतः प्रथम लाल बावटा घेऊन पुढं झालं पाहिजे. तुमच्या मागून मोहनजी, मोहनजींच्या मागून शेळके न् मी! म्हणजे कामगारांना असं स्फुरण येईल बघा! आपण सगळे तुरुंगात गेल्यावर संप चालवायला विठोबाजींना मागं ठेवा तुम्ही! पहिल्याच सपाट्याला जर ते तुरुंगांत गेले, तर हा संप चालवणार कोण हो?—"

काळे मिस्किलपणानें मध्येंच म्हणाले.

त्यांच्या बोलण्यांतली खोंच मोहनच्या लक्षांत आली; व अण्णा साहेब चिडून त्यांना कांहीं उत्तर देणार तोंच तो म्हणाला--

"हें पहा काळे, अजून संप सुरू व्हायला पंधरा दिवस आहेत चांगले! प्रियदर्शननं जर मनावर घेतलं, तर तडजोड होऊनहि जाईल कदाचित्! तेव्हां आज कशाला निरोधनाचा पुढाकार कोणी घ्यावा याची चर्चा? काय, अण्णासाहेब, जाऊं या आतां! अकरा वाजायला आले!--

आणि ते दोघे ताबडतोब बाहेर येऊन मोटारींत बसले. मोटार चालू होतांच अण्णासाहेब मोहनला म्हणाले, "का रे, हा काळे आतांशा उलटलेला दिसतोय आपल्यावर!--"

"कां नाहीं उलटणार? मी तुला बजावून सांगितलंय वारंवार कीं, पुढारीपण कायम ठेवायचं म्हणजे मनीबॅग न् बाटली या दोहोंचींहि तोंडं सैल ठेवावीं लागतात नेहमीं! पुढाऱ्याचं घर म्हणजे सदावर्त असलं पाहिजे, अण्णा! इंग्रजी राजकारणांतला मुक्त भोजनाचा (Free table) सिद्धान्त माहीत आहे ना तुला? प्रियदर्शनच्या चुलत्यानं या सिद्धांताच्या जोरावर आठ वर्षं राज्य भोगलं या प्रांतांत.

आणि प्रियदर्शनच्याहि लोकप्रियतेला कारण त्याचं औदार्य हेंच आहे खरोखरी! असेंब्लींतील सारे कॉंग्रेसपक्षीय सभासद न् त्यांचा परिवार यांच्या पंक्ति उठतात त्याच्या बंगल्यावर! लोकशाही राजकारण हें खेतीसारखं आहे. खेतींत आधीं पैसा ओतावा, तेव्हां नंतर पैसा काढतां येतो तिच्यांतून! पण तुझं रक्त पडलं सावकारी! मी तुला हजारदा सांगितलं कीं, युनियनच्या कार्यकर्त्यांना कसलीहि दृष्यात पडूं देतां कामा नयेस तूं!—"

"तुझं काय जातं फुकटचा उपदेश करायला, मोहन? तूं ती कंपनी निघाल्यापासून हजारों रुपये महिन्याला ओढतो आहेस!—"

"आणि तुला नाहीं रे दरमहा शेंकडों रुपये मिळत दिवाणांकडे येणाऱ्या अपीलांतून? सहा महिन्यांपूर्वीं हायकोर्टांतून रिकाम्या खिशांनीं परत येत होतास त्याची आठवण कर! पण तुझी वृत्तीच दरिद्री!—"

"बरं बाबा! उद्यांपासून त्या काळ्याला अर्धा डझन बाटल्यांचा खुराक लावतों! मग तर झालं ना? बरं पण आतां आपण सदरमध्यें जायचं ना?—"

"आहे कां तुझी हिंमत तिथं यायची? त्या दिवशीं हरनाम-सिंगचा फोन येतांच पहिल्यांदा मोटर गांठलीस तूं आपली! अरे, तो पोलिस खात्यांतला इसम दोस्तीच्या इमानाला जागला त्या दिवशीं म्हणून आपण सगळे वाचलों! त्यानं जर अगोदर फोन केला नसता, तर इझाबेलला पळवतां आली नसती मला तिथून न् मुद्देमालासकट सांपडलों असतों आम्ही दोघं! पण त्यानं अर्धा तास आधीं फोन करून छापा येणार असल्याची वर्दी दिली न् पुन्हा सकाळीं माझ्या बंगल्यावर येऊन चौकशीचं नाटक पुरं केलं! आणि तूं मात्र त्याचा फोन आल्याबरोबर पळ काढलास!—"

"तुझी हिंमत आमच्यांत नाहीं हें कबूल करतों आम्ही! सारे पोलीस ऑफिसर तुझे मिंधे असल्यामुळं झडती आली असती, तरी तूं

सुटला असतास त्या गंडांतरांतून! तें कसब आमच्यांत नाहीं न् म्हणून मी पळ काढला लगेच! बाकी मोहन इझाबेल म्हणजे रत्न आहे एक!–"

"पण सव्यां तिथं जाणं तुला तरी धोक्याचं आहे, अण्णा! तूं संपाचा पुढारी आहेस; पोलिसांची तुझ्या सगळ्या हालचालींवर बारीक नजर आहे!—"

"बरं मग राहूं द्या! पण एम्पायरमध्यें तुझ्या खोलींत थोडा वेळ बसून परत येऊं. त्याला तर हरकत नाहीं तुझी?—"

"तुझी तलफ भागवायला ना नाहीं माझी!—"

मोहन तुच्छतेनें हंसत हंसत म्हणाला.

ते दोघे एम्पायर हॉटेलमध्यें आले; व मोहननें परिचारकाला पटांगणाच्या एका कोंपऱ्यांत असलेल्या सुरूच्या जाळीदार सांवलींत खुर्च्या मांडावयाला सांगितलें.

त्यानें धांवत जाऊन खुर्च्या मांडल्या; टेबल मधोमध ठेऊन त्यावर चादर पसरली; व लगेच तीन बाटल्याहि आणल्या.

नंतर त्यानें हळूच विचारलें, "कांहीं खायला आणूं का?"

तेव्हां मोहननें अण्णासाहेबांना हंसत हंसत विचारलें, "का रे, तुला नुसतीच तहान लागली आहे का भुकेनं सुद्धां व्याकुळ झाला आहेस तूं?—"

"हें बघ मोहन, तूं कितीहि कुचेष्टा केलीस तरी नुसतं कांहीं पिणं न् तें पचवणं शक्य नाहीं मला! खायलाहि हवं त्याच्याबरोबर थोडंस--"

आणि त्यांनीं स्वतःच आपल्याला हव्या असलेल्या पदार्थांचें नांव परिचारकाला सांगितलें.

त्यानें कांटे, चमचे आणि प्लेट्स आणून ठेवल्यावर त्यांच्या मद्यपानाला सुरवात झाली.

"का रे, तडजोडीसंबंधीं तूं जें मघाशीं बोललास तें मनापासून होतं कां मोहन?—"

"नाहीं. तडजोड होऊन जर हा संप टळला, तर प्रियदर्शन कायमचा डोईजड होऊन बसेल आपल्याला! पंडितजी जोंपर्यंत उद्योग-मंत्री आहेत, तोंपर्यंत कधींहि तडजोड होऊं देणार नाहींत ते! तुला माहीत नाहीं.—कापडधंद्यांतल्या कामगारांचं जीवनवेतन ठरविण्यासाठीं एक चौकशी कमिटी नेमावी, अशी प्रियदर्शनची फार इच्छा होती. पण पंडितजींनीं त्याला असं स्पष्ट सांगितलं कीं, जीवनवेतनाचं तत्त्व जर आपण एका धंद्याला लागू केलं, तर इतर धंद्यांतले कामगारहि जीवनवेतनाची मागणी करतील आणि त्याचं पर्यवसान सर्व प्रांतभर औद्योगिक असंतोष उत्पन्न होण्यांत होईल. त्यामुळं तूर्त तरी गप्प बसलेला दिसतोय प्रियदर्शन!—"

"पण या संपाच्या बाबतींत जर त्यानं गिरणीमालकांवर वजन आणलं तर?—"

"नाहीं, तेंहि शक्य नाहीं. प्रांतांतील गिरणीमालकांचं शिष्टमंडळ शेट मोहोताजींच्या नेतृत्वाखालीं दोन तीन दिवसांत मुख्य प्रधान आणि उद्योगमंत्री यांच्या मुलाखतीला जाणार आहे. त्यांच्या कैफियतीचा कच्चा मसुदा स्वतः पंडितजींनींच तयार करून दिला परवां! सध्यां बाजारांत विलक्षण मंदी आहे आणि मालालाहि मुळींच उठाव नाहीं. अशा स्थितींत ते पगारवाढ करणार कशी? गेल्या दहा वर्षांतले उतरते बाजारभाव आणि जीवनमूल्य (Cost of living) यांची तुलनात्मक कोष्टकं देऊन त्यांनीं सिद्ध केलंय आपल्या कैफियतींत कीं, कामगारांचे पगार वाढविण्याची मुळींच गरज नाहीं! उलट संप जर या वेळीं झाला, तर अनायासें पैदास थांबून गोदामांत पडून राहिलेल्या जुन्या मालाचा उठाव होईल. त्या दृष्टीनं त्यांना संप हवा आहे; व संप झाल्याबरोबर

कदाचित् ते कुलपंहि ठोकतील गिरण्यांना! या बाबतींत शेठ गुलाबचंद-जींच्या बंगल्यावर सगळी चर्चा केली आहे आम्ही!—"

"पण खर्चाची काय व्यवस्था करणार आहांत तुम्ही? युनियन जवळ थोडासा पैसा आहे. पण कोष्टी न् कास्तकार यांच्यासाठीं कांहीं उपयोग करतां येणार नाहीं त्याचा. आमच्या किसानसभेजवळ तर एक कवडी नाहीं बघ!—"

"त्याची काळजी नको तुला! परवां गुलाबचंदजींच्या बंगल्या-वर दोन हजारांचे आंकडे पडले या सगळ्या उठावणीच्या खर्चासाठीं! उद्यां जेव्हां तूं काळ्याला उमरेडला पाठवशील, तेव्हां पन्नास रुपये हातावर ठेव त्याच्या न् हिशेब नको मागूं नेहमीप्रमाणं त्याच्याजवळ! नागपुरांत येणारे कोष्टी न् कास्तकार यांना तीन दिवस फुकट जेवण देण्याची व्यवस्था केली आहे आम्ही. शिवाय त्यांच्या म्होरप्यांच्या हातांवर पांच पांच दहा दहा रुपये जरूर पडतील तसे ठेवूं! असेंब्ली हॉलच्या पटांगणांत इतका तरी जमाव आपण आणून उभा केला पाहिजे कीं, प्रियदर्शनला बाहेर येऊन भाषण करण्याची हिम्मत होतां कामा नये! मात्र तूं त्या दिवशीं कोर्टांत जातां कामा नयेस, अण्णा! मोर्चाबरोबर रहा! नाहींतर मोर्चाबरोबर नेहमीप्रमाणं विठोबा, शेळके न् काळे आणि तूं तेवढा सूट चढवून कोर्टांत! असल्या या तुझ्या दुटप्पी वर्तनामुळंच तुला कागदी कम्युनिस्ट हें नांव पडलंय बाररूममध्यें!—"

"पण मी हजर राह्यलंच पाहिजे का, मोहन? मग तूं का नाहीं रे हजर रहात?—"

"मी हजर राह्यलों, तर दंगल घडवून आणायची खटपट कोण करील? इतवारींतल्या त्या दोघां पहिलवानांशी बोलणं चालूं आहे आमचं! असेंब्ली हॉलपर्यंत उन्हांतून तळमळत यावं लागेल लोकांना; तिथं बराच वेळ उभं रहावं लागलं म्हणजे लोक आपोआपच चिडतील;

व कोणताच दिवाण जर उत्तर द्यायला बाहेर आला नाहीं, तर बहुधा तिथंच गडबड सुरू होईल! ती जर नच सुरू झाली, तर आपल्या आखाडेवाल्यांनी दंगल सुरू करायची!—हें सगळं व्यवस्थित जमवून आणायचं, म्हणजे मला कसं हजर रहातां येईल मोर्चाच्या वेळीं? दुसरं असं कीं, नगर आणि प्रांतिक दोन्ही कॉंग्रेस कमिट्यांचे पदाधिकारी मंत्रिमंडळाविरुद्ध होणाऱ्या कोणत्याहि चळवळींत भाग घेऊं शकत नाहींत हें विसरलास तूं!—"

"मग म्हणतोस मी एकट्यानंच हजर रहायचं मोर्चाबरोबर? पण मला वाटतं मला त्या दिवशीं महत्त्वाची केस आहे!—"

अण्णासाहेब रोजनिशी काढण्यासाठीं खिसे चाचपूं लागले.

पण मोहननें त्यांना दरडावणीच्या सुरांत म्हटलें, "हें पहा अण्णा, थापा मारूं नकोस न् रोजनिशीहि काढूं नकोस खिशांतली! एकीकडे कम्युनिस्ट न् पुरोगामी गटाचा पुढारी म्हणून मिरवायला हवं तुला आणि दुसरीकडे कोणत्याहि आणीबाणीच्या प्रसंगीं आघाडीला रहाण्याची हिंमत नाहीं तुझी! तें कांहीं चालायचं नाहीं. तारीख असेल, तर तहकुबी मागून घे! पण तूं मोर्चाच्या वेळीं हजर राह्यलं पाहिजेस न् भाषणाहि केलं पाहिजेस असेंब्ली हॉलसमोर!—"

"तूं एक एक नवीनच काढीत चालला आहेस, मोहन!"

"नवीन काय काढलं? तुला अगदीं अक्कल नाहीं, अण्णा! तूं फक्त कम्युनिझमवरलीं जाडीं जाडीं पुस्तकं वाचावीस न् दारूच्या धुंदींत लेख खरडावेस त्यावर! तुला काय वाटतं रे, राजकारण न् चळवळ म्हणजे युनिव्हर्सिटी युनियनमधले वादाचे जलसे आणि नियतकालिकांतली बौद्धिक कसरत आहे?—माझं ऐकून घे तूं सगळं! कल्पना कर, आपण असेंब्ली हॉलवर मोर्चा नेला; प्रियदर्शननं बाहेर येऊन त्याच्या पुढं बोलूं नये म्हणून पंडितजी आपल्याकडून शक्य तितकी खटपट

करतील. पण, समज, जर प्रियदर्शननें बाहेर येऊन भाषण केलं, तर त्याच्या त्या मिठ्ठास वक्तृत्वानं विरघळून जाणारा विठोबा त्याच्या भाषणाची री ओढून मोर्चातल्या लोकांना वाटेला लावील! अशा वेळीं तुझ्यासारखा खमक्या माणूस नको का हजर राह्यला तिथं? एवढं कसं कळत नाहीं तुला अण्णा?—"

अण्णासाहेब थोडा वेळ घुटमळले आणि नंतर म्हणाले—

"तूं म्हणतोस तें खरं आहे, मोहन! पण विठोबा हजर असतांना न् त्यानं भाषण केल्यावर मी कांहींहि बोललों, तरी तें पटणार आहे का लोकांना?—"

"तूं आपल्या इथंच शंका काढून घे सगळ्या!—"

"शंका नव्हे! वस्तुस्थिति आहे ती अगदीं! विठोबानं काय न् कसं बोलावं हें कांहीं सांगूं शकत नाहीं आम्ही कोणी त्याला! मग उपयोग काय आमच्या तिथं हजर रहाण्याचा न् बोलण्याचा?—"

"उपयोग आहे म्हणूनच तर सांगतों आहें मी इतकं जीव तोडून हजर राह्यला तुला! विठोबाला बोलूं दे काय पाहिजे तें! पण त्याच्या मागोमाग भाषण करून तूं त्याच्या भाषणाचा सगळा परिणाम नाहींसा करूं शकतोस आणि तेवढ्याचसाठीं हजर राह्यला पाहिजे तुला तिथं. मग बोल, हजर राहशील कीं नाहीं? लक्षांत ठेव, तूं मोर्चाच्या वेळीं हजर नव्हतास हें जर पंडितजींच्या ध्यानांत आलं—"

मोहननें अगदीं सावकाश पण जरबेनें ते शब्द उच्चारले. अण्णासाहेब कांटा चमचा खालीं ठेऊन मुकाट्यानें खुर्चीच्या पाठीला टेकले होते. त्यांच्या कानशिलावरून घामाच्या धारा निथळत होत्या; व तोंड अगदीं उतरून गेलें होतें.

मोहननें तें शेवटचें वाक्य उच्चारतांच ते चटकन सांवरून बसले आणि काकुळतीच्या सुरांत म्हणाले—

"तुझा इतका आग्रहच आहे, तर राहीन हजर न् बोलेनहि जरूर पडली तर!"

"छान! छान! अरे, थोडी तरी हिम्मत दाखव अशी एकादे वेळीं! तुला पैसा हवा; पुढारीपणा हवा; पण त्याच्यासाठीं कसलाहि धोका मात्र पत्करायला नको! बायकोसाठीं चोरी करणारा तो मृच्छकटिकांतला शर्विलक तुझ्यापेक्षां हजार पटीनं बरा ठरेल!—"

"खरं आहे बाबा! हें सारं चोरांचं राजकारण आहे! त्यांत कसा निभाव लागणार माझ्यासारख्या सावाचा? मी आपला पढीक समाजवादी आहे!—"

"मग घरीं बैस उद्यांपासून! मोठा आला आहे साव! तूं जर एवढा साव असतास, तर प्रत्येक संपाबरोबर सावकारी गहाणं वाढलीं असतीं कशीं तुझीं?—"

"ए, माझी सावकारी काढूं नकोस पुन्हा! मी हजर राह्यला कबूल झालों ना तुझ्या इच्छेप्रमाणं?—"

अण्णासाहेबांनीं टेबलावरील चषक उचलीत म्हटलें.

# जनसमुद्राला फाळाण

तो संमिश्र जमाव ज्या वेळीं चिटणीस पार्कांतून इतवारीच्या रस्त्यानें असेंब्ली हॉलकडे जावयाला निघाला, त्या वेळीं त्यांत पुरते हजार लोकहि नव्हते. मिरवणुकींतील कोष्ट्यांच्या, किसानांच्या आणि कामगारांच्या हातीं लहान लहान लाल आणि काळे झेंडे होते; जमावाच्या अघाडीला कामगारसंघाचा मोठा थोरला लाल बावटा फडकत होता; व 'शेतसारा पन्नास टक्के कमी करा', 'विणकरांना जिवंत ठेवा', 'क्रांति चिरायु होवो' इत्यादि घोषणांचे फलक मधूनमधून डोकें वर काढीत होते. मिरवणुकीच्या अग्रभागीं किसानसभेचें लाल पथक होतें; व त्याच्या मागें विटोबा, शेळके, काळे प्रभृति नागपुरांतील कार्यकर्ते, इतवारींतील कांहीं कोष्टी पहिलवान, उमरेड, काटोल, सावनेर वगैरे ठिकाणचे किसान कार्यकर्ते अशी शेलकी पुढारी मंडळी एकामागें एक छोटया छोटया रांगा करून चालली होती. या कार्यकर्त्यांच्या मागून

खेड्यांतील कास्तकारांपासून तो शहरांतील धंदेवाईक तमासगिरापर्यंत निरनिराळ्या प्रकारच्या लोकांचा भेसळ जमाव चालला होता.

इतवारीच्या अरुंद रस्त्यांतून हा जमाव जाऊं लागला, तेव्हां त्याची स्थिति विंध्याद्रीच्या खिंडींतून वाट काढणारा नर्मदेचा प्रवाह जसा फुगत जावा तशी झाली. बाजारपेठांतून ऐदीपणानें रेंगाळत असलेल्या तमासगिरांच्या झुंडी या जमावांत येऊन सामील झाल्या; व गांवांतले नाले येऊन मिळाल्यावर बेअंदाज फुगलेला गलिच्छ पाण्याचा पावसाळी ओढा आपल्या बेफाम लोंढयावर नाना प्रकारच्या चिजा घेऊन जसा धो धो करीत वेगानें वहातो, तसा तो आतां झपाट्यानें वाढत चाललेला दोन अडीच हजारांचा जमाव मोठमोठ्यानें आरोळ्या ठोकीत महालांत येऊन थडकला. महालांतून बर्डीच्या रस्त्यानें जातांना बरेच गिरणीकामगार त्याला येऊन मिळाले. बर्डीच्या बाजारांतून असेंब्ली हॉलकडे जाणाऱ्या रस्त्याला लागेपर्यंत तमासगिरांची भर त्या जमावांत सारखी पडतच होती.

उन्हाळ्यांतलें सुरवातीचें कडक ऊन आतां चांगलेंच तापलें होतें; व डोईवर तळपणारा मध्यान्हीचा सूर्यनारायण जितका ताप देत होता, त्यापेक्षां जास्त जोराचे चटके रस्त्यावरली तापलेली धूळ पायांना देत होती. धूळ आणि कचरा यांच्याशीं गिरक्या घेत खेळणारा गरम वारा आपल्या प्रत्येक गिरकीगणिक पहाणें आणि श्वास घेणें अशक्य करून सोडीत होता. जमावांतील लोकांना आतां घामाच्या धारा लागल्या होत्या; व मिरवणुकीबरोबर जरी पाण्याच्या गाड्या होत्या, तरी उन्हाच्या झळीनें लोक अगदीं त्रस्त होऊन गेले होते. मिरवणूक इतवारींतून जात असतां तीन चार व्यापाऱ्यांनीं सबंध जमावाला वाळ्याचा वास लावलेलें थंडगार साखरपाणी पाजलें होतें. त्याची जिभेवर रेंगाळणारी गोडी नाहींशी होऊन आतां तोंडाला झपाट्यानें कोरड पडत होती. विशेषतः बर्डीच्या पोलीस ठाण्यावरून सिव्हिल लाइन्सकडे जाणाऱ्या डामरी

रस्त्याला मिरवणूक वळतांच लोकांचे पाय पोळूं लागले; व गांजा-खेतापासून वर्डीपर्यंत खिदळत आणि ओरडत चाललेला जमाव आतां निमूटपणें वाट तोडीत होता.

पण ती स्तब्धता, ती निःशब्दता क्षणोक्षणीं जास्त जास्त होत चाललेल्या मनस्तापाची द्योतक होती. वरचें स्वच्छ निळें आकाश आणि खालचा तुळतुळीत निळा रस्ता हे जणुं दोन तापलेले तवे होते; व पांढऱ्या टोप्या घातलेलीं हजारों माणसें हीं त्यांच्या दुहेरी तापानें लाह्यांसारखीं होरपळून भाजून निघत होतीं. जमावाच्या त्रस्त, तांबारलेल्या डोळ्यांपुढें आतां फक्त एकच दृश्य दिसत होतें;त्याचे थकलेले, होरपळलेले पाय फक्त एकाच स्थलाकडे ओढले जात होते. तें दृश्य आणि तें स्थल म्हणजे असेंब्ली हॉलसमोरील प्रच्छाय, हिरवेंगार पटांगण ! ती वेगाची स्तब्ध, निःशब्द चाल म्हणजे तें पटांगण एकदांचें लवकर गांठण्याची आतुरता होती.

चिटणीस पार्कामधून मिरवणूक निघाली, तेव्हांपासून तिच्याबरोबर थोडेसे पोलिस होते; व रस्त्यावरहि नाक्यानाक्यावर नेहमीपेक्षां जास्त शिपाई लाठ्या घेऊन उभे असलेले दिसले. पण सिव्हिल लाइन्सच्या रस्त्याला मिरवणूक लागतांच लोकांना बंदोबस्त अधिक कडक असल्याचा अनुभव आला; व ज्या असेंब्ली हॉलचें पटांगण गांठण्याची उत्सुकता लोकांना आतां लागली होती, त्याच्या बंद केलेल्या दरवाजांवर पोलिसांचें पथक उभें असल्याचें त्यांच्या दृष्टीला पडलें.

असेंब्ली हॉलपासून थोड्या अंतरावर मिरवणूक येतांच सिटी-साहेबांनीं पुढें होऊन विठोबाला सांगितलें, "जमावाला बाहेरच थोपवून धरा आणि तुमच्यापैकीं ज्या शिष्टांना मुख्य प्रधानांची भेट घ्यायची असेल, त्यांचीं नांवें मजजवळ द्या––"

त्यावर विठोबानें लीनतेनें असें उत्तर दिलें, "तुम्ही जमावाला रस्त्यावर रोखून ठेवूं नका. आंत सोडा. लोक कोणत्याहि प्रकारची

गडबड करणार नाहींत अशी मी हमी घेतों. आंत आल्यावर आम्ही शिष्टमंडळांतील प्रतिनिधींचीं नांवें देऊं--"

पण सिटीसाहेबांनी तितक्याच लीनतेनें विठोबाला सांगितलें, "जमावाला आंत घेणें आम्हाला शक्य नाहीं !--"

"कां बरं? मुख्य प्रधानांचा हुकूम आहे कां लोकांना आंत सोडूं नये म्हणून? तसं असेल, तर मला स्पष्ट सांगा—"

विठोबानें अगदी शांतपणानें विचारलें.

पण त्याच्या मनाचा क्षोभ त्याच्या त्रस्त, आंठाळलेल्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होता.

त्यावर सिटीसाहेब हंसत हंसत म्हणाले, "इतक्या साध्या कामांत मुख्य प्रधानांचा हुकूम कशाला हवा? मीच आपल्याला सांगतों, जमावाला आंत सोडणं शक्य नाहीं. आपल्यापैकीं जे पांच किंवा दहा शिष्ट मुख्य प्रधानांना भेटूं इच्छीत असतील, त्यांना मी स्वतः आंत घेऊन जाणार आहें--"

"आभारी आहे मी आपला या मेहरबानीबद्दल! पण मुख्य प्रधानांचं दर्शन घेण्यासाठीं, त्यांना आपलीं गाऱ्हाणीं समक्ष सांगून त्यांचं उत्तर ऐकण्यासाठीं हे हजारों लोक उन्हातान्हांतून इथवर आले आहेत. त्यांना आपण आंत सोडा. मग आम्ही दहाजण त्यांच्या वतीनं मुख्य प्रधानांना भेटतों—"

"हे लोक इथपर्यंत का आले आहेत हें मला माहित आहे. पण त्यांना आंत सोडणं मला शक्य नाहीं, याबद्दल माफ करा! मग आपण आंत चलतां ना?—"

सिटीसाहेब आणि विठोबा यांच्यांत चाललेलें हें संभाषण पुढच्या रांगांतील कांहीं इसमांना ओझरतें ऐकूं आलें; व त्यांच्यांत खळबळ उडाली. आणि पाण्यांत उत्पन्न झालेली एक लाट जशी आपल्या आंदोलनानें पाण्याचा सारा पृष्ठभाग विचलित करून सोडते, त्याप्रमाणें

त्या खळबळीचं लोण क्षणार्धांत मिरवणुकीच्या शेवटच्या रांगेपर्यंत जाऊन पोंचलें.

लोक या वेळीं अत्यंत संतप्त झाले होते. पोलिसांनीं मिरवणूक रोखून धरल्यामुळें असेंब्ली हॉलसमोरचें हिरवें प्रच्छाय पटांगण गांठण्याची त्यांची अपेक्षा गारद झाली होती. उन्हाचा ताप चालत असतांना जितका भासला नाहीं, तितका आतां जास्त जास्त तीव्रतेने जाणवत होता. अशा स्थितींत सिटीसाहेब आणि विठोबा यांच्यांत चाललेल्या त्या संभाषणाचे जे विपर्यस्त प्रतिध्वनि जमावाच्या शेवटल्या रांगेपर्यंत जाऊन पोंचले, त्यामुळें लोकांचीं संतापलेलीं मनें एकदम भडकून क्षुब्ध होऊन गेलीं.

तितक्यांत जमावाच्या शेवटल्या रांगेंतून घोगरा, कर्कश आवाज उठला--

"आम्हांला उन्हांत रस्त्यावर रोखतात,ते आमचे दिवाण नव्हत !–"

तो आवाज उठतांच एकदम गलका, प्रचंड गलका सुरू झाला. तशा प्रकारचे शतावधि, सहस्त्रावधि आवाज जमावांतून उठले.

विठोबानें एकदम जमावाकडे वळून आपले दोन्ही हात वर केले. त्याबरोबर गलका थोडा कमी झाला. तेव्हां सिटीसाहेब उपरोधानें हंसून विठोबाला म्हणाले, "जमाव पुष्कळच शांत दिसतोय तुमचा !--"

"हो. खरोखरीच शांत आहे. मात्र यापुढं त्याला शांत राहूं द्यायचा कीं नाहीं हें आपल्या शहाणपणावर, आपल्या सौजन्यावर अवलंबून आहे—"

"मी आपल्याला प्रथमच सांगितलं कीं, आपण आंत येऊन मुख्य प्रधानांची भेट ध्या. मग त्यांनीं परवानगी दिल्यास मी जमावाला आंत सोडतों--"

"म्हणजे जमावाला आंत सोडायला मुख्य प्रधानांची परवानगी नाहीं असं समजायचं का आम्ही ?--"

"मी आपल्याला सुरवातीलाच सांगितलं कीं, असल्या साध्या बंदोबस्ताच्या कामाबद्दल आम्ही मुख्य प्रधानांना तसदी देत नसतों!——"

"म्हणूनच मी म्हणतों कीं, यापुढं जर जमाव शांत राहिला नाहीं, तर त्याची जबाबदारी आपल्यावर राहील. आपण जमावाला आंत सोडाल, तर मी शांतता राखण्याची हमी घेतों——"

"शांतता कशा रीतीनं राखावी, हें आम्हांला चांगलं समजतं! त्यासाठीं बाहेरच्या हमीवर अवलंबून राहण्याची आमची पद्धत नाहीं!—"

सिटीसाहेब आपल्या मिशीच्या उजवीकडल्या टोंकाला पीळ भरून हंसत हंसत उद्गारले.

इतक्यांत त्यांच्या शेजारीं उभा असलेला सी. आय. डी. चा एक अधिकारी आर्जवी आवाजांत विठोबाला म्हणाला, "उगाच वाद का वाढवतां, विठोबाजी? शांतता राखण्याची जितकी इच्छा तुम्हाला आहे, तितकीच आम्हालाहि आहे. तुम्ही आंत चला. दहा पंधरा मिनिटं हे लोक इथंच थांबतील. तुमची मुख्य प्रधानांशीं भेट झाल्या-वर मग जरूर वाटली न् त्यांनीं हुकूम दिला, तर आम्ही या लोकांना आंत घेऊं.——या तडजोडींत खरोखरी कोणालाच कमीपणा नाहीं. असें-ब्लीचं काम चालूं असतांना एवढ्या मोठ्या जमावाला आंत सोडणं सोईचं होणार नाहीं. तरीसुद्धां त्याला आंत घेण्याचं आम्ही अजिबात नाकारीत नाहीं. मग तुम्ही दहा मिनिटं आंत येण्याचं कां नाकारतां, विठोबाजी?——"

त्या अधिकाऱ्याच्या या मिनतवारीच्या समजूतदार बोलण्यानें विठोबा थोडा विरघळला.

पण जमावाचा क्षोभ क्षणाक्षणाला वाढत होता. मागच्या रांगा पुढच्या रांगांना रेटीत होत्या; व लाल सैनिकांनीं जर विठोबा आणि त्याच्या शेजारीं उभे असलेले पोलीस अधिकारी यांच्या भोंवतीं सांखळी

केली नसती, तर त्या रेटारेटीच्या धडाक्यानें ते कोलमडून पडले असते. पूर आल्यामुळें बेफाम झालेल्या प्रवाहाच्या लाटा जशा धरणाच्या भिंतीला धडका देतात, तसा तो प्रक्षुब्ध जमाव लाल सैनिकांच्या परिघावर सारखा जोरानें आदळत होता.

शेवटीं विठोबा दोन्ही हात वर करून म्हणाला "बंधूंनों, असेंब्लीचें काम सध्यां चालू आहे. अशा वेळीं जर आपण पटांगणांत गेलों, तर तर त्या कामांत व्यत्यय उत्पन्न होईल असं सिटीसाहेबांचं म्हणणं आहे. म्हणून त्यांची आपल्याला अशी सूचना आहे कीं, आपल्या दहा प्रतिनिधींनीं प्रथम आंत जाऊन मुख्य प्रधानांची भेट घ्यावी. मग जरूर पडल्यास ते सर्वांना आंत सोडतील—"

"तोंपर्यंत आम्ही उन्हांत तळमळत उभें रहावें काय?" एका इसमानें कर्कश आवाजांत ओरडून विचारलें.

त्याबरोबर जोराचा गलका एकदम सुरू झाला.

तेव्हां विठोबा दोन्ही हात वर करून शांतपणानें म्हणाला, "आपण सगळे आतांपर्यंत दोन अडीच तास उन्हांतून चालून आलों. आणखी फार तर दहा पंधरा मिनिटं आपल्याला उन्हांत उभं रहावं लागेल. माझे शूर बंधु तेवढा सोशीकपणा दाखवतील आणि आम्हांला आंत जायला परवानगी देतील अशी मला आशा आहे—"

विठोबानें हे शब्द उच्चारले मात्र—

जमावांतला गलका एकदम ओसरून गेला.

नंतर कोष्टी, किसान आणि कामगार या तिन्ही वर्गांचे प्रत्येकीं तीन प्रतिनिधि बरोबर घेऊन तो नऊ जणांच्या शिष्टमंडळासह पोलीस अधिकाऱ्यांबरोबर आंत गेला.

असेंब्लीची बैठक चहापानासाठीं तहकूब व्हावयाला अद्याप अर्धा तास होता.

पण, असेंब्ली हॉलच्या समोर जमाव येऊन थडकल्याबरोबर जो पहिला गलका प्रियदर्शनच्या कानांवर पडला, तो ऐकतांच उत्तमरावांना बरोबर घेऊन तो आपल्या खोलींत आला.

त्यानें खिडकींतून पाहिलें—पांढऱ्या टोप्यांचा क्षुब्ध समुद्र समोर हेलावत असलेला त्याला दिसला.

त्यानें लगेच शेजारीं उभ्या असलेल्या उत्तमरावांना म्हटलें, "या लोकांना आंत का सोडलं नाहीं? झालीच असती थोडी गडबड तर असेंब्लीची बैठक तहकूब करतां आली असती! मी सरळ जाऊन भेटतों त्यांना!—"

"पण भेटून सांगणार काय? काल गिरणीमालकांच्या शिष्ट-मंडळानं आपली बाजू तुमच्यापुढं मांडली. त्यानंतर कामगारांना आपण कांहीं निश्चित आश्वासन देऊं शकतों कां? शिवाय पंडितजी कामगारांच्या पगाराच्या प्रश्नाला हात घालायला तयार नाहींत. तें त्यांचं खातं आहे—"

"होय. तें माहित आहे मला. पण आजचा हा मोर्चा नुसता कामगारांचा नाहीं. त्यांत कास्तकार आहेत; कोष्टी आहेत. मला वाटतं त्यांना उन्हांत तळमळत उभे ठेवण्यापेक्षां मी जर आतांच जाऊन त्यांच्यासमोर भाषण केलं, तर शांतपणानं परत फिरतील ते—"

"पण सांगणार काय त्यांना?—"

प्रियदर्शन कांहीं बोलला नाहीं. त्यानें घाईघाईनें दोन चिठ्या लिहून त्या चपराशाला दिल्या. आणि तो उत्तमरावांना म्हणाला—

"सांगतों तुम्हांला थोड्या वेळानं!—"

त्यानें खिडकीजवळ जाऊन पुन्हा एकवार बाहेर पाहिलें आणि खोलींत मुकाट्यानें फेऱ्या घालावयाला सुरवात केली.

तोंच पंडितजी आणि दाजीसाहेब आंत आले. त्यांना दारांतच

पाहून प्रियदर्शननें विचारलें, "हा जमाव आपल्या भेटीला आला आहे, पंडितजी! आपण बोलतां जाऊन त्याच्यापुढं ?—"

त्याच्या दृष्टींतला, वृत्तींतला आणि उद्गारांतला तो आवेग पाहून वृद्ध पंडितजी किंचित् चांचरले. पण लगेच म्हणाले—

"माझं मत असं आहे कीं, आपण फक्त त्यांच्या शिष्टमंडळाला भेट द्यावी. जमावाला आंत घेऊं नये आणि त्याच्यासमोर भाषणहि करूं नये!—"

"भाषण करूं नका वाटल्यास! पण लोकांना ताबडतोब आंत घ्या. दोन अडीच तास उन्हांतून पायपीट करीत लोक आले आहेत. नुसतं आंत आल्यानंसुद्धां अर्धं समाधान होईल त्यांचं!—"

दाजीसाहेब मुख्य प्रधानांच्या टेबलावरील पानदानांतली पट्टी तोंडांत कोंबीत म्हणाले.

"माझा विचार त्यांना आंत येऊं देण्याचा तर आहेच, पण शिवाय त्यांच्यासमोर भाषण करण्याचाहि आहे—"

"पण भाषण करून सांगणार काय ?—"

"त्याबद्दलच आपला सल्ला हवा आहे मला, पंडितजी! कारण कोष्टी आणि कामगार या दोहोंच्या बाबतींत आपणच खरोखरी मला सल्ला देऊं शकतां; न् त्या दृष्टीनं आपणच जमावापुढं भाषण करणं योग्य होईल—"

"पण मी माझं मत आपल्याला स्पष्टच सांगितलंय. असल्या बेजबाबदार जमावापुढं जाऊन बोलणं मला मुळींच पसंत नाही—"

"पूर्वी जेव्हां आपण कौन्सिल हॉलवर मोर्चे नेले आणि चळवळी केल्या, तेव्हां त्या वेळचे गृहमंत्री याच 'बेजबाबदार' या विशेषणानं संभावना करीत होते आपली!—"

"मी या जमावाला बेजबाबदार म्हणतो तें या अर्थानं कीं नगर कांग्रेस किंवा प्रांतिक कांग्रेस यांचा पाठिंबा आहे कां या मोर्चाला?—"

"पण कामगारसंघ, विणकरसंघ आणि किसानसभा या संस्था प्रातिनिधिक नाहींत का, पंडितजी?—पण हा वाद नको. मी काय बोलावं याबद्दल आपण सल्ला द्या मला—"

"काल गिरणीमालकांची बाजू आपण ऐकलीच आहे; व शेतकऱ्यांना जी साराकपात देणं शक्य होतं तीहि गेल्या बैठकींतच दिली आहे आपण. तेव्हां आतां आणखी काय सांगणार? म्हणूनच मी म्हणतों कीं, जमावापुढं जाऊन भाषण करण्याची आज कांहीं गरज नाहीं. त्यामुळं उपद्व्यापी लोकांना फूस मात्र मिळाल्यासारखी होते. आपण शिष्टमंडळाची भेट घेऊं आणि त्याची समजूत घालूं—"

पंडितजी हें बोलत आहेत, तोंच एका सब इन्स्पेक्टरनें आंत येऊन शिष्टमंडळ बाहेर उभें असल्याची वर्दी मुख्य प्रधानांना दिली.

"इथं आणखी खुर्च्या आणवा आणि त्यांना आंत पाठवा—" प्रियदर्शननें त्याला म्हटलें.

चपराशानें खुर्च्या मांडल्यावर सब इन्स्पेक्टर शिष्टमंडळाला आंत घेऊन आला.

"या विठोबाजी! जवळ जवळ पांच महिन्यांनीं गांठ पडते आहे पुन्हा आपली—"

प्रियदर्शननें आंत आलेल्या विठोबाचें नमस्कारपूर्वक स्वागत करून हंसत हंसत म्हटलें.

"हो. पण आज आपली गांठ घेण्यासाठीं फार प्रयास पडले आम्हाला!—"

"माफ करा हं! असेंब्लीचं काम सुरूं असल्यामुळं पोलिसांनीं मंडळी रोखून धरलेली दिसताहेत आपली—"

"त्यांना आंत सोडलं, तरी ते गडबड करणार नाहींत अशी हमी दिली होती मी—"

विठोबानें उत्तर दिलें. आणि शिष्टमंडळांतील प्रतिनिधींची तिघाहि दिवाणांशीं त्यानें ओळख करून दिली.

त्यानंतर त्यानें कोष्टी, किसान आणि कामगार यांच्या मागण्या समजावून सांगितल्या. कामगारांची मागणी गेल्या दहा वर्षांतील पगार-कपात रद्द करण्याबद्दल होती; कास्तकारांना शेतसारा पन्नास टक्क्यांनीं कमी व्हावयाला हवा होता; व कोष्टयांनीं पॉवरलूमवर निघणारा जनानी माल कायद्यानें बंद करून सरकारनें आपल्याला संरक्षण द्यावें अशी मागणी केली होती.

विठोबानें त्या मागण्या तोंडीं सांगितल्या आणि नंतर तीन अर्जहि मुख्य प्रधानांना सादर केले.

त्यानंतर प्रियदर्शन शिष्टमंडळाला उत्तर देणार, तोंच पंडित वाजपेयींनीं बोलावयाला सुरवात केली.

"कामगारांनीं पगारकपात रद्द करण्याची जी मागणी केली आहे ती कितपत रास्त वाटते तुम्हांला?—"

"ती रास्त वाटली नसती, तर मी त्यांच्यातर्फे आपल्याशीं बोलणं करायला आलों नसतों आज!—"

"ही मागणी करतांना गेल्या दहा वर्षांतली वाढती मंदी आपण लक्षांत घेतली होती का? कीं केवळ आज कॉंग्रेस मंत्रिमंडळ अधिकारारूढ आहे म्हणून आपण ही मागणी करतां आहांत?—"

"आपलं दुसरं विधान बरोबर आहे. कॉंग्रेस मंत्रिमंडळ अधिकारारूढ आहे आणि तें आपल्याला न्याय देईल अशी आमची भावना असल्यामुळेंच आम्ही ही मागणी करीत आहोंत. आपण उत्पन्न केलेला मंदीचा प्रश्न आमच्या ध्यानांत आलेला नाहीं, असं नाहीं. पण मंदीचा हा आक्षेप दुधारी आहे. मंदीमुळं गेल्या दहा वर्षांत बाजारभाव इतके घसरलेले असतांना सरकारनं शेतकऱ्यांच्या साऱ्यांतली एक पै तरी कमी केली आहे का?—"

"काँग्रेसनं अधिकार हातीं येतांच छोटया शेतकऱ्यांचा सारा कमी केला हें तुम्ही विसरूं नका !--"

"त्यामुळंच तर आम्हांला आपल्याकडे येण्याचा धीर झाला. ज्या काँग्रेस सरकारनें शेतकऱ्यांची दाद इतक्या साक्षेपानं घेतली, तें कामगारांची उपेक्षा करणार नाहीं अशी आमची खात्री आहे--"

"मग ज्या मंत्रिमंडळावर तुमचा इतका विश्वास आहे, त्याला संप करण्याचा धाक तुम्ही का दाखवितां ?--"

"मंत्रिमंडळानं कारभार हातीं घेतल्याबरोबर आम्ही त्याला आपल्या मागण्या विनयानं सादर केल्या. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं--"

"मंत्रिमंडळाला कांहीं तेवढंच एक काम नाहीं ! शिवाय त्या प्रश्नाला जशी तुमची एक बाजू आहे, तशीच गिरणीमालकांचीहि बाजू आहे. या मंदीच्या काळांत आपल्याला पगारकपात रद्द करणं शक्य नाहीं असं मालकांचं म्हणणं आहे --"

"तेजीच्या काळांत जेव्हां मालकांना क्रोडों रुपयांचा नफा पडला, तेव्हां तरी त्यांनीं आपण होऊन कामगारांचे पगार कधीं वाढवले होते का ? शिवाय, मंदी असली, तरी कापडाचा खप सारखा वाढतो आहे. तेव्हां मंदीचा अर्थ एवढाच कीं, पूर्वीसारखा दामदुमटीचा नफा आज मालकांना मिळत नाहीं. पण, मंदी असो कीं तेजी असो, कामगारांना पोटभर घास मिळतो आहे कीं नाहीं हें पहाणं हें सरकारचं कर्तव्य नाहीं का ?--"

हें वाक्य विठोबा उच्चारीत आहे, तोंच एकदम प्रचंड गलका कानावर येऊन आदळला.

तेव्हां पंडितजींनीं रागानें विठोबाला विचारलें--

"असेंब्लीचं काम चालूं असतां तुमच्या लोकांनीं अशा तऱ्हेचा गोंगाट माजवावा, हीच तुमची शांतता आणि शिस्त काय ?--"

"लोक पाऊण तास उन्हांत उभे आहेत. पोलिसांनीं जर त्यांना आंत सोडलं असतं, तर त्यांनीं कोणत्याहि प्रकारची गडबड केली नसती—"

विठोबानें अगदीं शांतपणानें उत्तर दिलें.

पण गलका क्षणाक्षणाला वाढत होता, क्षणाक्षणाला जवळ येत होता.

म्हणून प्रियदर्शन उठून खिडकीजवळ गेला—

पटांगणाच्या दरवाजावर चाल करून येत असलेल्या प्रक्षुब्ध जनाचाला पोलीस आवरण्याचा प्रयत्न करीत असल्याचें दृश्य त्याच्या नजरेस पडलें.

त्याच्या मनांत आलें, जमावाला आंत सोडण्याचा हुकूम देणें हाच खरोखरी त्याला आवरण्याचा, त्याला शांत करण्याचा योग्य उपाय आहे—

म्हणून तो खोलीच्या दाराशीं उभ्या असलेल्या सबइन्स्पेक्टरला कांहीं सांगणार—

तोंच जमावांतले पंधरा वीस इसम आवाराच्या कडघरावरून दणादण उड्या टाकून आंत आले—

त्याबरोबर पोर्चजवळ उभ्या असलेल्या पोलीस अधिकाऱ्यानें शिटी दिली—

आणि पटांगणांत ठिकठिकाणीं खडे असलेले वेत्रधारी पोलीस आंत येणाऱ्या लोकांच्या अंगावर धांवले—

लोक झपाझप आंत उड्या टाकीत होते—

—छड्यांचा आवाज सपासप येत होता.

तें दृश्य पहातांच प्रियदर्शन तडक बाहेर आला.

आणि पोर्चपाशीं उभ्या असलेल्या पोलिस अधिकाऱ्याला त्यानें दरवाजा उघडून जमावाला आंत घेण्याचा हुकूम सोडला.

त्याच्या तोंडून ते हुकमाचे शब्द बाहेर पडतात न पडतात, तोंच त्याच्या मागोमाग बाहेर आलेले पंडितजी उद्गारले—

"जमावाला या वेळीं आंत येऊं देणं धोक्याचं होईल. लोक खवळलेले आहेत. आपल्याजवळ पुरेसे पोलीस बंदोबस्ताला नाहींत!—"

"आतां लोकांचा बंदोबस्त मी स्वतः करीन, पंडितजी! पोलीस काय करूं शकतात तें मी पाह्यलं आहे!—"

प्रियदर्शननें मागें न पाहतांच पंडितजींना अगदीं शांतपणानें उत्तर दिलें.

आणि तो आपल्या भोंवतीं उभ्या असलेल्या शिपायांपैकीं एकाला म्हणाला—

"माझ्या खोलींतलं टेबल पटांगणांत आणून ठेवा लौकर!—"

तो हें सांगत असतांनाच दरवाजा उघडला गेला आणि जमावाचा लोंढा वेगानें आंत घुसला—

पटांगणांतील हिरवळीची सुंदर किनार त्या क्रुद्ध, अनावर लोंढ्याच्या पायदळीं तुडवली गेली. कुंड्या कोलमडून फुटल्या आणि फुलझाडांचे ताटवे उध्वस्त झाले—

माणसांच्या पायांखालीं माणसेंहि सांपडून चेंगरलीं!

प्रियदर्शन निश्चल नजरेनें लोकांचा तो क्षोभ आणि तो वेग, ती धांवपळ आणि तो हलकल्लोळ पहात होता—

सिटीसाहेब धावऱ्या धावऱ्या धांवतच त्याच्याजवळ आले—

आणि आपलें घामानें थबथबलेलें कपाळ पुशीत म्हणाले—

"लोक फार खवळलेले आहेत. आपण आपल्या खोलींत जाल, तर बरं होईल! मी फोन करून आणखी माणसं बोलावीत आहें!—"

"तुम्ही फोन करूं नका. लोक कितीहि खवळलेले असले, तरी मला त्यांना भिण्याचं कारण नाहीं. मी त्यांना शांत करूं शकेन!"

आणि हे शब्द उच्चारून प्रियदर्शन झपाट्यानें पायऱ्या उतरला आणि आल्या रोखानें जवळ येत असलेल्या जमावाच्या गर्दींत शिरला--

त्याला वाट करून देण्यासाठीं पोलीस शिपाई धांवत पुढें आले--

त्याबरोबर तो त्यांना म्हणाला, "तुम्ही सारे पोर्चपाशीं उभे रहा. या वेळीं कोणीहि माझ्याबरोबर नको!--"

"मी बरोबर यायला तर हरकत नाहीं ना तुमची?--"

"कोण उत्तमराव? भय्या, तुम्ही हवेतच या वेळीं माझ्या पाठीशीं!--"

त्यानें उत्तमरावांचा हात घट्ट धरून म्हटलें.

त्याच्या भोंवतीं आतां लोकांचा गराडा पडला आणि तो गराडा क्षणोक्षणीं वाढत होता.

पण त्या गराड्यांतले लोक त्याला आदबीनें वाट देत होते. त्यांत-ल्याच दहा बारा तरुणांनीं त्या दोघांच्या भोंवतीं साखळी केली होती--

भरतीच्या तुफान लाटेवर स्वार होऊन उत्तम पोहणारा पुढें निघून जावा आणि गटंगळ्या खात मागें राहिलेल्या माणसांनीं तें दृश्य चकित होऊन पहावें, त्याप्रमाणें पोर्चपाशीं पायऱ्यांवर उभे असलेले पंडितजी आणि पोलीस अधिकारी तो विलक्षण देखावा स्तिमित मनानें पहात होते--

त्या खवळलेल्या जमावांतून, मुख्य प्रधानांच्या जवळ जाण्यासाठीं चाललेल्या त्या जबरदस्त रेटारेटींतून वाट काढण्यासाठीं विठोबा आणि त्याचे सहकारी धडपडत होते--

विठोबाला सारखें वाटत होतें कीं, या वेळीं जर मुख्य प्रधानांवर कोणी कांहीं फेकलें, कांहीं अतिप्रसंग केला, तर आपली केवढी नानुष्की!--

म्हणून तो सारखा दोन्ही हात वर करून लोकांना बसावयाला सांगत होता, शांततेनें वागण्याचा आदेश देत ओरडत होता--

पण त्याच्याकडे कोणी ढुंकूनहि पहात नव्हतें—

साऱ्या जमावाचा ओघ, सगळ्या लोकांचीं अंतःकरणें या वेळीं एकाच व्यक्तीकडे ओढलीं, खेचलीं गेलीं होतीं—

आणि पुराच्या प्रचंड लोंढयांत जसा प्रचंड भोवरा उत्पन्न व्हावा—

त्याप्रमाणें टेबलाजवळ पोंचलेल्या प्रियदर्शनच्या भोंवतीं शेंकडों लोकांचा घेर पडला होता.

त्यानें टेबलावर चढण्यासाठीं दोन्ही हात टेकले आणि तो उडी मारून वर चढणार—

तोंच त्याच्या भोंवतालच्या सांखळींतील तीन तरुणांनीं चटकन उचलून त्याला टेबलावर उभा केला!

तत्क्षणींच टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला, महात्माजींच्या नांवाचा प्रचंड जयघोष झाला—

त्याचा पांढरा शुभ्र पोषाख, किंचित् श्रांत पण हंसरी मुद्रा, उन्हाची तिरीप तोंडावर पडली असतांहि आत्मविश्वासानें जमावाकडे पहाणारे प्रसन्न नेत्र आणि डोक्यावरील टोपी थोडी मागें झुकल्यामुळें उन्नतता दर्शविणारा विशाल भालप्रदेश!—त्यानें एकवार सगळीकडे नजर फेंकून लोकांना वंदन करतांच त्याच्या नांवाचा जयजयकार झाला.

त्याबरोबर त्यानें स्मित केलें.

—उन्हाच्या तिरीपेंत त्याची धवल दंतपंक्ति हिरकण्यांप्रमाणें झळकली; त्याचें आरक्तगौर मुख सूर्यकिरणांनीं उमललेल्या तांबूस कमलासारखें लोकांना भासलें!—

आणि खडया मोहक हिंदींत बोलावयाला त्यानें सुरवात केली.

"बांधव हो!"—

त्याच्या तोंडून तो गंभीर शब्द कानावर पडतांच तो खवळलेला समाज क्षणार्धांत शांत झाला.

"बांधवहो, मी प्रथम आपली माफी मागतों. आपण एवढ्या उन्हांतून मला भेटण्यासाठीं आलां असतां आपल्याला इतका वेळ तिष्ठत उभें रहावें लागलें, याबद्दल मला अत्यंत खेद वाटतो. यांत पोलिस अधिकाऱ्यांचा कांहींहि दोष नाहीं. असेंब्लीचें काम आंत चालू आहे. त्या कामांत व्यत्यय येऊं नये म्हणून त्यांनीं आपल्याला आंत घेतलें नाहीं. आपल्यापैकीं कांहींना छड्या मारलेल्या मी पाहिल्या;–त्याबद्दलहि मी अत्यंत दिलगीर आहे. आपल्याला मारण्यांत आलेल्या त्या छड्यांचे वळ माझ्या अंतःकरणावर उठले आहेत, हें आपण लक्षांत घ्या. माझ्या भेटीला आलेल्या आपल्या प्रतिनिधींनीं आपल्या मागण्या आतांच मला सांगितल्या. बांधवहो, मी मुख्य प्रधान असलों, तरी स्वतःचा मुखत्यार नाहीं; स्वतःच्या कल्पनांप्रमाणें वागावयाला आणि तत्त्वांप्रमाणें चालावयाला मोकळा नाहीं. राष्ट्रसभेचा सेवक म्हणून मी मुख्य प्रधानाचें काम करीत आहे; त्या महान् संस्थेच्या हुकुमाप्रमाणें मला चालावयाचें आहे. त्या महान् संस्थेनें आखून दिलेला कार्यक्रम पार पाडणें हें माझें पहिलें कर्तव्य आहे. म्हणून मी त्या महान् संस्थेच्या सूत्रधारांचा सल्ला घेतल्याशिवाय आपल्याला कोणतेंहि आश्वासन देऊं शकत नाहीं!—"

त्याच्या तोंडून हें वाक्य बाहेर पडतांच लोकांत थोडी चलबिचल झाली—

"पण मी व्यक्तिशः काय करण्याचें योजलें आहे, तें आपल्याला मोकळ्या मनानें सांगतों. छोट्या शेतकऱ्यांच्या साऱ्यांत आम्ही केलेली कपात तुम्हांला माहीतच आहे. पण तेवढ्यानें शेतकऱ्यांचें दैन्य कमी होत नाहीं, याची मला जाणीव आहे. म्हणून मी असें ठरवलें आहे कीं, या नव्या वर्षीं सरसकट वीस टक्के सारा कमी करायचा—"

त्यानें त्या घोषणेचा उच्चार करतांच टाळ्यांचा प्रचंड कडकडाट आणि त्याच्या नांवाचा जयघोष झाला—

"मंत्रिमंडळ स्थापन झाल्याबरोबर कामगार बंधूंनीं आम्हांला केलेल्या पानसुपारीच्या वेळीं जें आश्वासन मी त्यांना दिलें होतें, तें माझ्या लक्षांत आहे. कामगारांचा प्रश्न कायमचा मिटविण्याचा एकच उपाय मला दिसतो. तो म्हणजे जीवनवेतनाचें प्रमाण निश्चित करणें. या प्रश्नाला अर्थातच अनेक बाजू आहेत. पण प्रांतांतील गिरणधंदा आणि इतरहि सर्व धंदे यांच्या परिस्थितीची पहाणी करून आणि त्याबरोबरच कामगारांच्या योग्य गरजा लक्षांत घेऊन जीवनवेतनाचें प्रमाण ठरविणें अवश्य आहे. त्यासाठीं एक कमिटी नेमण्यांत येईल आणि बहुधा येत्या जुलैपर्यंत मी जीवनवेतनाचा कायदा असेंब्लीला सादर करीन. तोंपर्यंत मात्र आपल्याला वाट पहावी लागेल—"

'आमची हरकत नाहीं', 'आमची हरकत नाहीं', असे आवाज एकदम जमावांतून उठले.

"विणकरांचा प्रश्नहि असाच गुंतागुंतीचा आहे. पावरलूमवर निघणारा जनानी माल कायद्यानें बंद करणें कितपत शक्य होईल, याची मला कल्पना नाहीं. पण सहकारी तत्त्वावर विणकरांची संघटना करण्याची आणि त्यांना काम पुरविण्याची योजना सध्यां तज्ज्ञांकडून तयार केली जात आहे. आपल्या सूचना मी त्या तज्ज्ञांपुढें ठेवीन. आपल्या प्रांतांतील कसबी विणकर देशोधडीला लागावेत हें खरोखरी सरकारला कमीपणा आणणारें आहे आणि या गोष्टीची सरकारला जाणीवहि पण आहे; म्हणून माझ्या लक्षांत विणकरांची दैन्यावस्था येतांच आम्ही हा प्रश्न तज्ज्ञांकडे सोंपविला. त्यांच्याकडून योजना तयार होऊन येतांच सरकार ती अंमलांत आणण्याचा प्रयत्न करील. मला जें आपल्याला सांगावयाचें होतें, तें मी खुल्या दिलानें सांगितलें आहे. आणि मला आशा आहे कीं, माझ्या या योजना अंमलांत आणावयाला आपण बंधुभावानें मला जरूर तेवढा वेळ द्याल—"

तो हे शब्द उच्चारीत असतांनाच विठोबा टेबलावर चढला आणि त्याच्या शेजारीं उभा राहिला

त्यानें पुन्हा एकदां लोकांना नमस्कार केला आणि तितक्यांत कोणीतरी टेबलावर आणून ठेवलेल्या खुर्चीवर तो बसला.

त्याबरोबर पुन्हा टाळ्यांचा कडकडाट आणि जयघोष झाला.

तो जयनाद विरतांच विठोबानें बोलावयाला सुरवात केली.

"मुख्य प्रधानांचें भाषण आपण सर्वांनीं ऐकलेंच आहे. त्यांच्या मधुर भाषणानें आपले सर्व कष्ट आणि दुःख यांचा परिहार झाला आहे. त्यांनीं सरकारतर्फे कोणतेंहि आश्वासन आपल्याला दिलेलें नाहीं. जें आश्वासन दिलें आहे, तें स्वतःतर्फे, एका व्यक्तीतर्फे म्हणून दिलें आहे. पण मुख्य प्रधानांची कळकळ आणि प्रामाणिकपणा आपणा सर्वांना माहित आहे. त्यांच्यासारखा स्वतःच्या शब्दाला जागणारा चारित्र्यवान् मनुष्य आपल्या प्रांतांत दुसरा नाहीं. त्यामुळें त्यांनीं व्यक्तिशः म्हणून जें आश्वासन आपल्याला दिलें आहे, त्यावर आपण निःशंक मनानें विश्वास ठेवा. कोणत्याहि सरकारी घोषणेपेक्षां त्यांच्या शब्दाची किंमत जास्त आहे. कारण, प्रसंग आला, तर आपला शब्द खरा करून दाखविण्यासाठीं ते कोणताहि त्याग करावयाला बिनदिक्कत तयार होतील !——"

विठोबाचें तें वाक्य कानांवर पडतांच पुन्हा जमावानें प्रियदर्शनच्या नांवाचा जयघोष केला.

आतां ती अनाहूत सभा संपली होती. पण टेबलाभोंवतीं पडलेला लोकांचा गराडा कमी होईना आणि प्रियदर्शनला खालीं उतरतां येईना.

कांहीं लोकांनीं पुढें होऊन त्याच्या पायांना स्पर्श केला.

त्याबरोबर पाय झटकन मागें घेऊन प्रियदर्शननें म्हटलें—

"एका माणसानं दुसऱ्या माणसाच्या पायांना स्पर्श करणं हा मानवतेचा उपमर्द आहे. मी तो तुम्हांला करूं देणार नाहीं--"

"मग महात्माजी कसे आपल्या पायांना स्पर्श करूं देतात?--"

एका तरुण कामगारानें विचारलें.

"लोक जुलूम करतात महात्माजींवर! शिवाय ते दैवी पुरुष आहेत. मी तुमच्यासारखाच, तुमच्यांपैकींच एक सामान्य कार्यकर्ता आहे--"

प्रियदर्शननें उत्तर दिलें.

पण लोकांची गर्दी हटेना.

शेवटीं विठोबानें खालीं उतरून आपल्या सहकाऱ्यांच्या मदतीनें टेबलाच्या एका बाजूकडील लोकांना मागें हटविलें.

त्याबरोबर प्रियदर्शननें खालीं उडी टाकली.

तेव्हां पुन्हा टाळ्यांचा गजर झाला.

पोलीस आणि कामगार या दोहोंनीं मिळून त्याच्या भोंवतीं साखळी केली--

आणि उत्तमरावांसह तो आपल्या खोलींत परत आला--

आंत आल्याबरोबर उत्तमराव त्याचे दोन्ही हात आपल्या हातांत घेऊन म्हणाले--

"आज तुम्ही केवढा जय मिळवलात, प्रियदर्शन!--"

"हो. पण कुणाला ठाऊक या जयाची काय किंमत द्यावी लागणार आहे तें!--"

# अंतर्मनाचा निर्णय

"काय विलक्षण धाडस तुझं आजचं, प्रिया! मी गच्चीवरून तुला गर्दीत शिरतांना पाह्यलं न् मला सुचेनासं झालं कांहीं! द्विवेदी-साहेब न् चतर्जीसाहेब दोघे उभे होते माझ्या शेजारीं. त्यांना सारखी धास्ती वाटत होती काय होतं न् काय नाहीं याची!—"

"त्यांना धास्ती वाटणं स्वाभाविक आहे, माई! लोकांचा क्षुब्ध झालेला जमाव पाह्यला कीं, या सिव्हिल सर्व्हंटांना लाटी चालवायचा किंवा गोळीबार करायचा हूकूम सोडायचा एवढंच फक्त माहित असतं! तरी द्विवेदी हा पुष्कळ समजूतदार माणूस आहे. कायदेभंगाच्या चळवळीच्या वेळीं तो डे. कमिशनर होता इथं. पण त्यानं होतां होईल तो निकरावर येऊं दिल्या नाहींत गोष्टी! त्याच्या इतका चांगला चीफ सेक्रेटरी आम्हाला मिळणं कटीण झालं असतं!—"

"पण, प्रिया, चतर्जीला काय गरज होती आज असेंब्लींत हजर

रहाण्याची? गव्हर्नरसाहेबांच्या सेक्रेटरीचा कांहीं संबंध नाहीं तसा असेंब्लीशीं. मला वाटतं, मुद्दाम गव्हर्नरसाहेबांनींच पाठवलं असलं पाहिजे त्यांना आजचा प्रसंग पाह्यला—"

"असेलहि कदाचित्. आपल्याला प्रत्येक घडामोडीची खरीखरी हकीकत कळावी म्हणून फार दक्ष असतात गव्हर्नरसाहेब अलिकडे, माई—"

"बाकी त्या दोघांच्याहि मनावर फार चांगला परिणाम झाला आजच्या प्रसंगाचा! तूं बोलायला सुरवात केल्याबरोबर जेव्हां एकदम सर्वत्र शांतता झाली, तेव्हां द्विवेदीसाहेब मला म्हणाले देखील हा व्यक्तिगत जय आहे मुख्य प्रधानांचा म्हणून!—"

"पण उमा, हा जय कितपत टिकाऊ आहे याचा विचार केला आहेस का तूं? सभाजय हा पुष्कळदां समयसूचकतेवर अवलंबून असतो. मी जर त्या वेळीं पंडितजींचा सल्ला प्रमाण मानून माझ्या खोलींतच बसून राह्यलों असतों, तर लाठीहल्याशिवाय जमाव मागं हटला नसता आणि माझं नांव साऱ्या हिंदुस्थानांत बद्दू झालं असतं! राजाजी संप झाल्याबरोबर संपाच्या ठिकाणीं जाऊन तो मोडूं शकतात. असेंब्ली हॉलवर चालून आलेल्या किसानांच्या मोर्चाची गोड शब्दांनीं समजूत घालून खेरसाहेब त्याला परत लावतात. मग मी या आमच्या जमावाला शांत केलं यांत मोठेपणा किंवा जय कसला माझा? माझ्या मनाला खेद वाटतो तो एवढाच कीं, मुख्य प्रधान असून सुद्धां मी आज लोकांना कांहीं निश्चित आश्वासन देऊं शकलों नाहीं!—"

"कां बरं? तूं जें बोललास तें तर निश्चित होतं सगळं!—"

"हो. खरं आहे तुझं म्हणणं, उमा! पण तीं सगळीं आश्वासनं मी एक व्यक्ति म्हणून दिलीं आणि तीं जर उद्यां मला पूर्ण करतां आलीं नाहींत, तर मग?—"

"अस्सं!—"

"खरं आहे तुझं म्हणणं, प्रिया! कारण द्विवेदीसाहेब मला म्हणाले, शेतकऱ्यांसंबंधीं एवढी निश्चित घोषणा करायला नको होती मुख्य प्रधानांनीं!—

"का करायला नको होती? बाजारभाव बेसुमार घसरल्यामुळं शेतकरी अगदीं मरगळीला आला आहे आतां. सालोसाल तहकुबी, तकावी किंवा माफी देण्यापेक्षां एका विशिष्ट प्रमाणांत जर आम्ही सारा कमी केला, तर शेतकऱ्याच्या प्रश्नाची आमच्या मागें लागलेली विवंचना खात्रीनं कमी होईल. आम्ही दरसाल तहकुबी, तकावी किंवा माफी देतों याचा अर्थच हा कीं, शेतकऱ्याच्या ठिकाणीं सारा देण्याचं त्राण उरलेलं नाहीं हें आम्हांला पुरेपूर कळून चुकलं आहे. मग असले तात्पुरते बाह्य उपाय योजून रोगाचं मूळ कायम ठेवण्यापेक्षां सारा वीस किंवा पंचवीस टक्के कमी करण्याची ही अवघड शस्त्रक्रिया एकदां करून टाकलेली बरी नाहीं का?—सिव्हिल सर्व्हंटांच्या दृष्टीनं विचार करून शेतकऱ्यांचा प्रश्न कधींहि सुटणार नाहीं, माई! ते फक्त राज्यकारभाराच्या सोईच्या दृष्टीनं सगळ्या प्रश्नांकडे पहातात. पण राज्यकारभार हा माणसांकरितां आहे, माणसं राज्यकारभाराकरितां नाहींत!—"

"खरं आहे तुझं म्हणणं, प्रिया! पण उत्पन्नांत जी जबर तूट येईल ती कशी भरून काढणार तूं?—"

"त्याचाच विचार मीं गेले दोन महिने सारखा करतों आहें, उमा! एक गोष्ट तर मी ठरवून टाकली आहे अगदीं. पुढच्या वर्षीं दारूबंदीचा कोणताहि नवा कार्यक्रम हातीं घ्यायचा नाहीं—"

"पण तो तर महात्माजींचा कार्यक्रम आहे!—"

"असेल! पण मनुष्य जगला तर दारू पिईल कीं नाहीं? शेतकऱ्याला प्रथम जगूं द्या. नंतर वळूं दारूबंदीच्या प्रश्नाकडे! मी स्पष्टच सांगणार आहे बापूंना माझं हें मत! गेल्या खेपेस पहिलंच

वर्ष होतं आणि मीहि नवीन होतों, म्हणून मी गप्प बसलों. पण, आतां जर मी गप्प बसलों, तर राज्याधिकार हातीं येऊनसुद्धां माझ्या मनाप्रमाणं कांहींच करतां येणार नाहीं मला ! यापेक्षां मुख्य प्रधानपद सोडलेलं काय वाईट ?—"

त्याच्या बोलण्यांतला तो आवेश पाहून प्रियंवदा आणि उमाकांत हीं दोघेहि स्तिमित झालीं.

जेवण आतां बहुतेक संपत आलें होतें. असेंब्लीची बैठक चालू असली, म्हणजे प्रियदर्शनकडे रोज सात आठ सभासद तरी जेवावयाला असावयाचे; व उत्तमराव आणि दाजीसाहेब यांचें रात्रीचें जेवण तर हटकून त्याच्याकडे होत असे. पण आज असेंब्लीची बैठक संपल्यावर त्यानें कोणालाहि आमंत्रण दिलें नाहीं; व उत्तमरावांनीं जेव्हां त्याच्या गाडींत बसण्याची इच्छा दर्शविली, तेव्हां तो त्यांना अत्यंत शांत आवाजांत म्हणाला, "आज मी फार थकलोंय, उत्तमराव! तुम्ही न् दाजीसाहेब रात्रीं नवानंतर या. मग बोलत बसूं आपण—"

घरीं आल्याबरोबर त्यानें चहा घेतला आणि अशोकला बरोबर घेऊन तो शहरापासून पंधरा मैलांवर कोराडीच्या बाजूला नदीकडे फिरावयाला गेला.

अशोकच्या सर्व रस्ताभर चाललेल्या बडबडीचा मात्र त्याला कांहीं त्रास वाटला नाहीं.

एकाद्या हिरव्यागार वृक्षाच्या गर्द छायेखालीं आपण दगडाला डोकें टेंकून पडावें आणि वरून पाखरांची गोड किलबिल सारखी कानांवर येत असावी—ती किलबिल जशी त्रस्त मनाला आल्हाददायक वाटते, तशी अशोकची ती गडबड न् बडबड त्याच्या शांत मनाला सांत्वनकारक वाटत होती.

नदीच्या काठीं आल्यावर त्यानें मोटार उभी केली आणि तो अशोकला घेऊन खालीं उतरला.

मावळत्या सूर्याचें ऊन त्या नदीच्या रोड पात्रावर, तिच्या दोहों बाजूंच्या त्या काळ्याभोर शेतजमिनीवर आणि भोंवतालच्या काळसर गर्द झाडीवर पडलें होतें. त्या सोनेरी प्रकाशानें उजळलेली ती शुष्क संतप्त सृष्टि——गरम वाऱ्याच्या झळा हे जणु निःश्वास होते तिचे! नदीच्या खंडित ओघांत जागोजाग सांचलेलें पाणी उन्हांत चमकत होतें. एकाद्या क्षयी माणसाच्या डोळ्यांतली चमक जशी भेसूर दिसावी, तसा तो सांचलेल्या पाण्याचा चमचमाट वाटत होता. नदीच्या पात्रांतील वाहत्या पाण्याजवळ असलेल्या धोंड्यावर एकाद दुसरा बगळा ध्यान लावून बसला होता आणि आकाशांतून फडफड करीत वक्र गतीनें उडणारी बगळ्यांची रांग उन्हाच्या तिरीपेंत तुटून ओघळण्याच्या बेतांत असलेल्या तोरणासारखी दिसत होती.

आपण पाण्याजवळ जाऊन बसलों तर आपल्याला थोडें बरें वाटेल, अशा समजुतीनें प्रियदर्शन प्रवाहाजवळच्या एका दगडावर जाऊन बसला.

आणि अशोकला त्यानें म्हटलें, "अशोक, पहा बरं वाळूंत शंख शिंपले सांपडतात का?——"

त्याबरोबर अशोक धांवत जाऊन रेतींतले लहान लहान शंख शिंपले गोळा करूं लागला.

पण त्या एकांत आणि निःशब्द स्थितींतसुद्धां प्रियदर्शनच्या मनाचा क्षोभ कमी होईना.

दुपारीं घडलेला तो सारा प्रकार अद्याप त्याच्या डोळ्यांपुढून हलला नव्हता. लोकांना जें आश्वासन त्यानें व्यक्तिशः म्हणून दिलें होतें, तें त्याच्या मनांत सारखें घोळत होतें.

तें आश्वासन पूर्ण करणें आपल्याला शक्य आहे का?

पंडितजींनीं जें नवें अंदाजपत्रक असेंब्लीला त्याच दिवशीं सादर केलें होतें, त्यांत दारूबंदीच्या कार्यक्रमाचा पुढला हप्ता जाहीर केलेला

होता. शेतसारा कमी करण्यासंबंधीं एक चकार शब्दहि त्या अंदाजपत्रकांत काढलेला नव्हता. या बैठकींत तें अंदाजपत्रक एकदां मंजूर होऊन गेल्यावर मग आपण काय करूं शकतों ?

आणि आपलीं आश्वासनें जर आपण पूर्ण करूं शकलों नाहीं, तर सार्वजनिक जीवनांतली आपली मातबरी ती काय उरली ?

त्याच्या मनाला हा एकच प्रश्न सारखा डिंवचीत, दंश करीत होता.

आणि त्यामुळें त्याचें मन विलक्षण विव्हळ, व्याकुळ होऊन गेलें होतें.

त्याला मार्ग दिसत नव्हता असें नाहीं; पण त्या मार्गावर पाऊल टाकावयाला त्याचें मन कचरत होतें.

दद्दांचा रोष आणि कांताचे अश्रु यांची परवा न करतां त्यानें आठ वर्षांपूर्वी कायदेभंगाच्या चळवळींत उडी घेतली. त्या वेळीं त्यानें कोणाचेंहि ऐकलें नाहीं; फक्त स्वतःच्या मनाचें ऐकलें. या आपल्या मनस्वी वर्तनामुळें त्याची स्वतःची आणि कुटुंबाची जी हानि झाली, ती त्यानें मुकाट्यानें सोसली.

पण आजची परिस्थिति निराळी होती. त्या वेळीं एका कुटुंबाचा प्रश्न होता; तर आज एका पक्षाचा, एका संस्थेचा, पर्यायानें सर्व देशाचा प्रश्न आहे. शेतसारा कमी करण्यासाठीं दारूबंदीचा घोषित कार्यक्रम जर आपण तहकूब केला, तर पक्षाला काय वाटेल? ज्या कांग्रेस संस्थेचे सेवक म्हणून आपण आज मुख्य प्रधानपदावर विराजत आहोंत, तिच्या सूत्रधारांना काय वाटेल? ज्या बापूंच्या कृपेनें आपण प्रांतांतल्या साऱ्या पुढाऱ्यांना मागें टाकून सार्वजनिक जीवनांतील अत्युच्च पद पटकावलें, त्या बापूंना काय वाटेल? दद्दांचें आणि कांताचें म्हणणें आपण ऐकलें नाहीं. कारण त्या वेळीं आपण स्वतःचे मुखत्यार होतों. पण महात्माजींचा शब्द आपण मोडूं शकतों का ? त्यांच्या इच्छेच्या विरुद्ध आपण जाऊं शकतों का ?

त्या एकच एक शंकेनें त्याचा मार्ग दुष्कर करून सोडला होता.

एकदां त्याला वाटे, आपल्या सर्व अडचणी, प्रांतांतील दलितांच्या मागण्या आणि आपण त्यांना दिलेलीं आश्वासनें महात्माजींपुढें मोकळ्या मनानें मांडलीं, तर ते खचित आपल्या योजनेला मान्यता देतील.

पण, त्याच क्षणीं त्याच्या मनांत असा विचार चमकून जाई कीं, त्यांनीं जर आपल्या योजनेबद्दल नाराजी दर्शविली, कांही दिवस थांबावयाला सांगितलें किंवा अजिबात सल्ला द्यावयाचा नाकारला तर?——

——तर आपली गति काय होईल?

तो दारुण विचार मनांत येतांच त्यानें आपल्या दोन्ही कानशिलांवर हाताचे तळवे टेकून तीं घट्ट दाबलीं——

त्याच क्षणीं वाळूंत खळत असलेल्या अशोकाचें लक्ष त्याच्याकडे गेलें——

तो एकदम प्रियदर्शनच्या जवळ आला आणि त्यानें कानशिलांवर टेकलेल्या हातांवर आपले चिमुकले हात ठेऊन म्हणाला——

"ताता, तुमी असे का बसलांत आद? बोलत का नाई माझ्याबलोबल? हे बघा, मी किती तली शिंपले आणले आहेत!——"

त्याच्या त्या अजाण सहानुभूतीनें ओथंबलेल्या शब्दांनीं प्रियदर्शनच्या गुदमरलेल्या, संतप्त मनाला केवढा तरी विरंगुळा वाटला!

त्यानें अशोकला जवळ ओढलें आणि त्याच्या गालावर आपले ओठ टेकून म्हटलें, "बाळा, मी आज थकलोंय रे फार! म्हणून बसलोंय अशा रीतीनं! पण चल, आतां घरीं जाऊं या आपण. अंधार पडायला लागला——"

"नाई. अजून उजेड आहे पुष्कळ! तुम्ही अंधालाला भितां ताता?——"

अशोकनें अगदीं सहज विचारला तो प्रश्न.

पण प्रियदर्शन चमकल्यासारखा झाला तो प्रश्न ऐकून.

"नाहीं रे अंधाराला कशाला भ्यायचं?——"

"अंधालांत दिसत नाईं म्हणून !—"

"अंधारांतसुद्धां दिसतं बाळा, माणसानं प्रयत्न केला तर! पण तुला घरीं जायला उशीर झाला तर मा रागावणार नाहीं का तुझ्यावर?—"

"तुमच्या बलोबल मी असलों, म्हणजे मा कधीं नाईं लागावत माझ्यावल! माझे हे शंख शिंपले कुठं ठेऊं ताता?—"

"चला, मोटारींत ठेऊं आपण! पण घरीं न्यायचे का हे सगळे? काय उपयोग आहे यांचा?—"

"तुमच्या टेबलावल तल केवला तली शंख आहे! मी माझ्या टेबलावल टेवीन कागद उडूं नयेत म्हणून!—"

"बरं! चला, मोटारींत बसूं या आपण आतां—"

त्या क्षुब्ध, अनिश्चित मनःस्थितींतच तो परत आला.

पण 'सागर व्हिला'मधील वातावरण आज विजयाच्या उल्हासानें दुमदुमलेलें होतें.

असेंब्लींतील कॉंग्रेस पक्षाच्या सभासदांपैकीं तीस पस्तीस सदस्य त्याला भेटण्यासाठीं घरीं येऊन गेले होते; व त्यांपैकीं कांहींनीं तर अभिनंदनाचीं पत्रेंहि लिहून ठवलीं होतीं.

तो आपल्या अभ्यासिकेंत आल्याबरोबर उमाकांतानें तीं सर्व पत्रें त्याच्यापुढें ठेवलीं.

पण तीं पत्रें उघडून न पहातां टेबलावरला मोठा थोरला शंख त्यानें त्या पत्रांवर मुकाटयानें ठेवला आणि श्रांत आवाजांत उमाला म्हटलें—

"उमा, जेवायची तयारी असेल, तर वाढायला सांग. माई आल्या आहेत का? त्यांचंहि पान घ्यायला सांग आपल्याबरोबर—"

"त्या केव्हांपासून वाट पहाताहेत तुझी. पण तूं कुठं गेलास याची कुणालाच कांहीं कल्पना नव्हती—"

पण उमानें मुद्दाम विचारलेल्या त्या सूचक प्रश्नाकडे त्याचें लक्ष नव्हतें. तो आपल्याच विचारांत गर्क होता आणि त्याचे विचार

क्षणोक्षणीं निश्चित होण्यासाठीं धडपडत होते.

त्यानें प्रियंवदेला आवेशानें तें उत्तर दिलें आणि नंतर त्याचें त्यालाच आश्चर्य वाटलें आपल्या तोंडून तो उद्गार, मुख्य प्रधानपद सोडण्याचा तो संकल्प अचानक बाहेर पडल्याबद्दल !

जणूं कांहीं त्याच्या अंतर्मनानें कोणत्या तरी निवांत क्षणीं तो संकल्प गुपचूप ठरवून टाकला होता आणि आज योग्य क्षणीं तो अभावितपणें उच्चारून दाखविला, एवढेंच !

पण आपल्या तोंडून अकस्मात् निघालेलें तें वाक्य ऐकतांच त्याचें त्यालाच एकदम हायसें वाटलें; इतका वेळ मनावर पडलेलें असह्य दडपण एकदम हलकें झाल्यासारखें वाटलें !

त्या निश्चिततेच्या ऊर्मींत तो अगदीं संथपणानें पुढें म्हणाला—

"माई, मी सगळ्या गोष्टींचा विचार करून ठेवलाय माझ्या मनाशीं! कामगारांसाठीं जीवनवेतनाचा कायदा, शेतसारा पंचवीस टक्क्यांनीं कमी करणें, शाळा-कॉलेजांतून नेमबाजीच्या शिक्षणाची सोय करणें आणि स्थानिक स्वराज्यसंस्थांच्या देखरेखीखालीं जिल्ह्याजिल्ह्यांतून नागरिकांचीं संरक्षकदलें (civic guards) उभारणें असा येत्या वर्षाचा कार्यक्रम आहे माझा. तो मीं बापूंपुढं ठेवणारआहे. त्यांनीं जर त्या कार्यक्रमाला मान्यता दिली तर ठीक! नाहीं तर—"

"नाहीं तर काय?—"

प्रियंवदेनें सभय उत्कंठेनें विचारलें.

"नाहीं तर त्या वेळीं माझी अंतःकरणप्रवृत्ति मला जसं सांगेल तसा वागेन मी! 'आंतला आवाज' ही चीज कांहीं एकट्या महात्माजींजवळच आहे असं नाहीं; विवेकी आणि चारित्र्यवान् अशा प्रत्येक माणसाला त्याचा 'आंतला आवाज' संशयाच्या आणि संमोहाच्या क्षणीं योग्य मार्ग दाखवीत असतो !—"

सागर व्हिलामध्यें ज्या वेळीं हें संभाषण चालू होतें, त्याच वेळीं एम्पायर हॉटेलमधील मोहनच्या खोलींत तो आणि अण्णासाहेब यांच्या-मध्येंहि त्याच विषयाची चर्चा चालली होती.

दोघांच्या मधोमध असलेल्या टेबलावर मद्य आणि लेमन यांच्या फोडलेल्या बाटल्या, अर्धवट संपलेले चषक आणि खाद्य पदार्थांच्या प्लेट्स ठेवलेल्या होत्या. अशा प्रकारच्या जेवणाच्या वेळीं जो उल्हास अण्णासाहेबांच्या तोंडावर नेहमीं दिसत असे, तो आज अजिबात दिसत नव्हता. उलट नाकाच्या दोन्ही बाजूंनीं उतरून खालीं जिवणीला येऊन भिडलेल्या त्यांच्या तोंडावरील दोन सुरकुत्या मात्र जास्त दाट दिसत होत्या; व ते खालीं मान घालून प्लेटमधील पदार्थ कांट्यानें निष्कारण चाळवीत असतां त्यांच्या ऊर्ध्वमुख नाकपुड्यांची थरथर जोरानें चालू होती.

मोहन अतिशय गंभीर होता. विलक्षण मानसिक थकवा आल्यावर माणसाच्या चेहऱ्यावर जी एक विवर्णता आणि डोळ्यांवर जी एक ग्लानि येते, ती त्याच्या मुद्रेवर स्पष्ट दिसत होती.

त्यानें चषक उचलून एक घुटका घेतला; व रुमालानें जिवणीच्या कडा पुसून म्हटलें--

"मग स्पष्ट सांग तूं काय करणार आहेस तें. बाकी तुझ्या स्पष्ट सांगण्यालाहि किंमत नाहीं फारशी! आजच्या मोर्चाबरोबर हजर राहण्याचेंहि वचन दिलं होतंस तूं मला. पण आयत्या वेळीं गायब झालास आणि सगळा डाव अंगलट आला तुझ्या या अवसानघातकीपणामुळं!"

"मला का उगाच दोष देतोस? माझा येऊन जाऊन येवढाच दोष कीं, मी मोर्चाबरोबर हजर राह्यलों नाहीं. पण, समज, मी जरी मोर्चाबरोबर हजर असतों, तरी प्रियदर्शनच्या त्या मिट्टास भाषणानंतर मी जर बोलायला उभा राह्यलों असतों, तर लोकांनीं खालीं बसवला असता मला!--"

"पण तूं अजिबात गैरहजर का राह्यलास? उपयोग झाला असता

किंवा नसता! पण वचन दिल्याप्रमाणं हजर रहाणं हें तर तुझं कर्तव्य होतं ना? तें तूं कां केलं नाहींस? तुझा हा सगळा अवसानघातकीपणा पाह्यला म्हणजे अशी भीति वाटते कीं, उद्या संप सुरू होण्याच्या वेळीं सुद्धां तूं पुण्याला किंवा महाबळेश्वरला जाऊन बसशील—"

"नाहीं रे बाबा! संपाचा निकाल लागेपर्यंत कुठं जाणार नाहीं मी! मग या उन्हाळ्यांत होरपळून गेलों तरी बेहत्तर—"

अण्णासाहेब तोंडांतली सिगारेट रक्षापात्रावर ठेऊन त्राग्यानें उद्गारले आणि नंतर एक घुटका घेऊन घसा साफ करीत म्हणाले—

"पण संप घडवून आणण्याची जबाबदारी मात्र तूं माझ्यावर टाकूं नकोस! तो विठोबा जोंपर्यंत युनियनमध्यें आहे, तोंपर्यंत कोण विचारतो आपल्याला तिथं? तूं जर काळे, शेळके वगैरेंच्या हातांवर पन्नास पन्नास रुपये ठेवशील, तर संप घडवून आणतील ते वाटेल त्या मार्गांनीं!—"

"इतके पैसे कुठून आणूं मी त्यांना द्यायला? सध्यां मी पैशाच्या किती अडचणींत आहे याची कल्पना नाहीं तुला. इझाबेलचं प्रकरण आंतल्या आंत मिटवण्यासाठी पांचशें रुपये खर्च करावे लागले मला त्या दिवशीं!—"

"पण या मोर्चासाठीं दीड दोन हजार रुपये खर्च करायला तयार होती ना आपली मंडळी?—"

"हो. पण मोर्चा यशस्वी झाला असता तर! जे चारशें रुपये त्यांनीं मला आगाऊ दिले, ते सारे पहिलवानांना वाटण्यांत, दारू पाजण्यांत आणि बाहेर गांवांहून आलेल्या माणसांना जेवायला घालण्यांत उडाले! आणखी उलट पदरचे शंभर रुपये मात्र गमावून बसलों मी या उद्योगांत! एवढं सगळं करून आज संध्याकाळीं पंडितजींची नाहीं नाहीं तीं बोलणीं ऐकून घ्यावीं लागलीं मला! हें बघ अण्णा, मीं त्यांना वचन देऊन चुकलों आहे आज ते पचमढीला गेल्यावर एप्रिलच्या पंधरा तारखेच्या आंत संप घडवून आणतों म्हणून—"

" फुकट दिलंस का तूं हें वचन त्यांना, मोहन ?--"

" हो. संप प्रत्यक्ष सुरू होईपर्यंत तरी आपल्या हातांत कांहीं घडण्याचा संभव नाहीं. आणि तूं तर म्हणतोस कीं, काळे, शेळके वगैरेंना पैसे दिल्याशिवाय संप घडवून आणणं शक्य नाहीं--"

" तें तर निश्चित आहे अगदीं ! मग कसं करायचं बोल? मी यंदा पुण्यालाच काय पण छिंदवाड्यालासुद्धां जात नाहीं. सारा उन्हाळा काढतों इथं तुझ्याबरोबर. पण पैशाशिवाय कसा घडवून आणणार संप ?--"

मोहन यावर कांहीं बोलला नाहीं. त्यानें अर्धवट जळलेलें सिगारेटचें थोटूक रक्षापात्रांत टाकलें. नवी सिगारेट पेटविली आणि तिचा एक दमदार झुरका घेऊन म्हटलें--

" बरं, किती खर्च येईल संप घडवून आणायला? मात्र लक्षांत ठेव, पहिल्या दिवशीं दंगल मचून लाठीहल्ला करावा लागला पाहिजे पोलिसांना! नाहींतर मोर्चासारखं व्हायचं आजच्या--"

"त्याची नको काळजी तुला! प्रियदर्शन पचमढीला असतांना त्याच्या गैरहजेरींत लाठीहल्लाच काय पण गोळीबारसुद्धां घडवून आणूं शकतों आपण! मी तर ठरवून टाकलंय कीं, संप झाल्याबरोबर प्रथम विठोबाची तुरुंगांत रवानगी करायची!--"

" विठोबाची तुरुंगांत रवानगी? आणि ती काय म्हणून?--"

" अरे, तो मोकळा असला म्हणजे केव्हां संपावर बिब्बा घालील यांचा नेम नाहीं. त्याला जर तुरुंगांत पाठवायची तुझी तयारी नसेल, तर संपाच्या भानगडींत पडूं नकोस. पण संप सुरू झाल्यापासून सहा तासांच्या आंत तो तुरुंगांत जाईल अशी व्यवस्था केली पाहिजेस तूं !--"

" त्याला तुरुंगांत घातल्याशिवाय चालणार नाहीं का आपलं?--"

" मी खात्री नाहीं देऊं शकत ! पण मग जर आजच्या मोर्चासारखा प्रकार घडला, तर त्याबद्दल मला नाहीं दोष देतां कामा तूं !

प्रियदर्शन पत्रमदीला असल्याचा खरा फायदा विठोबाला तुरुंगांत घातल्याशिवाय मिळणार नाहीं आपल्याला--"

"ठीक आहे. मी तशी सूचना देऊन ठेवतों हरनामसिंगला !--"

"आणि हें बघ मोहन, एक हजार रुपये खर्च करावे लागतील आपल्याला या संपावर—"

"एक हजार रुपये ? अण्णा, अरे मी आणूं कुठून इतकी रकम आज ?"

"कां बरं? तुझा एवढा थोरला सासरा उपयोगी नाहीं पडणार का तुझ्या? त्याला फासण्या लावायला सुरवात कर तूं आतां हळुहळू—"

"अरे, तो निर्वाणीचा उपाय आहे अगदीं! ही इझाबेल आल्यापासून गेल्या दोन महिन्यांत पाण्यासारखा पैसा उडाला माझा --"

"बरोबरच आहे. ती जर पाण्याऐवजीं दारूच पिते मुळीं दिवसभर, तर पाण्यासारखा पैसा उडायचाच ! तूं कंपनीच्या पैशाला हात नाहीं लावलास ना अजून ?—"

अण्णासाहेबांनीं आपल्या तांबारलेल्या डोळयांनीं त्याच्याकडे रोखून पहात विचारलें.

त्यांचा तो खोंचदार प्रश्न ऐकतांच मोहनचा चेहरा खाडदिशीं उतरला. पण तो लगेच सावरून म्हणाला--

"नाहीं रे, तेवढी पाळी नाहीं आली अजून ! पण या संपावर जर हजार रुपये खर्च करावे लागणार असतील, तर मग मात्र कंपनीच्या पैशाचा उपयोग करावा लागेल मला ! म्हणून म्हणतों अण्णा, तूं स्वतःचे पैसे खर्च कर या वेळीं. मी प्रॉमिसरी लिहून देतों तुला हवी तर—"

"तुझ्यासारख्या जिगरदोस्ताकडून कोण घेतो रे प्रॉमिसरी ? पण, मोहन, मजजवळ पुरते शंभर रुपयेसुद्धां नाहींत या घटकेला—"

"अरे, काय थापा मारतोस, अण्णा ! मी उद्यां बँकांतून आंकडे आणतों तुझ्या डिपॉझिट्सचे—"

"आणशील बाबा! पण तीं सगळीं डिपॉझिट्स मुदतीचीं आहेत न् पुन्हा बायकोच्या नांवावर आहेत. ती एक पै काढूं द्यायची नाहीं मला—"

"मग कसं करायचं अण्णा, बोल! हा संप तर झालाच पाहिजे—"

"मग माझं ऐक. तूं तूर्त कंपनीच्या पैशाचा उपयोग कर! मागाहून पंडितजींकडून पैसे आले, म्हणजे भरून टाक ते. लक्षांत ठेव' या वेळीं आपल्याला युनियनच्या कार्यकर्त्यांपासून तों पोलिस इन्स्पेक्टरां. पर्यंत सगळ्यांना पैसे चारावे लागणार आहेत!—"

मोहन कांहीं बोलला नाहीं. त्यानें टेबलावरील बीरची बाटली उचलून दोन्ही चषक भरले; व त्यांत बर्फ टाकला. नंतर अण्णासाहेबांच्या दृष्टीला दृष्टि भिडवून तो म्हणाला--

"अण्णा, कंपनीच्या पैशाचा उपयोग करणं हें तूं समजतोस तितकं सोपं नाहीं. माझ्याविरुद्ध आधींच नाहीं नाहीं त्या तक्रारी गेल्या आहेत ईश्वरदासजींकडे. या लग्नामुळं माझी पत वाढली आणि दबल्या-सारखे झाले आहेत माझे शत्रु सध्यां! पण, समज, मी पैसे घेतले आणि त्याच वेळेला जर दुर्दैवानं इन्स्पेक्शन आलं, तर तूं रक्कम उभी केली पाहिजेस ताबडतोब—"

ते शब्द उच्चारीत असतांना मोहनचा चेहरा अत्यंत गंभीर झाला होता.

अण्णासाहेबांनीं त्याची दृष्टि टाळली. क्षणमात्र ते स्तब्ध होते. पण नंतर संथपणानें म्हणाले—

"या संपाच्या खर्चापुरती जबाबदारी घेतों मी ती. ठरलं मग सगळं? चल उचल ग्लास. गुड लक!—"

त्यांनीं चषक एकमेकांना भिडवून मद्यपानाला प्रारंभ केला.

# संपाच्या वेळीं

सकाळीं साडेसहाच्या सुमारास विठोबा, कामगारसंघाच्या निवडक कार्यकर्त्यांसह, नीडहॅम पार्कच्या पायऱ्यांवर येऊन उभा राहिला.

काल रात्रीं दोन वाजेपर्यंत झालेल्या जागरणामुळें त्याचे डोळे जळत होते. 'महाराष्ट्र' कचेरींत भरलेल्या कार्यकारी मंडळाच्या अखेरच्या सभेंत लेबर ऑफिसरनें प्रांतिक सरकारची बाजू मांडली; व विठोबाला स्वतःला जरी ती अगदीं समर्पक वाटत होती, तरी त्याच्या विनवण्यांचा आणि युक्तिवादाचा कांहीं एक उपयोग न होतां, शेवटीं संप करण्याचा ठराव बहुमतानें मंजूर झाला. सरकारचें म्हणणें असें होतें कीं, मुख्य प्रधानांनीं दिलेल्या जाहीर आश्वासनानुसार जीवनवेतनाच्या प्रश्नाची चौकशी करण्यासाठी तज्ज्ञांची एक कमिटी तावडतोब नेमण्यांत येईल; तिच्यावर मालक आणि कामगार यांचे प्रतिनिधि सारख्याच प्रमाणांत घेतले जातील; व ता. १ मेपासून त्या कमिटीचें काम सुरू होईल.

पण, काळे, शेळके अण्णासाहेब वगैरे मंडळीचा आग्रह असा होता कीं, कमिटीच्या घोषणेबरोबरच सरकारनें पगारवाढीच्या बाबतींत निश्चित आश्वासन दिल्याशिवाय कामगारांचें समाधान होणार नाहीं आणि ते गप्पहि बसणार नाहींत. विठोबानें मोर्चाच्या वेळीं केलेल्या भाषणाशीं हा आग्रह कसा विसंगत होता, हें लेबर ऑफिसरनें त्यांच्या नजरेस आणून दिलें; व आजच्या घटकेला सरकार असें कोणतेंहि आश्वासन देणार नाहीं, असेंहि स्पष्ट सांगितलें.

यानंतर रात्रीं दीडच्या सुमारास लेबर ऑफिसर सभेंतून उठून गेला. तो गेल्यावर संपाच्या ठरावावर काळ्यांचें जळजळीत भाषण झालें; व सकाळीं सात वाजतां संपावर जाण्याचा आदेश कामगारांना देण्यांत आला.

ठराव एकदा मंजूर झाल्यावर अध्यक्ष या नात्यानें त्याची अंमलबजावणी करणें हें विठोबाचें कर्तव्यच होतें. त्यामुळें सकाळीं जेव्हां तो घरांतून बाहेर पडला, तेव्हां राधाबाईंची प्रकृति चिंताजनक असल्याचें जरी वसंतानें त्याला सांगितलें, तरी वसंताला कांहीं औपचारिक सूचना करून तो चालावयाला लागला.

गेले दोन दिवस राधाबाईंच्या पोटांत सारखें दुखत होतें. पण, दिवस भरावयाला अद्याप थोडा अवकाश असल्यामुळें, तिनें त्याकडे दुर्लक्ष केलें; व त्या स्थितींतहि करवेल तितकें घरकाम करण्याचा आपला क्रम तिनें चालू ठेवला. पण आज पहांटेपासून तिच्या वेदना जास्त वाढू लागल्या; व हात, पाय, तोंड वगैरे शरीराच्या किंचित् सुजलेल्या भागावर निळसर छटाहि दिसूं लागली. त्यामुळें ती स्वतः थोडीशी घाबरली; वसंताला पहांटेच उठवून तिनें सुइणीकडे पाठविलें; व आपली सुटका होईपर्यंत विठोबानें बाहेर जाऊं नये अशी उत्कट इच्छाहि तिनें वसंताजवळ व्यक्त केली.

पण विठोबानें तें सर्व मुकाट्यानें ऐकून घेतलें; व जरूर वाटल्यास डॉक्टरला बोलावून घे असें वसंताला सांगून तो चालावयाला लागला.

कारण, आज जर तो संपाच्या ठरावाची अमलबजावणी करण्यासाठीं वेळेवर हजर राहिला नसता, तर त्याच्याबद्दल नाहीं नाहीं त्या कंड्या उठून गेल्या दहा वर्षांतील त्याच्या सर्व स्वार्थत्यागावर आणि कामगिरीवर पाणी पडलें असतें.

म्हणून, राधाबाईंचें तें विव्हळणें त्याच्या कानांवर पहांटे सारखें पडलेलें असतांना सुद्धां, पावणे सहाचा पोंगा होतांच तो मन दगडासारखें घट्ट करून घरांतून बाहेर पडला.

वसंताला मात्र त्यानें पुनःपुन्हा बजावून सांगितलें कीं, तूं एक क्षणभरसुद्धां घर सोडून कुठें जाऊं नकोस.

पण, तो घराबाहेर पडल्याचें कळतांच, राधाबाईनें वसंताला आंत बोलावला आणि त्याला विठोबाच्या पाठोपाठ गिरणीकडे जावयाला सांगितलें.

पण वसंता तिला म्हणाला, "अशा स्थितींत तुला सोडून जाऊं नको म्हणून बाबांनीं निक्षून सांगितलंय मला जातांना! मी हलणार नाहीं इथून आई!—"

तेव्हां ती डोळ्यांत आंसवं आणून विव्हळतच त्याला म्हणाली, "मला कांहीं ही गोष्ट नवीन नाहीं, बाळा! आठवं बाळंतपण आहे हें माझं! संध्याकाळपर्यंत होईनच मी मोकळी कशी तरी! आणि तूं इथं बसून राह्यलास तरी काय उपयोग आहे तुझा? उलट ते तिथं एकटे आहेत या कल्पनेनं माझ्या जिवाची तळमळ मात्र दुप्पट वाढेल. म्हणून म्हणतें, तूं जा आणि त्यांना शक्य तितक्या लवकर घरीं घेऊन ये परत. माझी ही अशी अवस्था व्हायला नि संपाचं गंडांतर ओढवायला एकच गांठ पडली माझ्या नशिबानं—"

"आई, तिथं पुष्कळ मंडळी आहेत त्यांच्याबरोबर. मी जाऊन काय व्हायचंय आणखी? उलट, तुला जर जास्त त्रास व्हायला लागला

तर इथं कोण आहे मी बाहेर गेल्यावर ? बाबांनी सांगितलंय तें विचार करूनच सांगितलंय---"

"ते नेहमीं विचार करूनच सांगतात सगळ्या गोष्टी! तूं जोंपर्यंत त्यांच्या पाठोपाठ जात नाहींस, तोंपर्यंत माझ्या जिवाला स्वस्थता वाटायची नाहीं, दादा! आणि सुटकाहि व्हायची नाहीं माझी लवकर. इतर कितीहि माणसं त्यांच्याजवळ असलीं, तरी तुझी सर कशी येईल त्यांना? आपल्याला ठाऊक आहे तीं माणसं कोणत्या नियतीचीं आहेत तें! माझं एवढं ऐक. तूं जा आणि संप सुरू झाल्याबरोबर त्यांना घेऊन ये लवकर. तिथं जर कांहीं गडबड झाली, तर वेळावखताला उपयोग होईल तुझा त्यांना---"

वसंतानें तिची समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. पण व्यर्थ. शेवटीं निरुपायानें तो उठला आणि सायकलवरून नीडहॅम पार्ककडे जावयाला निघाला.

गिरणीचे तिन्ही पोंगे आतांपर्यंत होऊन गेले होते. त्यामुळें संप सुरू झाला असल्यास आपण तासाच्या आंत विठोबाला घेऊन घरीं परत येऊं, अशी उमेद त्याला वाटत होती.

पण, अभ्यंकर स्मारकाच्या जागेजवळ तो आला, तेव्हां लोकांच्या प्रचंड जमावामुळें रस्ता अडला आहे, असें त्याला दिसलें. म्हणून आपली सायकल त्यानें एका ओळखीच्या दुकानांत ठेवली आणि विठोबाला गांठण्यासाठीं तो गर्दींत घुसला.

नीडहॅम पार्कच्या वरच्या पायरीवर उभा राहून विठोबा भाषण करीत होता. त्याच्या समोर पार्कच्या दोन्ही टोंकांपर्यंत कामगारांचा जमाव पसरलेला होता. चैत्रांतल्या प्रखर उन्हांत उभे असलेले हजारों कामगार, अंगांतून घामाच्या धारा फुटत असतांहि, विठोबाचें प्रभावी वक्तृत्व एकाग्र चित्तानें ऐकत होते.

त्या प्रक्षुब्ध जमावाच्या मधून दोन्ही बाजूंना लाठियाळ पोलिस उभे करून गिरणीच्या फाटकापर्यंत जावयाला वाट मोकळी ठेवण्यांत आली होती; व एकाददुसरा इमानी कामगार खालीं मान घालून त्या ओसाड वाटेनें गिरणीच्या आवारांत हळूच प्रवेश करीत होता.

सिटी मॅजिस्ट्रेट, सिटीसाहेब आणि इतर पोलिस अधिकारी फाटकाच्या तोंडाशीं ठेवलेल्या खुर्च्यांवर बसलेले होते. रस्त्याच्या दोन्ही टोंकांना, जमावाला कोणत्याहि क्षणीं आवरतां यावें अशा बेतानें, हातांत छड्या असलेल्या पोलिसांच्या तुकड्या उभ्या केलेल्या होत्या; व अलिकडे अशा कोणत्याहि प्रसंगीं सहसा दृष्टीस न पडणारे युरोपियन सार्जंटहि आपल्या हातांतील छड्या फिरवीत जमावांतून वावरत असतांना दिसत होते.

विठोबाचें भाषण संपलें आणि कोणत्याहि प्रकारची गडबड न करतां शिस्तीनें घरीं परत जाण्याचा आदेश त्यानें कामगारांना दिला.

त्या आदेशानुसार सभेची पांगापांग होऊन जमाव मिरवणुकीच्या स्वरूपांत परत जावयाला निघाला.

तोंच मिरवणुकीच्या अगदीं मागच्या रांगेजवळ उभे असलेले चार पांच कामगार, मिरवणूक चालावयाला लागलेली दिसतांच, पोलिसांनी तयार केलेल्या वाटेनें गिरणीकडे जावयाला निघाले.

त्यांच्या त्या इमानी पिच्छेहाटीकडे लक्ष जातांच त्या रांगेंतल्या कांहीं कामगारांनीं ताबडतोब मागें वळून त्यांना अडविलें आणि दोन्ही पक्षांची हुस्ताहुस्ती सुरू झाली.

तेव्हां त्या वाटेच्या तोंडाशीं उभ्या असलेल्या दोघा गोऱ्या सार्जंटांनी मध्यें घुसून आपल्या छड्यांनीं मिरवणुकींतील कामगारांना मागें रेटण्याचा प्रयत्न केला.

त्या सार्जंटांचा कोणाला मारण्याचा उद्देश बहुधा नसावा. पण इमानी कामगारांना वाट मोकळी करून देण्यासाठीं ते मिरवणुकींतल्या

कामगारांना मागें रेटीत असतां सात आठ कामगारांच्या पोटावर आणि पायांवर त्या आडव्या छड्या जोरानें लागल्या.

मिरवणुकीचा पुढचा भाग शहराच्या रोखानें चालूं लागला होता आणि मागचा भाग अशा रीतीनें विस्कळित आणि अगतिक झाला होता--

एकाद्या अजस्र प्राण्याचें तुटलेलें मोठें थोरलें शेंपूट वळवळत जागच्या जागीं पडावें आणि तो प्राणी मात्र निसटून पुढें धावूं लागावा, तसें विलक्षण दृश्य होतें तें!

मिरवणुकीच्या अग्रभागीं असलेल्या विठोबाला मागें चालू असलेल्या या हुस्ताहुस्तीची कांहींच कल्पना नव्हती; मागच्या बाजूला होत असलेला हा गलका आघाडीला सतत उठत असलेल्या ब्रीदवाक्यांच्या आरोळ्यांत त्याच्या कानांपर्यंत पोंचूं शकला नाहीं.

सार्जंटांच्या छड्या कांहीं कामगारांच्या पोटांवर आणि पायांवर ओझरत्या बसतांच आतांपर्यंत आपसांत चाललेली हुस्ताहुस्ती पोलिसांपर्यंत येऊन भिडली; व पार्कच्या एका कोपऱ्याला रस्तेदुरुस्तीसाठीं जी खडीची रास घातलेली होती, तिच्यांतले दगड पोलिसांच्या अंगावर भराभर येऊं लागले.

त्याबरोबर पोलिसांनीं एकदम छड्या चालवावयाला सुरवात केली.

मिरवणुकीच्या या मागें राहिलेल्या भागांत फार तर दीड दोनशें लोक असतील. छड्यांचे वार सपासप सुरू होतांच हा जमाव तात्रडतोब पांगला.

पण, त्याबरोबर जो गलका आणि जी धांवपळ सुरू झाली, ती थेट मिरवणुकीच्या आघाडीपर्यंत पोंचली; व विठोबाला कांहीं विचार करावयाला अवसर मिळण्यापूर्वींच मिरवणुकींतील प्रचंड जमाव एकदम अत्यंत त्वेषानें आणि वेगानें मागें उलटला!

तो मागें उलटलेला जमाव पहातांच, त्याचें तें प्रक्षुब्ध, भयप्रद स्वरूप पहातांच पोलिस अधिकाऱ्यांनीं एकदम लाठ्या चालविण्याचा हुकूम सोडला.

विठोबा दोन्ही हात वर करून घसा फुटेपर्यंत ओरडत होता; हाताला सांपडेल ती वस्तु पोलिसांच्या अंगावर भिरकावीत असलेल्या लोकांना शांत रहाण्याचा आदेश देत होता. त्या उलट सुलट वाहणाऱ्या तुफान जनौघांतून वाट काढण्यासाठीं त्याची धडपड सारखी चालली होती; त्याला सारखें वाटत होतें कीं, सिटीसाहेबांपर्यंत जाऊन जर आपण पोंचलों, तर ही दंगल आणि हा लाठीमार आपल्याला थांबवितां येईल.

पोलिसांच्या हातांतील लाठ्यांना त्या चवताळलेल्या कामगारांनीं रस्त्यावरील खडीनें प्रत्युत्तर देण्याचा प्रयत्न केला. पण त्या निर्दय लाठीमारामुळें जमाव लवकरच फुटला, पांगला आणि पळावयाला लागला.

त्या पळापळींतून, रेटारेटींतून वाट काढीत विठोबा अखेर एकदांचा सिटीसाहेबांच्या जवळ जाऊन पोंचला आणि तो लाठीमार थांबविण्याविषयीं त्यानें सिटीसाहेबांना विनंती केली.

तेव्हां सिटीसाहेब उपरोधानें हंसून म्हणाले, "तुम्ही फार उशीरां आलांत माझ्या मदतीला, विठोबाजी! तुमच्या माणसांनीं सुरू केलेल्या गोफणीच्या खेळांतला दगड जेव्हां माझ्या कपाळावर बसला, तेव्हांच मला आठवण झाली होती तुमची! नंतर मी हुकूम सोडला लाठ्या चालवायचा! तरी सुद्धां फार बेतानं लाठी चालवली जाते आहे आज!—"

"लोक बहुतेक पांगलेच आहेत. तुम्ही हल्ला थांबवाल तर मी लगेच शांतता स्थापन करीन—"

"तुमच्या मदतीबद्दल मी फार आभारी आहे. पण आतां शांतता आपोआपच स्थापन होईल! तुमचे बाकीचे सहकारी कुठं आहेत?—"

"कांहीं दुसऱ्या गिरण्यांपाशीं असतील. मजबरोबर सुरवातीला फक्त अण्णासाहेब होते. पण मिरवणूक फुटल्यानंतर ते कुठं गेले कल्पना नाहीं. मी लाटीहल्ला सुरू झालेला पाहतांच एकदम आपल्याकडे यायला निघालों—"

"विठोबाजी, माझा निरुपाय आहे. आजच्या या नाहक झालेल्या दंगलीबद्दल मी तुम्हाला जबाबदार धरतों—"

आणि सिटीसाहेबांनीं आपल्या मागें उभ्या असलेल्या दोघां कॉन्स्टेबलांना डोळ्यानें खूण केली.

त्या खुणेचा अर्थ विठोबाच्या ध्यानांत आला.

त्यानें हंसून सिटीसाहेबांना म्हटलें, "इतक्या वर्षांनीं तुमचा पाहुणचार घेण्याचा योग आला, याबद्दल आनंद वाटतो मला—"

त्याचे ते उपरोधिक उद्गार ऐकून सिटीसाहेब किंचित् रागानें म्हणाले, "आपल्याला वास्तविक खेद वाटायला हवा आज हा योग आल्याबद्दल! हा संप निष्कारण करण्यांत येत आहे, याची जाणीव आहे तुम्हांला—

विठोबा कांहीं बोलला नाहीं. त्याच्या चेहऱ्यावरील उपरोधाचें हसूं मात्र तत्क्षणींच लुप्त झालें.

"गर्दी बहुतेक मोडलीच आहे आतां. आपण थोडयाच वेळांत कोतवालींत जाऊं. तुम्ही खुर्चीवर बसा—"

सिटीसाहेबांनीं विठोबाकडे सहानुभूतीनें पहात म्हटलें.

लाठीमाराच्या प्रभावानें गर्दी खरोखरीच मोडली होती; व विशेषतः गिरणीच्या दोहों बाजूंनीं एक फर्लांगपर्यंत रस्ता अगदीं निर्मनुष्य होऊन गेला होता. रस्त्यावर पडलेली खडी, कांचेचे तुकडे, मळकट पांढऱ्या टोप्या आणि निरनिराळ्या प्रकारचीं पादत्राणें एवढ्याच काय त्या चिजा अर्ध्या तासापूर्वीं तिथें झालेल्या दंगलीची साक्ष द्याव-याला शिल्लक उरल्या होत्या. गिरणीच्या फाटकाच्या दाराशीं पोलिसांची

रांग अद्याप दुतर्फा खडी होती; व रस्त्यांवरहि अंतराअंतरानें लाठियाळ पोलिस उभे होते. मिरवणूक पूर्णपणें उधळली गेली होती. पण लाठीमारांतून निसटलेल्या कामगारांचे छोटे छोटे थवे तलावाच्या दोन्ही बाजूंच्या रस्त्यांवर जागोजाग रेंगाळत उभे होते. ढगांनीं व्यापलेलें आकाश वादळी वाऱ्यानें ढगांना झोडपून मोकळें केल्यावर क्षितिजाच्या कोपऱ्याकोपऱ्याला जसे ढगांचे हिरमुसलेले पुंजके घोटाळत रहावे, तसे ते भयभीत कामगारांचे थवे दिसत होते.

त्या लाठीमारांत मध्यें घुसलेल्या विठोबाला गांठण्यासाठीं धडपडत असलेल्या वसंताच्या उजव्या मनगटावर ओझरता रट्टा बसला. पण डाव्या हातानें तें मनगट घट्ट दाबून तो तसाच पुढें सटकला; व विठोबा सिटीसाहेबांशीं बोलत असतां हळूच त्यांच्या मागें जाऊन उभा राहिला. तो आपल्या मागें उभा आहे हें विठोबाच्या मात्र ध्यानांत आलें नाहीं. पण विठोबा खुर्चीवर बसल्यावर जेव्हां त्याच्या शेजारीं उभ्या असलेल्या एका कॉन्स्टेबलनें वसंताला 'यहांसे हट् जाव' असें म्हणून हटकलें, तेव्हां विठोबाचें लक्ष त्याच्याकडे जाऊन तो उद्गारला—

"तुला मी घरीं राह्यला सांगितलं होतं ना, वशा ? मग इथं कशाला आलास तूं माझ्या मागून ? लागलं बिगलं तर नाहीं ना तुला कुठं ?—"

"छे, मुळींच नाहीं. तुम्ही गेल्यावर आई राहूंच देईना घरीं मला——"

त्यानें आपल्या मनगटावरील हात झटदिशीं बाजूला करून म्हटलें. पण त्याच्या आवाजांतील कंप आणि त्याहिपेक्षां डोळ्यांतील आवरलेले अश्रु विठोबाच्या लक्षांत आल्याशिवाय राहिले नाहींत.

"पण तूं आतां थांबूं नकोस इथं. मी बहुतेक आज संध्याकाळींच जामिनावर सुटून परत येईन घरीं. तूं जा आणि काळजी घे नीट तिची—"

आपल्या स्वतःच्याहि आवाजांत कंप उत्पन्न होत आहे असें विठोबाला वाटलें आणि तो क्षणभर थांबला.

तोंच सिटीसाहेब जवळ येऊन त्याला म्हणाले, "चला, आपण जाऊं या आतां. हा कोण मुलगा ?—"

"हा माझा मुलगा—"

बिठोबानें किंचित् अभिमानानें म्हटलें.

तेव्हां सिटीसाहेब चटकन वसंताच्या जवळ गेले आणि त्याच्या खांद्यावर हात ठेवून अगदीं आपुलकीच्या आवाजांत उद्गारले—

"तूं मोठा हुषार मुलगा दिसतोस, बेटा! पण तुझ्या या भोळ्या, अविचारी पित्याप्रमाणं तूं आपलं आयुष्य खराब करून घेऊं नकोस भलभलत्या कल्पनांच्या आणि माणसांच्या नादीं लागून—"

तो कठोर पण कळकळीचा उद्गार ऐकतांच वसंताच्या डोळ्यांतले आवरलेले अश्रु गालांवर ओघळले.

पण त्यानें लगेच हंसल्यासारखें करून मान वळवली.

सिटीसाहेबांच्या मोटारींत बसतांना बिठोबानें पुन्हा एकदां त्याला म्हटलें, "तिची नीट काळजी घे तूं. घरांतून कुठं जाऊं नकोस अगदीं. मी संध्याकाळपर्यंत घरीं येईन सुटून. अण्णासाहेब दुपारीं कोर्टांत हजर राहून खटपट करतील मला जामिनावर सोडविण्याची—"

विठोबाचे हे मराठींतील उद्गार सिटीसाहेबांना अर्धवट समजले असावे.

कारण तें शेवटचें वाक्य त्यानें उच्चारतांच अत्यंत उपरोधपूर्ण अशा स्मिताची रेषा त्यांच्या त्या सतत चिरूट ओढून काळ्या पडलेल्या जाड ओंठाभोंवतीं क्षणार्ध उमटून गेली.

लगेच मोटार सुरू झाली.

आणि तिच्या वेगानें उत्पन्न झालेल्या धुळीच्या लोटानें वसंताच्या डबडबलेल्या डोळ्यांना आपल्यापुढलें जग नाहींसें झाल्यासारखें वाटलें.

तो अत्यंत जड अंतःकरणानें आणि त्याहिपेक्षां जड पावलांनीं घरीं यावयाला निघाला.

त्याच्या डोक्यांत एकाच प्रश्नाच्या घणाचे घाव आतां सारखे बसत होते—

"आई ज्या वेळीं 'ते कुठं आहेत?' असा प्रश्न आपल्याला विचारील, त्या वेळीं आपण तिला काय उत्तर द्यायचं?—"

हा प्रश्न त्याच्या मनाला क्षणोक्षणीं दंश करीत असतांनाच त्यानें त्या दुकानावर जाऊन आपली सायकल घेतली आणि तो अत्यंत वेगानें घरीं येऊन पोंचला—

तों दाराशींच त्याला गर्दी दिसली.—

त्याच्या पोटांत धस्स झालें.

ती गर्दी कामगारांची होती.—

त्याला वाटलें, बहुधा आईच्या कानांपर्यंत बाबांना अटक झाल्याची बातमी पोंचली असावी.

त्यानें सायकल दारांत उभी केली आणि तो आंत जाणार, तों त्याच क्षणीं बाहेर आलेली कृष्णा घाबऱ्या घाबऱ्या त्याला म्हणाली—

"दादा, कुठं होतास रे तूं इतका वेळ? आई बघ कससंच करतेय. मघांपासून तीन माणसं पाठवलीं मी तुला शोधायला. सुईण म्हणते, डॉक्टरणीला आणल्याशिवाय भागायचं नाहीं. तूं घेऊन ये लवकर कुणाला तरी—"

आणि ती डोळ्यांना पदर लावून ढळढळां रडूं लागली.

"किशे, वेडी आहेस का तूं? अग, या घरांत आतां आपणच दोघं वडील माणसं! दगडासारखं घट्ट मन करून आल्या प्रसंगाला तोंड दिलं पाहिजे आपण! तूं जर असा धीर सोडलास, तर त्या पोरांनीं कुणाच्या तोंडाकडे बघायचं?—"

त्यानें मोठ्या धीरानें म्हणून शब्द उच्चारले ते. पण स्वतःच्या डोळ्यांत उभे राहिलेले अश्रु त्यालाहि आवरेनात.

तो मुकाट्यानें तिच्या मागोमाग आंत गेला.

राधाबाई खाटेवर तळमळत होती.

तिचें विव्हळणें आतां बंद झालें होतें. फक्त कण्हण्याचा क्षीण शब्द सारखा तिच्या तोंडून उमटत होता.

वसंतानें तिच्या तोंडाकडे पाहिलें.

तिच्या मिटलेल्या डोळ्यांतून पाणी सारखें ठिबकत होतें—

आणि तोंडावर पहाटे दिसलेली निळसर छटा आतां गडद झाली होती—

तो एक शब्दहि न बोलतां बाहेर पडला.

आणि अत्यंत वेगानें त्यानें सायकल पिटाळली.

तो बंगल्यावर येऊन पोंचला, त्या वेळीं रोज आपल्या खोलींत आरशासमोर उभी राहून केंस विंचरीत होती.

नेहमीप्रमाणें आगाऊ घंटी न वाजवतां तो तसाच तडक आंत तिच्या खोलींत आला——

आणि तिला म्हणाला, "रोजबाइ, तुम्ही घरीं चलतां का आमच्या आतांच्या आत्तां तुमच्या ओळखीच्या त्या डॉक्टरणीला घेऊन?—"

त्याबरोबर हातांत धरलेला आपल्या पिंगट केसांचा मोठा थोरला पेड झटकन पाटीवर सोडून देऊन तिनें विचारलें, "का रे? काय होतंय आईला तुझ्या, वसंता?——"

"दोन दिवस झाले. पोटांत थोडंथोडं दुखत होतं तिच्या. पण पहाटेपासून जास्त आहे. आणि बाबांना आतांच अटक झाली आमच्या—"

"विठोबाजींना अटक? आणि ती कशाबद्दल?—"

"आजपासून संप सुरू झाला ना रोजबाई? त्यांतला पहिला बळी आमच्या घरांतून!—"

"तरीच! आज पहांटे पांचलाच उठून परस्पर बाहेर गेले ते. आमची गाडी नली आहे त्यांनीं. पण पपांची गाडी फोन करून मागवतें मी. आणि लगेच आपण मिशन हॉस्पिटलमध्यें जाऊं न् तिथून डॉ. फर्नांडिसला बरोबर घेऊन मग घरीं जाऊं तुमच्या. तूं घाबरूं नकोस अगदीं. ती पांच मिनिटांत मोकळी करील तुझ्या आईला. तूं कालच का नाहीं आलास रे माझ्याकडे?"

तिनें झटकन बाहेर येऊन फोन केला आणि केसांचा पेड तसाच गुंडाळून त्याच्या भोंवती घाईघाईनें हाताला लागले ते आंकडे लावले.

तोंच गुप्तासाहेबांची मोटार कमानीखालीं येऊन उभी राहिली.

रोजनें डोक्यावर पदर घेतला—

आणि तीं दोघें मोटारींत बसलीं.

मिशन हॉस्पिटलच्या आवारांत डॉ. मिस फर्नांडिस हिच्या बंगल्यापाशीं मोटार उभी रहातांच रोज एकटीच खालीं उतरून आंत गेली.

वसंताला घरून निघाल्याला आतां पाऊण तास होत आला होता.

त्याच्या मनांत सारखें येत होतें, आईची स्थिति आतां कशी असेल?

खाटेवर तळमळत असलेली, अत्यंत क्षीण आवाजांत कण्हत असलेली आपली आई!— तिच्या मिटलेल्या डोळ्यांतून ठिबकणारीं तीं आसवें, तोंडावर आलेली ती दाट निळसर छटा आणि वेदनांच्या क्षिणक्षणिक होणारी शरीराची पिळवट!——त्या प्राणांतिक वेदनांतून डॉ. फर्नांडिस खरोखरीच पांच मिनिटांत मोकळी करील का तिला?——

तो विचार मनांत येतांच त्याच्या डोळ्यांतून एकदम अश्रु वाहूं लागले—

त्याच क्षणीं डॉ. फर्नांडिस आपल्या किनऱ्या आवाजांत रोजशीं बोलत हंसत हंसत बाहेर आली.

उंच टाचांच्या बुटांमुळें अधिकच उंच वाटणारी ती धिप्पाड, काळी, कुरूप पण अत्यंत प्रसन्न मुद्रा असलेली मर्दानी स्त्री पहातांच वसंतानें आपले डोळे घाईघाईनें पुसले—

"याच मुलाची आई. मी भावासारखा मानलाय याला माझ्या—"

रोजनें वसंताकडे पाहून तिला म्हटलें.

"तुमी बिलकूल घबराट होवूं नका! मी आत्तां त्वरी करीन तुमच्या मायला!—"

डॉ. फर्नांडिसनें मोटारींत बसतां बसतां आपल्या किनऱ्या आवाजांत आणि कुणबाऊ मराठींत वसंताला धीर देण्याचा प्रयत्न केला.

गाडी चालू असतां रस्त्यानें तिनें वसंताला सगळी माहिती विचारून घेतली. पण तिनें स्वतः मात्र कांहींहि मत व्यक्त केलें नाहीं.

मोटार दारापाशीं उभी रहाते न राहते, तोंच कृष्णा धावत बाहेर आली—

आणि रोज खालीं उतरतांच एकदम तिचे हात धरून उद्गारली—

"रोजबाई, किती हो उशीर केलात तुम्ही यायला! आई अगदीं निपचित पडली आहे. तिचं कण्हणंसुद्धां बंद झालंय आतां—"

रोजनें तिला घट्ट आपल्या पोटाशीं धरली आणि त्या चौघे नुकाट्यानें आंत गेलीं.

डॉ. फर्नांडिसनें खोलींत आल्याबरोबर सुईणीला खाटेच्या मागच्या बाजूला असलेली खिडकी उघडावयाला सांगितलें—

आणि खाटेवर निपचित, निश्चेष्ट पडलेल्या राधाबाईच्या ओटीपोटावर हळूच आपला हात ठेवला—

तत्क्षणींच ती चमकून मागें वळली—

—जणूं कांहीं विजेचा धक्का बसला तिच्या हाताला!—

आणि आपल्या शेजारीं उभ्या असलेल्या रोजला हळूच इंग्रजींत म्हणाली--

"पोर मरून बराच वेळ झालेला दिसतोय! पोट दुखायला लागल्याबरोबर कां नाहीं बोलावलं मला, रोज? मी प्रयत्न करून पहातें. देवाची कृपा असेल, तर यश येईल माझ्या हाताला--"

ते शब्द तिनें उच्चारले आणि कपाळाला आलेला घाम रुमालानें पुसला.

तोंच कृष्णा आणि वसंता हळूच दार उघडून आंत डोकावलीं--

"कुणा तरी अगदीं जवळ असलेल्या डॉक्टरला ताबडतोब आणा—"

डॉ. फर्नांडिसनें वसंताकडे पाहून म्हटलें.

तो तत्क्षणींच खोलींतून बाहेर पडला.

डॉ. फर्नांडिसनें आपली बॅग उघडली; उपकरणांची पाटावर मांडामांड केली; व नंतर रोजकडे वळून म्हटलें--

"तूं एकटी थांब इथं रोज न् सुईणीला राहूं दे. डॉक्टर आल्याबरोबर त्यांना आंत येऊं दे लगेच--"

रोजनें आपल्याला बिलगून उभ्या असलेल्या कृष्णाला खोलींतून बाहेर आणलें--

"मला आंत राह्यला काय हरकत आहे, रोजबाई?"

कृष्णानें रडत रडत विचारलें.

"पण डॉक्टरीणबाई नको म्हणतात ना? आई मोकळी झाल्यावर आंत ये तूं—"

"पण आई लवकर मोकळी होईल का हो खरोखरी?—"

कृष्णानें रोजचे दोन्ही हात घट्ट धरून अगदीं केविलवाण्या निराश आवाजांत विचारलें.

रोज कांहीं बोलली नाहीं.

तिचे स्वतःचे डोळे पाण्यानें भरून येत होते.

पण, कृष्णाची समजूत घालण्यासाठीं ती कांहीं बोलणार, तोंच संता डॉक्टरला घेऊन आंत आला--

डॉक्टर खोलींत गेल्यावर रोज वसंताला म्हणाली--

"तुम्ही दोघं छपरींत बसा. मी सुटका झाल्याबरोबर बाहेर ऊन सांगतें तुम्हांला—"

आणि ती खोलींत गेली.

कृष्णा भिंतीला टेकून उभी होती.

तिच्या डोळ्यांतून सारखे अश्रु वहात होते.

वसंता मुकाट्यानें फेऱ्या घालीत होता.

आणि मधूनमधून दारांत बसलेल्या कामगारांशीं एकादुसरा शब्द बोलत होता.

फेऱ्या घालतां घालतां तो मध्येंच एकदम कृष्णाला म्हणाला, "या सगळ्या दुःखांत एका गोष्टीचं समाधान वाटतंय मला, किशे ! बाबांना अटक झाल्याचं कांहीं समजलं नाहीं आईला अजून—"

त्यानें ते शब्द उच्चारले मात्र—

कृष्णाला एकदम जोराचा हुंदका आला.

आणि त्याबरोबर त्याच्या स्वतःच्या मनांत एकदम कल्पना चमकून गेली--

"बाबांना अटक झाल्याचं समजण्याच्या स्थितींतून आई कदाचित् कायमची तर पलिकडे गेली नसेल ना?--"

ती कल्पना मनांत येतांच त्याच्या अंगावर कांटा उभा राहिला.

पण कृष्णा आपल्या दुःखांत चूर होती. त्याची ती मनःस्थिति तिच्या लक्षांत आली नाहीं.

सकाळीं आईचें विव्हळणें बंद झाल्यापासूनच तिच्या मनानें हाय घेतली होती. पण ती समजूतदार असल्यामुळें त्या विलक्षण परिस्थितींतहि पिठलंभात करून तिनें आपल्या धाकट्या भावंडांना जेवावयाला घातलें; व आपल्या एका मैत्रिणीच्या घरीं त्यांची रवानगी करून दिली.

भावंडें घरांतून गेल्यावर तिला एकदम मोकळें वाटलें.

आणि तेव्हांपासून तिच्या डोळ्यांना लागलेली धार खळली नव्हती.

आईचीं पूर्वींचीं तीन बाळंतपणें तिनें पाहिलीं होतीं. त्या तिन्ही बाळंतपणांच्या वेळीं सुईण येण्यापूर्वींच अगदीं सहज प्रसूति झाल्याचें तिच्या चांगलें लक्षांत होतें. त्यामुळें आज पहांटे जेव्हां वेदना असह्य होऊन राधाबाई तिला अवचित् म्हणाली, "किशे, मी कांहीं वाचत नाहीं ग या पोराचं तोंड पाह्यला!" तेव्हां तिच्या काळजानें ठाव सोडला.

बाळंतपणाचा संबंध फक्त जन्माशीं असतो, असा गेल्या तीन खेपांचा तिचा अनुभव होता. पण, आज बाळंतपण हा मृत्यूशीं झगडा असल्याचा, तें मृत्यूला कारण होत असल्याचा अनुभव ती सकाळपासून क्षणोक्षणीं घेत होती. दिवस जसजसा वर येत होता, तसतशी तिच्या आईच्या तोंडावरली छाया गडद होत होती. तिचें स्वतःचें मन त्या भेसूर छायेनें इतकें कांहीं व्यापलें होतें कीं, विठोबाला अटक झाल्याची बातमी जेव्हां लाठीमारांतून निसटून पळत आलेल्या कामगारांनी तिला सांगितली, तेव्हां तिला त्या आपत्तीचें कांहींहि वाटलें नाही. गेलीं दहा वर्षें आई हाच तिचा आणि तिच्या लहान लहान भावंडांच्या जीवनाचा एकमेव आधार होता. तो आधार तंतूतंतूनें तुटत असल्याचें तिला क्षणोक्षणीं दिसत होतें. त्या दारुण दुःखानें व्यापलेल्या तिच्या मनांत दुसऱ्या कोणत्याहि भावनेला, दुसऱ्या कोणत्याहि दुःखाला थारा नव्हता. त्यामुळें बाहेर कोण काय बोलत आहे, आपला दादा काय

रीत आहे आणि कोणत्या मनःस्थितींत आहे, यांपैकीं कशाचेंच भान ला नव्हतें. तिचें सगळें लक्ष त्या आंतल्या खोलीच्या बंद केलेल्या राकडे होतें. त्या खोलींत होत असलेले आवाज, हळुहळू चाललेली जबूज तिच्या दुःखातुर कानांवर अस्पष्टतेनें येत होती. तिचें दुःखा-ष्ट मन तिच्या निपचित पडलेल्या आईपाशीं घोटाळत होतें; तिचे वडवलेले डोळे त्या खोलीच्या दाराकडे लागलेले होते; व तिचे आसु-लेले कान त्या खोलींतून निघणाऱ्या आवाजांची चाहूल घेत होते.

पूर्वी तीन वेळां त्या बंद केलेल्या खोलींतून दहा पंधरा मिनि-ांच्या आंत बाहेर पडलेला रडण्याचा कोमल, आनंददायक आवाज ानें किती हर्षभरानें ऐकला होता!

आणि तो आवाज ऐकल्यावर सुईण नको नको म्हणत असतां डबडीनें आंत जाऊन तिनें किती उत्सुकतेनें सुईणीच्या हातांतला तो ातपाय हलवणारा चिमुकला, मांसल जीव पुनःपुन्हा न्याहाळून ाहिला होता!

पण आज!—

आज आतां पाऊण तास होत आला, तरी तशा प्रकारचा कसलाहि आवाज नाहीं, कोणतीहि आनंददायक गडबड नाहीं.

डॉ. फर्नांडिस आईच्या पोटाला हात लावल्यावर मथांशीं जें ोलली, तिच्या तोंडचा जो निराशेचा उद्गार आपण ओझरता ऐकला, सें तर झालें नसेल?—

. तोंच रोज खोलीचें दार उघडून बाहेर आली आणि म्हणाली—

"कृष्णा, वसंता, तुम्ही आंत या दोघं जरा—"

अत्यंत भयभीत अंतःकरणानें तीं दोघें आंत गेलीं.

डॉक्टर खाटेच्या पायथ्याशीं स्तब्ध उभे होते; व डॉ. फर्नांडिस खाटेजवळ जमिनीवर गुडघे टेकून, छातीशीं स्वस्तिकाकार हात करून

आणि खालीं मान घालून बसली होती.

राधाबाई खाटेवर शांत पडली होती. तिला असह्य झालेला तो गर्भभार आणि त्या प्राणांतिक वेदना यांच्या पलिकडे ती गेली होती.

तिच्या त्या मिटलेल्या डोळ्यांभोंवतीं अश्रु सांकळले होते; व बोलण्यासाठीं ओठ विलग व्हावे तशी तिची ती किंचित् वांकडी झालेली जिवणी दिसत होती.

वसंतानें तें दृश्य पाहिलें आणि लगेच मागें वळून आपल्या पाठीशीं उभ्या असलेल्या कृष्णेला त्यानें मिठी मारली.

आणि त्याच्या तोंडून अत्यंत आर्त आवाजांत उद्गार निघाला—

"किशे, आपली आई कायमची मोकळी झाली ग!——"

# तुरुंगांतून मुख्य प्रधानाकडे

विठोबानें तो सारा दिवस तुरुंगांत तळमळत काढला.

त्याला खात्री होती कीं, दुपारीं दहाच्या सुमारास वसंता घरून जेवणाचा डबा घेऊन येईल. म्हणून जमादारानेंज्या वेळीं, 'तुमच्या जेवणाचा इंतजाम करायचा कीं नाहीं?', असा प्रश्न त्याला केला, तेव्हां विठोबानें, 'माझें जेवण घरून येईल,' असें उत्तर त्याला दिलें.

पण कोर्टापुढें हजर होण्याची वेळ आली, तरी जेवण आलें नाहीं किंवा घरून कुणी भेटावयालाहि आलें नाहीं.

त्याला प्रथम आश्चर्य वाटलें, मागाहून भीति वाटली.

खाटेवर असहाय स्थितींत विव्हळत पडलेली राधाबाई!—तिची ती केविलवाणी मूर्ति त्याला आतां क्षणोक्षणीं डोळ्यांपुढें दिसूं लागली; तिचें तें शरीराला पिळवटून निघणारें विव्हळणें त्याच्या कानांत आतां

एकसारखें घुमूं लागलें. आणि कोणत्याहि संकटाला न डगमगणाऱ्या त्याच्या डोळयांत आतां वारंवार आंसवें येऊं लागलीं.

त्याच स्थितींत त्याला कोर्टापुढें दाखल करण्यांत आलें.

त्याला खात्री होती कीं, अण्णासाहेब आपल्यातर्फें जामिनाचा अर्ज करण्यासाठीं कोर्टांत हजर राहतील.

पण खटल्याचें काम पाहण्यासाठीं जरी कोर्टांत कामगारांची बरीच गर्दी झाली होती, तरी अण्णासाहेब मात्र कुठेंच दृष्टीस पडले नाहींत.

विठोबाला वाटलें, आपल्याप्रमाणें अण्णासाहेबांनाहि तर अटक झाली नसेल?

पण तो त्याचा भ्रम लगेच फिटला.

कारण त्याच्याशिवाय ज्या इतर आणखी दहा कामगारांना अटक झाली होती, त्यांनाहि त्याच्या पाठोपाठ कोर्टांत आणण्यांत आलें.

त्यांत अण्णासाहेब नव्हते; नाहीं म्हणावयाला शेळके मात्र दिसले.

मग आपल्या वतीनें काम करावयाला अण्णासाहेब कां आले नाहींत? आज शनिवार. आज जर आपण आणि आपले सहकारी जामिनावर सुटलों नाहीं, तर सोमवारपर्यंत नाहक सर्वांना तुरुंगांत अडकून पडावें लागणार!

—पण अण्णासाहेब का आले नाहींत?

पिंजऱ्यांत उभ्या असलेल्या विठोबानें पुनः पुन्हा विचार केला. पण त्याला उत्तर सुचेना.

खटल्याची रीतसर प्राथमिक सुनावणी झाली आणि त्यांना परत तुरुंगांत पाठविण्यांत आलें.

दुपारीं एकच्या सुमारास तो तुरुंगांतील आपल्या कोठडींत परत आला. जमादारानें त्याच्यासाठीं सकाळचें तें निवलेलें अन्न आणलें. पण, त्यानें आग्रह केला, तरी तें खाण्याची वासना विठोबाला होईना.

त्याच्या जिवाला कधीं नव्हे अशी घराची विलक्षण ओढ लागली होती. राधाबाईचें काय झालें असेल, ती कोणत्या स्थितींत असेल, ही एकच एक शंका त्याच्या मनांत उफाळत होती, त्याच्या हृदयाला वारंवार दंश करीत होती.

घरून जेवण यावयाला हवें होतें, कपडे यावयाला होते, कोणी-तरी भेटावयाला यायला हवें होतें. त्याला सारखें वाटत होतें कीं, दुपारीं नाहीं तर निदान संध्याकाळीं तरी वसंता येईल आणि आपल्या-ला राधाबाईची सुखरूप सुटका झाल्याचें कळेल.

संध्याकाळीं जेवणाच्या आधीं जेव्हां त्याला कोठडींतून बाहेर काढण्यांत आलें, तेव्हां त्यानें जमादाराला विचारलें देखील–

"मला भेटायला कोणीच आलं नाहीं का ? माझ्यासाठीं कोणीं कांहीं आणून दिलं नाहीं का ?–"

जमादारानें जेव्हां त्याच्या त्या प्रश्नांना नकार दिला, तेव्हां त्याचें अंतःकरण खचल्यासारखें झालें. घरीं कांही तरी अघटित घडलेलें असल्याशिवाय असा प्रकार होणार नाहीं, राधाबाई आपली अशी उपेक्षा केव्हांहि होऊं देणार नाही, अशी त्याची खात्री होती. जिनें सकाळीं आपल्या पाठोपाठ वसंताला गिरणीकडे पिटाळला, ती आपल्याला अटक झाल्याचें कळल्यावर आपली वास्तपुस्त करणार नाहीं, ही गोष्ट सर्वथैव अशक्य होती. अर्थात् घरीं कांहीं तरी अघटित घडलेलें असावें —

त्या शंकेनें त्याला वेड्यासारखें होऊन गेलें, नाहीं नाहीं त्या कल्पना मनांत येऊन त्याच्या मनाची विलक्षण तळमळ, विलक्षण होरपळ झाली.

राधाबाईवरील आपल्या नितांत प्रेमाची त्याला आजवर कधींहि जाणीव झाली नव्हती. अन्नांतील जीवनरस जसा शरीरांत न कळत मुरतो, तसें त्याचें तिच्यावरील प्रेम त्याच्या अंतर्वृत्तींत भिनून गेलें होतें.

त्या प्रेमामुळेंच त्याला संसाराची कधीं काळजी वाटली नाहीं. काळजांत कळ उठल्याशिवाय कधीं काळीज असल्याची जाणीव होते का? शरीरांतील हाडें कसकसल्याशिवाय कधीं त्यांच्या अस्तित्वाची आठवण होते का? तसेंच त्याच्या तिच्यावरील अजाण, अबोल प्रेमाचें होतें. आपण आपल्या बायकोवर जिवाभावानें प्रेम करीत आलों आहोंत, हें आजवर त्याला कधीं उमजलें नव्हतें. तें आज, ती प्राणांतिक वेदनांनीं तळमळत असतां आपण तिला सोडून आलों, या भावनेमुळें त्याला प्रथमच तीव्रतेनें जाणवलें.

टांक्यावरून तोंड धुवून तो आपल्या कोठडींत परत आला आणि लोखंडी बरतनांत त्याला अन्न वाढण्यांत आलें. सकाळपासून त्याच्या पोटांत कांहींहि नव्हतें. तरीसुद्धां त्या अन्नाला हात लावण्याची इच्छा त्याला होईना.

जमादारानें कोठडीच्या दाराला कुलूप घातलें.

सूर्य आतां मावळला होता. पण उन्हाळ्यांतला तो गरम, कंटाळवाणा संधिप्रकाश सरतां सरेना. त्या संधिप्रकाशाच्या क्षितिजा-वरील शोभेची एकहि छटा दृष्टीस पडूं नये आणि त्याचा भगभगीत उजेड मात्र त्या भकास कोठडींत रेंगाळत राहावा!—विठोबाच्या शिणलेल्या, त्रस्त डोळ्यांना रात्र केव्हां एकदां येईल, असें होऊन गेलें.

रात्र लवकरच आली आणि तिच्या अंधारापेक्षांहि गडद अशा निराशेची काळोखी त्याच्या अंतःकरणांत पसरली.

खाटेवर विव्हळत पडलेली राधाबाई, आपण सकाळीं घरांतून बाहेर पडत असतां भयविव्हल नेत्रांनीं आपल्याकडे बघणारी कृष्णा, आपल्याला पकडल्यानंतर मोटार निघण्याच्या वेळीं वसंताच्या डोळ्यांत उभे राहिलेले अश्रु—तीं दृश्यें वारंवार डोळ्यांपुढें आणणारा तो निवांत अंधार विठोबाला असह्य झाला.

त्याच्या मनांतील विचार आणि त्याच्या डोळ्यांतील अश्रु हेच काय ते त्या भयाण अंधारांत त्याचे सोबती होते.

   

नागपुरास सकाळीं झालेल्या त्या लाठीमाराची बातमी दुपारीं ाकराच्या सुमारास पचमढीला पोंचली.

ती तार आली, त्या वेळीं प्रियदर्शन नुकताच जेवावयाला बसला ाता.

चपराशानें तार उमाकांताच्या हातीं दिली. त्यानें ती फोडून ाचली आणि मुकाट्यानें खिशांत घातली. पण ती वाचीत असतांना याच्या चेहेऱ्यावर एकदम उमटलेली विषादाची छटा प्रियदर्शनच्या ाजरेतून सुटली नाहीं. त्यानें हातांतला चमचा खालीं ठेवून विचारलें—

"कशाबद्दल तार आहे, उमा ?—"

"विशेष कांहीं नाहीं. जेवण झाल्यावर वाचून दाखवतों मी तुला—"

"विशेष कांहीं नाहीं ना ? मग आतांच वाचायला काय हरकत आहे ? वाच बरं !—"

उमाकांतानें मुकाट्यानें खिशांतून तार काढून ती सावकाश वाचली.

तार वाचून झाल्यावर त्यानें प्रियदर्शनकडे बघितलें.

त्याचा चेहरा अगदीं शांत होता.

त्यानें पाण्याचा घोट घेतला आणि उमाकांताला म्हटलें, "पंडितजींकडे न् उत्तमरावांकडे चपराशाला पाठव आणि त्यांना ताबडतोब बोलावून घे——"

आणि तो प्रियंवदेकडे वळून म्हणाला, "माझी नागपूरला जायची तयारी करा, माई ! जेवण संपल्याबरोबर निघणार मी——"

"पण तुला गेलंच पाहिजे का नागपूरला ? ते दोघे काय म्हणताहेत तें पहा आणि मग जायचं कीं नाहीं तें ठरव——"

"ते दोघे कांहींहि म्हणोत ! माझं नागपूरला जायचं ठरलं, माई ! फक्त पंडितजी बरोबर यायला तयार होताहेत का हें बघणार आहे मी ?——"

"हो. त्यांच्या खात्याचा प्रश्न आहे हा—"

उमा मध्येंच म्हणाला.

"म्हणूनच नागपूरला जें काय होईल तें त्यांच्या संमतीनं, त्यांच्या समक्ष झालेलं चांगलं ! पाहू या ते येतात का ?—"

हुजऱ्यानें पुढें केलेल्या तस्तांत प्रियदर्शननें चूळ भरून टाकली आणि तो आपल्या अभ्यासिकेंत आला.

त्याला फार वेळ वाट पहावी लागली नाहीं. नागपूरला जातांना आपल्याबरोबर न्यावयाच्या फाइलींची तो नोंद करीत असतांनाच पंडितजी आणि उत्तमराव बोलत बोलत आंत आले.

"तुम्हांला तार मिळालीच असेल?"

"हो. मला अंदाज होताच कामगार गडबड करतील म्हणून!"

पंडितजींनीं स्मित करीत म्हटलें.

"मग आपण काय करावं आतां?"

"कांहींहि करण्याची गरज नाहीं. आपण गप्प बसलों, तर संप आपोआपच मोडेल पंधरावीस दिवसांत! पोलिस बंदोबस्त मात्र वाढवावा आणि जरूर वाटल्यास १४४ कलमहि लागू करावं—"

"म्हणजे लाठिमार आणि सभाबंदी हेच उपाय योजावे म्हणतां आपण?—"

त्याच्या त्या प्रश्नांतली खोंच पंडितजींच्या लक्षांत आली. पण चेहेरा शक्य तितका निर्विकार ठेवून ते म्हणाले—

"मग दुसरं काय करूं शकतों आपण? जीवनवेतनाच्या प्रश्नाची चौकशी करण्यासाठीं आपण माझ्या सल्ल्याविरुद्ध कमिटी नेमलीत. तरी सुद्धां हे लोक संपावर गेलेच. अशा स्थितींत आपण काय करूं शकणार?"

"तेंच पाहणार आहे मी नागपूरला जाऊन!—"

"पण नागपूरला जाण्याची गरज काय आहे आज? आपण जर अशा रीतीनं वागूं लागलों, तर लोकांना दरारा कसा वाटेल आपला?

आम्ही संप केल्याबरोबर मुख्य प्रधान पचमढीवरून धांवत नागपूरला आले अशी शेखी जाहीर सभेंत मिरवायला कामगार पुढारी चुकणार नाहींत उद्यां!--"

"मग संप चिघळत राहिलेला आणि कामगारांवर लाठीमार झालेला चालेल म्हणतां? अशाच रीतीनं जर आपण वागणार असूं, तर आपल्यांत आणि पूर्वींच्या राजवटींत फरक काय राहिला? कामगार पुढाऱ्यांनीं शेखी मिरविलेली पत्करेल मला; पण जुन्या नोकरशाही पद्धतीनंच आम्ही संपाच्या वेळीं वागलों असा अपवाद स्वतःवर येऊं द्यायला तयार नाहीं मी!—"

"पण आपण नागपूरला गेल्यानं परिस्थिति सुधारण्याऐवजीं उलट बिघडेल असं मला वाटतं!--"

"माझं मत उलट आहे अगदीं! मी नागपूरला गेल्यावर सगळ्या प्रकाराची चौकशी करीन; कामगार पुढाऱ्यांशीं समक्ष बोलेन आणि जरूर तर कामगारांच्या जाहीर सभेंतहि भाषण करीन. आपण माझ्या बरोबर नागपूरला आलांत, तर तितकीच मदत होईल मला!--"

"आपण आंखलेला कार्यक्रम असा आहे कीं, तो माझ्या मदतीशिवाय सहज पार पडेल! मला आशा आहे कीं, कामगारांना आपण कोणतेंहि नवीन आश्वासन देणार नाहीं—"

"तिथं गेल्यावर काय करावं लागेल हें आतांच कसं सांगूं मी? म्हणूनच तर म्हणतों कीं, मला सल्ला देण्यासाठीं आपण बरोबर चलावं!–"

"मी एरवीं आनंदानं आलों असतों. पण या परिस्थितींत आपण नागपूरला जाणं अगदीं अनिष्ट आहे असं वाटतं मला—"

"मला आपलं हें मत पटत नाहीं—"

"म्हणूनच आपण एकट्यानं जावं आणि योग्य वाटेल तें करावं!—"

"म्हणजे आपण मला पूर्ण कृतिस्वातंत्र्य देतां आहांत असं समजूं का मी ?—"

"तें मी देण्याचं कारणच नाहीं. मुख्य प्रधानाचा स्वयंभू अधिकार आहे तो !—मग मला वाटतं माझं कांहीं काम नाहीं आतां इथं !—"

"ठीक! मी आपल्याला नागपूरहून परत आल्यावर भेटतों न् सांगतों काय तिथं घडतं तें—"

पंडितजी नमस्कार करून बाहेर पडले.

क्षणमात्र खोलींत अगदीं निःशब्दता होती.

पंडितजींच्या मोटारीचा आवाज ऐकूं येईनासा झाल्यावर उत्तमराव म्हणाले, "पंडितजींनीं नागपूरला जाण्याच्या बाबतींत जी हरकत घेतली, तींत तथ्य आहे असं वाटत नाहीं तुम्हाला ?—"

"हो. मला जाणीव आहे. कामगार पुढारी माझ्या या वर्तनाचा अतिशय वाईट फायदा घेतील आणि आपला नैतिक जय झाल्याबद्दल फुशारक्या मारतील. पण त्यांच्या फुशारक्यांच्या भीतीनं आपण परिस्थिति अधिक बिघडूं देणं शहाणपणाचं होईल का ? कांग्रेसच्या राज्यांत प्रांताच्या राजधानीमध्यें कामगारांवर लाठीमार व्हावा आणि मुख्य प्रधानानं पचमढीच्या थंड हवेंत स्वस्थ आराम करीत बसावं हें चांगलं दिसेल का ?—मी जर आज नागपूरला गेलों नाहीं, तर पुन्हा लाठीमार होईल. तो व्हायला नको आहे मला;—म्हणून मी नागपूरला जातोंय ! कामगारांचं धोरण चुकीचं असेल. पण सरकार आपल्या पाठीशीं आहे असं समजायला जागा नाहीं देणार मी मालकांना ! मी जीवनवेतनाचं बिल असेंब्लींत आणणार अशी बातमी लागतांच ज्यांनीं सरदारांकडे शिष्टमंडळ नेलं, त्यांना हें कळायला हवं कीं, मालक आणि कामगार यांना कांग्रेसच्या राज्यांत तरी एकाच मापानं मोजलं जाईल ! यंत्रं नीट चालावींत म्हणून हजारों रुपये खर्च करून जे थंड हवेच्या खोल्या बांधतात, त्यांना आपल्या कामगारांना पोटापुरता

पगार देण्याची कल्पना दुःसह व्हावी यापरता मानवतेचा अधःपात तो कोणता? माणसापेक्षां यंत्राची किंमत ज्यांना जास्त वाटते, त्यांना जरूर तर जरबेनं माणुसकी शिकविली पाहिजे. माझा असा अगदीं निश्चय आहे कीं, जीवनवेतनाचं बिल येत्या जुलैच्या बैठकींत आणून कापूसधंद्यापुरतं तरी औद्योगिक तंट्यांचं बीज नाहींसं करायचं! एकदां हा प्रश्न सुटल्यावर मग खाणमजूर आणि इतर कामगार यांच्या परिस्थितीकडे मी वळेन. नागपूरला संप चालू असतां आपण इथं स्वस्थ बसून राहणं म्हणजे पर्यायानं मालक आणि पोलिस या दोहोंनाहि मोकळा हात देण्यासारखं आहे. ती गोष्ट मी कधींहि घडूं देणार नाहीं."

प्रियदर्शन आवेशानें उद्गारला. नंतर क्षणक थांबून त्यानें उत्तमरावांना सौम्य आवाजांत म्हटलें—

"मी नागपूरहून शेगांवलाहि जाईन बहुतेक—"

"शेगांवला? आणि तें कशासाठीं?—"

"हा संप सहजासहजीं घडून आला आहे, असें वाटत नाहीं मला उत्तमराव! नागपूरला गेल्यावर मी सगळ्या गोष्टींची नीट चौकशी करीन—मजजवळ तसा पुरावा कांहींच नाहीं. पण गेल्या आठ महिन्यांचा माझा अनुभव अत्यंत वाइट आहे. म्हणून बापूंशीं मोकळ्या मनानं बोलावं न् त्यांचा सल्ला घ्यावा असा विचार आहे माझा—"

"विचार कांहीं वावगा नाहीं. पण त्यांनीं सल्ला दिला मात्र पाहिजे!—"

  

त्या कळकट कांजीचे दोन घोट विठोबानें घेतले आणि हातांतील बरतन बाजूला ठेवलें.

काल रात्रभर त्याला संथ झोंप आली नाहीं. पहाटच्या सुमारास जो एक दोन वेळां त्याचा डोळा लागला, त्याहि वेळीं विचित्र स्वप्नें पडून तो दचकून उठला होता. कोठडींतील कोंदट, गरम हवा आणि

अंगाखालच्या बुरणुसांतील ढेंकूण यांनीं त्याच्या मानसिक यातनांत भर घातली होती.

पहाटे पांच वाजतां कोठडीचें कुलूप निघाल्यावर तो जेव्हां तोंड धुण्यासाठीं टाक्यावर आला, त्या वेळीं वाऱ्याच्या गार झुळकांनीं त्याचें तळमळणारें मन आणि जळजळणारे डोळे किंचित् निवल्यासारखे झाले. आज तरी निदान वसंता आपल्याला भेटावयाला येईल आणि घरची खबर आपल्याला कळेल, हा एकच एक विचार त्याच्या मनांत थैमान घालीत होता. म्हणून वॉर्डर जेव्हां कांजी घेऊन आला, तेव्हां विठोबाच्या तोंडून उद्गार निघाला—

"राहूं दे ती कांजी! आज खात्रीनं घरून जेवण येईल माझ्यासाठीं--"

त्याबरोबर वॉर्डरच्या शेजारीं उभा असलेला जमादार मिस्किल-पणानें हंसून त्याला म्हणाला--

"कालहि तुम्हाला जेवण येईल घरून असं वाटत होतं! पण अखेर आलं नाहीं. काल सबंध दिवस उपास काढलात तुम्ही. हें नियमा-विरुद्ध आहे इथल्या? तुम्ही कांजी घेऊन ठेवा थोडी बर्तनांत—

विठोबानें मुकाट्यानें लोखंडी थाळी पुढें केली.

आणि, वॉर्डरनें त्यांत कांजी ओतल्यावर, कोण जाणें का तें, तिचे दोन घोटहि त्यानें घेतले.

दहा वर्षांपूर्वी याच तुरुंगांत हीच कांजी सकाळच्या वेळीं त्यानें आपल्या घशाखालीं ढकलली होती---

त्या वेळीं नोकरशाही राजवट होती. आज कांग्रेसचें राज्य चालू आहे. तरी सुद्धां कैद्यांना वागविण्याच्या पद्धतींत म्हणण्यासारखा बदल झालेला नाहीं—

हा विचार त्याच्या मनांत येऊन त्यानें बर्तन खालीं ठेवलें, तोंच जमादार धांवत धांवत त्याच्याजवळ येऊन म्हणाला—

"तुमचं सामान घेऊन चला लवकर---"

विठोबानें त्याच्याकडे आश्चर्यानें पाहिलें आणि विचारलें--

"कुठं जायचं ?--"

"तें मला माहित नाहीं. तुम्ही मुकाट्यानं आपलं सामान घेऊन माझ्याबरोबर चला--"

"पण कुठं नेणार आहेत मला ? कांही कल्पना ?--"

आपल्यावरील खटल्याची सुनावणीसुद्धां झालेली नसतांना आपलें स्थलांतर होत आहे, या शंकेनें त्याचा जीव व्याकुळ झाला. आतां वसंता कसा भेटणार आणि घरची बातमी तरी कशी कळणार ?

पण जमादारानें त्याला विचार करावयाला वेळ दिला नाहीं. त्यानें विठोबाचा सद्रा, कोट, टोपी उचलली; व त्या कपड्यांचा गुंडाळा त्याच्या हातांत देऊन तो चालावयाला लागला.

तो जेलरच्या खोलीपाशीं आला, त्या वेळीं शेळके तिथे उभे असलेले त्याला दिसले. त्या दोघांना ऑफिसांत नेण्यांत आलें; त्यांचें सर्व सामान त्यांच्या स्वाधीन केल्याबद्दल नोंदवहीवर त्यांच्या सह्या घेण्यांत आल्या; व नंतर त्यांना बाहेर आणून एका मोटारींत बसविण्यांत आलें.

मोटार चालू झाल्यावर विठोबानें शेळक्यांना विचारलें, "आपण कुठं चाललों आहोंत याची कांहीं कल्पना आहे का तुम्हाला ?—"

"नाहीं. मी जमादाराला खूप छेडलं. पण त्यानं कांहींच सांगितलं नाहीं---"

महाराजबागेकडे त्यांची मोटार वळली, तेव्हां आपण अमरावतीला जात आहोंत कीं काय, अशी शंका विठोबाच्या मनांत आली.

तोंच मोटार सायन्स कॉलेजवरून सिव्हिल लाइन्सच्या रस्त्याला लागली आणि पांच सहा मिनिटांत 'सागर व्हिला'च्या भव्य प्रवेशद्वारांतून आंत शिरली.

त्याबरोबर विठोबा शेळक्यांना म्हणाला, "आपण कुठं आलों लक्षांत आलं ना तुमच्या ?--"

"हो. पण मला अर्थ समजत नाहीं या प्रकाराचा—"

शेळके हे शब्द बोलत आहेत, तोंच मोटार कमानीखालीं येऊन थांबली—

आणि जमादारानें त्यांना खालीं उतरवून व्हरांड्यांतील खुर्च्यां-वर बसावयाला सांगितलें.

ते दोघे आश्चर्यानें अगदीं चूर होऊन गेले होते. मुख्य प्रधा-नांच्या निवासस्थानीं आपल्याला कशाला आणलें, याचा कांहींच उमज त्यांना पडेना.

पण त्यांना फार वेळ थांबावें लागलें नाहीं.

व्हरांड्याला लागून असलेल्या मुख्य प्रधानांच्या अभ्यासिकेंत घंटेचा आवाज झाला. त्याबरोबर एका चपराशानें बाहेर येऊन त्यांना आंत नेलें.

आपल्या स्वागतार्थ हात जोडून पुढें आलेल्या प्रियदर्शनला पहातांच विठोबा विस्मयानें गोंधळून जाऊन उद्गारला—

"आपण ....... आपण इथं केव्हां आलां?—"

"तुम्हीच आणलंत पचमढीहून मला, विठोबाजी !"

प्रियदर्शननें हंसत हंसत म्हटलें.

त्याच्या त्या उद्गारांतली खोंच विठोबाच्या प्रथम लक्षांत आली नाहीं. पण ती येतांच तो किंचित् वरमून म्हणाला—

"आपल्याला अशा प्रकारचा त्रास द्यावा अशी मुळीच इच्छा नव्हती आमची—"

"माफ करा विठोबाजी! आतां तुमच्या शब्दावर मी विश्वास टाकावा अशी परिस्थिति ठेवलेली नाहीं तुम्ही. हजारों कामगारांच्या समक्ष जाहीर सभेंत मला दिलेला शब्द तुम्ही मोडलात—"

"पण तो मी स्वतःच्या इच्छेनं मोडला नाहीं. मला निरुपायानं मोडावा लागला—"

"तुमच्या या वर्तनाचा उलगडा समक्षासमक्ष करून घ्यावा, म्हणून मुद्दाम पचमढीहून इथं आलों मी. काल दुपारीं मला तार मिळाली. मी तसाच निघालों. इथं आल्यावर प्रथम सर्व अटक झालेल्या कामगारांना सोडण्याचा हुकूम दिला आणि फक्त तुम्हा दोघांना बंध-मुक्त केल्यावर माझ्याकडे पाठवायला सांगितलं. माफ करा हं, तुम्हांला सुटल्याबरोबर स्वतःच्या घरीं जाऊं न देतां इथं येण्याची तसदी दिल्याबद्दल—"

"आपण खरोखरीच आपल्या सौजन्यानं लाजवलंय आम्हांला—"

"पण माझ्या सौजन्याचा परिणाम फक्त तेवढ्या वेळेपुरता होऊं नये एवढीच इच्छा आहे माझी! मला प्रथम हें सांगा कीं, असेंब्ली हॉलसमोर भरलेल्या सभेंत मला भरपूर सवड देण्याचं तुम्ही कबूल केलं असतां हा संप एकाएकीं का सुरू करण्यांत आला?"

"संप सुरू करूं नये, अशाच मताचा मी होतों; व तसं मी कार्यकारिणीच्या सभेंत स्पष्ट सांगितलंहि. हे शेळके साक्ष आहेत त्या प्रकाराला—"

"मग संपाचा पुढाकार तुम्ही का घेतलात?—"

"बहुमतानं जो निर्णय दिला, तो अमलांत आणणं हें कामगार-संघाचा अध्यक्ष या नात्यानं माझं कर्तव्य होतं म्हणून—"

"पण हा निर्णय तुमच्या विवेकबुद्धीला मान्य नव्हता ना?—"

"हो—"

"मग संपाचा पुढाकार घेण्याऐवजीं संघाच्या अध्यक्षपदाचा राजीनामा का दिला नाहींत तुम्ही?—"

"या वेळीं मी राजीनामा दिल्यानं माझ्यावर भित्रेपणाचा आरोप आला असता; माझ्या आजपर्यंतच्या सगळ्या कामावर पाणी पडलं असतं!—"

"तो भित्रेपणाचा आरोप या वेळीं आनंदानं पत्करण्यांतच खरं शौर्य नव्हतं का, विठोबाजी? आपल्या अशिक्षित न् असंघटित देशांत 'बहुमत' या शब्दाला फारसा अर्थ नाहीं. बहुमत निर्माण करतां येतं आणि विकतहि घेतां येतं. म्हणून आपल्या सदसद्विवेक बुद्धीला ज्या वेळीं बहुमताचा निर्णय पटत नाहीं, त्या वेळीं अधिकारपदाचा त्याग करून बाजूला होणं हेंच प्रामाणिकपणाचं आणि शौर्याचं नाहीं कां? बहुमताचा निर्णय आणि स्वतःची मनोदेवता यांच्यांत ज्या वेळीं वाद उत्पन्न होतो, तेव्हां महात्माजी कसे मनःपूत वागतात, हें आपण अनेकदां पाह्यलंय! मला वाटतं, स्वतः जाहीर रीतीनें दिलेला शब्द बहुमताच्या लहरीखातर मोडून संपाचा पुढाकार घेण्यापेक्षां तुम्ही जर कामगार-संघाच्या अध्यक्षपदाचा राजीनामा देऊन त्यामुळं होणारी नाचक्की धैर्यानं पत्करली असतीत, तर तुमच्याविषयींचा विचारी लोकांचा आदर तरी खास वाढला असता! तुमचं तें वर्तन जास्त शूरपणाचं आणि सच्चेपणाचं झालं असतं--"

विठोबानें मान खालीं घातली. क्षणार्ध कोणीच कांहीं बोललें नाहीं. नंतर प्रियदर्शन म्हणाला—

मला हा संप हें खरोखरी कोडं आहे एक; न् तें तुमच्या मदतीनं सोडवून घ्यावं म्हणून मी मुद्दाम नागपूरला आलों--"

"तें कोडं कठीण नाहीं उलगडायला, साहेब!"

इतका वेळ गप्प असलेले शेळके मध्येंच उद्गारले.

"मी समजलों नाहीं तुमच्या बोलण्याचा अर्थ --"

"माझ्या बोलण्याचा अर्थ उघड आहे. हा संप आपल्या एका सहकाऱ्याच्या प्रेरणेनं, त्याच्या मदतीच्या जोरावर घडवून आणण्यांत आला आहे. आपले एक स्नेही मुरलिमोहनजी यांना जर आपण विश्वासांत घेऊं शकलांत, तर या संपाची सारी अंतर्गत माहिती मिळेल आपल्याला--"

"तुम्ही स्पष्ट बोला, शेळके! माझ्या कोणत्या सहकाऱ्याच्या रणेनं हें सारं घडलं ?—"

"आपल्याला कल्पना असली पाहिजे, साहेब! आमच्यासारख्या रीब माणसांनीं असल्या गोष्टी बोलणं म्हणजे स्वतःच्या हातांनीं स्वतःचा ळा कापून घेणं आहे! उद्योगमंत्र्यांची फूस आहे या संपाला--"

"तुम्ही हें लेखी द्यायला तयार आहांत ?--"

"हो. पण माझ्यापेक्षां या प्रकाराची जास्त अधिकृत माहिती ापले स्नेही मुरलिमोहनजी देऊं शकतील आपल्याला--"

"तें पहातों मी! तुम्ही जें कांहीं तुम्हाला लेखी देतां येण्या-ारखं असेल, तें लिहून द्या आधीं! विठोबाजी, तुम्हाला कल्पना ोती या बनावाची ?—"

"फारशी नाहीं. माझे एक सहकारी काळे—"

"मध्यंतरीं उमरेडला किसान सत्याग्रहाची तयारी करायला ोले होते ते ?--"

"हो. त्यांच्या तोंडून असं कांहीं तरी ओझरतं कानावर आलं ोतं माझ्या--

"मग तुम्ही लेखी बयाण द्याल तसं ?--"

"हो. तेवढं लिहून द्यायला हरकत दिसत नाहीं मला--"

प्रियदर्शननें लगेच दोघांच्याहि पुढें दोन फुलस्केप कागद आणि ्तर लेखनसाहित्य ठेवलें.

त्यांनीं मुकाट्यानें लिहावयाला सुरवात केली.

ते लिहित असतां त्यानें घंटी वाजविली; व चपराशाला चहा आणावयाला सांगितलें.

त्यांचें लिहिणें संपतें न संपतें, तोंच चहा आला.

प्रियदर्शननें ते दोन्ही कागद काळजीपूर्वक वाचून आपल्या टेबलाच्या खणांत ठेवले.

नंतर कपांत चहा ओतीत तो त्या दोघांना म्हणाला, "हीं बिस्किटें पहा कशीं लागतात तीं. शिंदीच्या गुळाचीं केलेलीं आहेत हीं. वर्ध्याहून मुद्दाम आणवलीं आहेत मी. तिथल्या ग्रामोद्योगाच्या कार्यकर्त्यांनीं तयार केलीं आहेत——"

त्यानें चहाचे कप त्या दोघांच्या पुढें ठेवले; व पुन्हा बोलावयाला सुरवात केली.

"संप कसाहि घडून आलेला असो. तो बंद करण्याच्या निश्चयानं मी आलेलों आहे; व तुमचं दोघांचंहि साह्य त्या कामीं मला मिळालं पाहिजे. मी दुपारीं वर्ध्याला जातोंय. तिथून संध्याकाळीं सातपर्यंत परत येईन. तुम्ही आज रात्रीं चिटणीस पार्कांत कामगारांची सभा बोलवा. मला जें सांगायचं, तें मी स्पष्टच सांगेन कामगारांना—"

"आमची एकच सूचना आहे—"

"कोणती?"

"या संपांत सामील झाल्याबद्दल कोणत्याही कामगाराला कामावरून काढण्यांत येऊं नये किंवा इतर कांहीं त्रास दिला जाऊं नये——"

"तें मी आतांच बोलणार आहे मॅनेजरशीं फोनवर! पण संपाचा एक दिवसाचा पगार मिळणं मात्र शक्य नाहीं. मी स्वतःच तसं स्पष्ट सांगेन कामगारांना——"

"आपण स्वत: ताबडतोब इथं आलांत आणि अटक झालेल्या लोकांना आल्याबरोबर सोडलंत याचा फार चांगला परिणाम होईल कामगारांच्या मनावर——"

"मला तो परिणाम तेव्हांच खरोखरी झाल्यासारखा वाटेल कीं, जव्हां आजच्या सभेंत संप परत घेण्याचा ठराव मंजूर होईल——"

विठोबा कांहीं बोलला नाहीं.

"का ? तुम्हाला खात्री वाटत नाहीं ?--"

"आपल्या सौजन्याच्या आणि वक्तृत्वाच्या प्रभावाची जाणीव आहे मला. पण आमच्या संघाच्या कार्यकारिणींत तसा ठराव मंजूर होणं ही एक निराळीच गोष्ट आहे—"

"तुम्ही हा इषारा मला दिलात हें ठीक झालं. मी सभेंत जें बोलायचं तें या सगळ्या गोष्टी लक्षांत घेऊन बोलेन. खरोखरी तुमच्या दोघांच्या या प्रांजळ मदतीबद्दल मला आभार मानले पाहिजेत तुमचे-"

त्यानें घंटा वाजविली.

चपराशानें आंत येऊन विड्याचें तबक ठेवलें आणि चहाचा ट्रे उचलला.

"मघाशीं ज्या मोटारीनं तुम्ही आलांत, ती मोटार पोंचवून देईल तुम्हाला घरीं—"

त्यानें नमस्कार करीत म्हटलें.

ते दोघे बाहेर येऊन मोटारींत बसले.

त्या अनपेक्षित प्रकारानें दोघांचींहि मनें गोंधळून गेलीं होतीं.

आपण कोणत्या भावनेच्या आहारीं जाऊन काळ्यांनीं इतक्या विश्वासानें आपल्याला सांगितलेल्या गोष्टी मुख्य प्रधानांजवळ बोलून गेलों, याचा शेळके आतां साश्चर्य विचार करीत होते; व मुख्य प्रधानांनीं जीं लेखी बयाणें आपल्याकडून घेतलीं त्यांचा उपयोग ते काय करतील, हा प्रश्न विठोबाच्या मनांत घोळत होता.

शेळके गणेश पेठेंतल्या आपल्या घराजवळ उतरले व मोटार टेळक पुतळ्याकडून वॉकर रोडकडे वळली.

विठोबाचे डोळे आतां घराकडे लागले.

तो काल घरांतून बाहेर पडल्याला अद्याप पुरते तीस तासहि झा नव्हते. पण, राधाबाईला आपण कोणत्या स्थितींत सोडून आलों याच जाणिवेनें ते उणेपुरे तीस तास त्याला आतां युगांसारखे वाटत होते.

मोटार घरासमोर येतांच तो लगबगीनें खालीं उतरला. बरो आलेल्या जमादाराला निरोप देण्याचेंहि भान त्याला उरलें ना त्यानें एकदम हांका मारावयाला सुरवात केली.

"वशा, वशा! किशे, किशे!--"

त्या दुसऱ्या हांकेबरोबर कृष्णा धांवतच बाहेर आली.

बापाला पहातांच ती एकदम थबकली.

तिच्या तोंडून शब्द निघेना; डोळ्यांतून अश्रु येईना.

तिची ती स्तब्धता, तिच्या दृष्टींतली ती शून्यता!--विठोबा कळेना, ती अशी का वागते आहे--

आणि त्यानें गोंधळून विचारलें,--

"कां ग, वशा कुठं आहे?--"

"दादा तुम्हांला भेटायला आतांच तुरुंगाकडे गेला--"

विठोबानें आवंढा गिळला आणि विचारलें--

"आणि तुझी आई? बरं आहे ना तिचं आतां?--"

"आई? आई सोडून गेली काल सकाळीं आम्हांला!--"

तिनें अगदीं शांतपणानें उत्तर दिलें.

# न पटलेला सौदा

" प्रियदर्शन, मी अभिनंदन करतों तुझं आजची सभा जिंकून कामगारांना कोणतंच आश्वासन न देतां संप थांबविल्याबद्दल!—"

" फार आभारी आहे तुझा मी, मोहन ! तूं माझं अभिनंदन करावंस हें खरोखरी सुदैव आहे माझं—"

प्रियदर्शननें ट्रेमधील कॉफीचा कप त्याच्यापुढें ठेवीत म्हटलें.

मोहननें हातांतली सिगारेट रक्षापात्रांत टाकली आणि कॉफीचा कप उचलीत म्हटलें—

" मी समजलों नाहीं तुझ्या बोलण्याचा अर्थ ?—"

" मला असं खात्रीलायक समजलं आहे कीं, हा संप घडवून आणण्यांत तुझं अंग होतं. म्हणून तुझ्या अभिनंदनाची किंमत जास्त !—"

" असले आरोप करण्यासाठींच का तूं एवढया रात्रीं मोटार पाठवून मला बोलावून आणलंस इथं ? तरी म्हटलं मुख्य प्रधानांना

आजच आपल्या एका जुन्या गरीब स्नेह्याच्या प्रेमाचा एवढा पुळका का आला ?–"

मोहननें हातांतला कॉफीचा कप रागानें खालीं ठेवीत म्हटलें.

आपल्या मनाचा क्षोभ प्रियदर्शनच्या लक्षांत येऊं नये म्हणूनच कीं काय तो मुकाट्यानें उठून कोंपऱ्यातल्या छोट्या टेबलाजवळ गेला आणि त्यावर ठेवलेल्या पेटींतला लांबलचक चिरूट काढून तो त्यानें पेटवला.

त्याची ती चलबिचल पाहून प्रियदर्शनच्या शांत मुद्रेवर स्मिताची रेषा उमटली. पण तो आपल्यासमोर येऊन बसतांच प्रियदर्शननें अगदीं निर्विकार चेहऱ्यानें त्याला म्हटलें,––

"रागावूं नकोस तूं, मोहन! मला जें कळलं, तें मी स्पष्ट सांगून टाकलं तुला. आणि खरोखरी स्वतःच्या मनांतला किंतु काढून टाकावा म्हणूनच तुला आणण्यासाठीं मुद्दाम मोटार पाठविली मी सभेहून परत आल्याबरोबर! हा संप घडवून आणण्यांत तुझा हात असल्याचं मी जेव्हां प्रथम ऐकलं, तेव्हां माझासुद्धां विश्वास बसेना त्या माहितीवर–"

"म्हणजे आतां विश्वास बसला आहे असाच अर्थ ना तुझ्या म्हणण्याचा ? प्रियदर्शन, कोणी पुरवली ही माहिती तुला ?––"

"तें काय करायचंय तुला कळून ?––"

"सी. आय. डी. कडून मिळालेली दिसते ?––"

"नाहीं. सी. आय. डी. कडून तुझ्याबद्दल माझ्याकडे माहिती आली आहे, पण ती निराळ्या प्रकरणाबद्दल! या माहितीचा सी. आय. डी. शीं कांहीं संबंध नाहीं––"

"म्हणजे माझ्यावर किती आरोप करणार आहेस तूं आज ?––"

"तुझ्यावर कोणताच आरोप करण्याची इच्छा नाहीं माझी, मोहन! पण तूं माझा जुना मित्र, एका काळचे सहकारी आपण. म्हणून तुझ्याबद्दल ज्या हकिकती माझ्या कानांवर आल्या, त्यांचा समक्ष शहानिशा करून घ्यावा एवढाच फक्त उद्देश आहे माझा! तुझ्याविरुद्ध

सध्यां पुष्कळ पुरावा आहे माझ्यापुढं. पण तुझी बाजू तुझ्या तोंडून ऐकून घेतल्याशिवाय या बाबतींत कांहीं करायचं नाहीं असं ठरवलंय मी. ती कळणं हें सर्वस्वीं तुझ्या प्रांजळपणावर अवलंबून आहे आतां--"

"आणि, समज, मी कांहीं बोललों नाहीं तर ?—"

"तर मला दोष द्यायला जागा रहाणार नाहीं तुला त्या पुराव्यावर विश्वास टाकल्याबद्दल—"

प्रियदर्शननें अगदीं शांतपणानें उत्तर दिलें; व समोर बसलेल्या मोहनकडे न्याहाळून पाहिलें.

त्याचें कपाळ घामानें डबडबलें होतें.

त्याच्या डोळ्यांचा संकोच आणि ओठांचा कंप दिव्याच्या झगझगीत प्रकाशांत त्याचा मनःक्षोभ स्पष्ट दर्शवीत होता.

तोंडांतला चिरूट काढून त्यानें तो रक्षापात्रांत टाकला आणि प्रियदर्शनकडे पाहून विचारलें--

"तुझ्या जवळचा पुरावा दाखवशील तूं मला ?—"

"नाहीं- -"

"मग मी माझी बाजू कशी मांडूं तुझ्यापुढं ?--"

"मी पुरावा न दाखवतां त्यांतून निघणारे निष्कर्ष तुला सांगूं शकतों. त्यावरलं तुझं म्हणणं ऐकून मला मत बनवतां येईल माझं--"

"बरं, सांग तूं तुला काय कळलंय तें--"

"मला असं खात्रीलायक समजलंय कीं, माझ्या सहकाऱ्यांपैकीं एकाच्या प्रेरणेनं तूं हा संप घडवून आणण्यासाठीं खटपट केलीस--"

"संपलं ?--"

मोहननें उपरोधिक हंसण्याचा प्रयत्न करून विचारलें.

"हो—"

प्रियदर्शन त्याच्या नजरेला नजर देऊन म्हणाला.

मोहननें सिगारेट पेटवली आणि तिचा झुरका घेऊन विचारलें--

"माझ्याबरोबर तूं आपल्या एका सहकाऱ्यावरहि संप घडवून आणण्याचा आरोप करतो आहेस, याची जाणीव आहे ना तुला?--"

"हो. पण तुझ्यापुरतं तर तूं या प्रश्नाचं उत्तर दे मला--"

"अर्थात् हा प्रश्न माझ्यापुरता मर्यादित नाहीं आणि याचं उत्तर देऊन मी दुसऱ्या एका व्यक्तीच्या वर्तनाबद्दल कोणतंहि विधान करणं योग्य होणार नाहीं--"

"पण तुझा जर संपाशीं खरोखरीच कांहीं संबंध नसेल, तर तसं स्पष्ट सांगून मोकळा का होत नाहींस तूं?—"

"तुझा विश्वास बसेल, मी तसं सांगितलं तर त्याच्यावर? तुझ्याजवळचा पुरावा काय आहे हें जोंपर्यंत मला माहित नाहीं, तोंपर्यंत मी कांहींहि बोललों तरी त्याचा काय उपयोग आहे?--"

"माझं विधान अगदीं स्पष्ट आहे. त्यावर तुला काय म्हणायचं असेल, तें म्हणूं शकतोस तूं स्पष्टपणानं--"

"ठीक! मग मी एवढंच म्हणतों कीं, हा आरोप निखालस खोटा आहे—"

प्रियदर्शन यावर कांहींच बोलला नाहीं.

तेव्हां सिगारेटचे आणखी दोन तीन झुरके घेऊन मोहननें विचारलें—

"सी.आय.डी.नं माझ्याविरुद्ध काय माहिती दिली आहे तुला?—"

"माझ्या पहिल्या विधानाचं सरळ उत्तर मिळाल्याशिवाय मी जास्त बोलायला तयार नाहीं, मोहन!—"

"मग जाऊं मी घरीं?--"

मोहननें एकदम खुर्चीवरून उठून विचारलें.

"हो. मी पोंचवून देण्याची व्यवस्था करतों तुला!—"

प्रियदर्शनचा हात टेबलावरील घंटेकडे गेला.

त्याबरोबर तो हात आपल्या हातांत धरून मोहननें विचारलें,

"प्रियदर्शन, तूं माझा शत्रु आहेस कीं मित्र?--"

" तोच प्रश्न मी तुलाहि विचारूं शकतों, मोहन!"

त्याच्या हातांतून आपला हात सोडवून घेत प्रियदर्शन उद्गारला.

जाण्याच्या आविर्भावानें उठलेला मोहन आतां पुन्हा खुर्चीवर बसला होता. त्यानें आवंढा गिळून प्रियदर्शनला म्हटलें—

"समज, मी तुझा पहिला आरोप कबूल करतों. मग तरी सांगशील का तूं मला सी. आय. डी.नें तुला काय माहिती पुरवली आहे ती?—"

"हें पहा मोहन, मी कोणतीहि गोष्ट समजून चालायला तयार नाहीं. तुला जर आरोप मान्य असेल, तर तशी स्पष्ट कबुली तूं दिली पाहिजेस––"

"बरं, तुझा पहिला आरोप कबूल आहे मला! आतां तरी कळूं द्यात एकदां सी. आय. डी.चे माझ्याविरुद्ध काय काय आरोप आहेत ते–'

"सी.आय.डी.चा तुझ्याविरुद्ध असा आरोप आहे कीं, सदरमध्यें मुंबईहून आणलेल्या एका फ्रेंच बाईच्या घरीं क्लबच्या रूपानें जुगाराचा अड्डा आणि वेश्यागृह चालवीत होतास तूं—"

" मग पोलिसांनीं कारवाई का नाहीं केली माझ्याविरुद्ध? ती तर त्यांच्या हातची गोष्ट होती––"

" खरं आहे तुझं म्हणणं! त्यांना संशय आला आणि त्यांनीं छापाहि घातला. पण त्या छाप्याच्या वेळीं तूं आणि ती बाई दोघंहि न सांपडल्यामुळं त्यांना कांहीं करतां आलं नाहीं––"

" याचा अर्थ असा कीं, त्यांच्याजवळ माझ्याविरुद्ध तसा कांहीं पुरावा नाहीं––"

मोहननें हंसून म्हटलें.

" पुरावा नसता, तर कशाला बोललों असतों मी हें सगळं तुझ्याजवळ? तूं त्या बाईला कराराप्रमाणं पैसे न दिल्याबद्दल मजजवळ लेखी तक्रार आहे तिची; न् तींत तिनं नागपुरांतल्या आपल्या गेल्या

तीन महिन्यांच्या मुक्कामाची हकीकत आपल्या क्लबाच्या आश्रयदात्यांच्या यादीसह दिली आहे--"

"खोटी गोष्ट! ती माझ्याविरुद्ध असली तक्रार कधीं करणार नाहीं--"

"मोहन, तूं डोकं जरा शांत ठेवून वाग! तूं त्या बाईला दीड हजार रुपये देणं आहेस कीं नाहीं? शेठ गुलाबचंद आणि पंडित वाजपेयी यांनीं तिला तुझ्या नांवानं दिलेले शंभर शंभर रुपयांचे चेक तूं स्वतःच मधल्या मध्यें दडपलेस कीं नाहीं? तिचा सगळा पैशाचा व्यवहार तुझ्या मार्फत चालला होता कीं नाहीं?—"

मोहन अगदीं स्तब्ध होता.

"माफ कर! मी थोडं आणखी स्पष्ट बोलतों. तूं जी नवी लिमिटेड कंपनी काढली आहेस, तिनं किती खोटे व्यवहार केले आहेत आजपर्यंत? त्या कंपनीविरुद्ध पोलिसकडे तक्रारअर्ज गेले आहेत हें माहित आहे तुला?—"

मोहन एकदम खुर्चीवरून उठला आणि उद्गारला--

"मला जास्त कांहीं ऐकण्याची इच्छा नाहीं, प्रियदर्शन! तूं मला तुरुंगांत घालणार आहेस एवढंच सांगायचं शिल्लक उरलंय आतां!—"

"तुला तुरुंगांत घालायची इच्छा जर मला खरोखरीच असती, तर मी यापूर्वींच घालूं शकलों असतों! पण, मोहन, मी जरी कदाचित् तुला तुरुंगांत घातलं नाहीं, तरी ईश्वरदासजी तुला तुरुंगांत घातल्याशिवाय रहातील का? तूं केलेली पैशाची अफरातफर किती दिवस लपून रहाणार आहे?--"

मोहनच्या दोन्ही कानशिलांवरून घामाचे ओघळ वहात होते; व त्याच्या घशाला कोरड पडली होती. तो किंचित् घोगऱ्या आवाजांत म्हणाला--

"हेंच सांगण्यासाठीं तूं एवढया रात्रीं मला इथं आणलंस का प्रियदर्शन ?––"

"नाहीं. माझी इच्छा तुला सावध करायची होती आणि संपाच्या बाबतींतलं तुझं म्हणणं समजून घ्यायचं होतं––"

"मग दोन्ही कार्यभाग झाले तुझे !––"

"नाहीं. संपाच्या बाबतींत तूं फक्त आरोप कबूल केलास. पण जो प्रकार खरोखरी घडला आहे, तो कांहीं तूं सांगितला नाहींस मला. मजजवळ त्या बाबतींतील दोन लेखी बयाणं आहेत आणि––"

"मीहि लेखी कबुलीजबाब द्यावा अशी अपेक्षा आहे तुझी ?––"

"मला कबुलीजबाब म्हणून नको. जें काय खरोखरी घडलं असेल, तें लेखी दे तूं––"

मोहन कांहीं वेळ अगदीं स्तब्ध होता.

प्रियदर्शनची दृष्टि आपल्यावर रोखलेली आहे याची त्याला जाणीव होती.

"समज, मी जर तुला तुझ्या इच्छेप्रमाणं लेखी बयाण दिलं, तर तूं मला काय देशील ?––"

"मी सौदा करायसाठीं नाहीं आणलं तुला इथं, मोहन !––"

"पण राजकारण हा एक सौदाच आहे, प्रियदर्शन ! हें तत्त्व तूं ओळखीत नसल्यामुळंच तुला राज्यकारभार चालवणं कठीण होतं आहे दिवसेंदिवस ! तूं अद्याप लोकप्रिय आहेस हें खरं. पण कांग्रेस संस्थेंतील ज्या माणसांच्या पाठिंब्यावर तुझं राजकारणांतलं स्थान अवलंबून आहे, त्या माणसांना तूं किती नाराज केलं आहेस याची कल्पना नाहीं तुला ! सत्ता ही उपभोगासाठीं असते; व सत्तेच्या उपभोगांत जितक्या जास्त माणसांना आपण सामील करून घेतों, तितकी आपली सत्ता बळकट होते. ज्यांच्या पाठिंब्याच्या जोरावर आपण सत्ता संपादन करितों, त्यांना जर

त्या सत्तेचे फायदे आपण घेऊं दिले नाहींत, तर ते आपले शत्रु बनतात आणि मग आपला अधःपात व्हायला वेळ लागत नाहीं—"

"कुठं शिकलास तूं हें तत्त्वज्ञान, मोहन?—"

"कांग्रेसमध्येंच! खुद्द बापूंचंच उदाहरण घे तूं! ज्या माणसांच्या साह्यावर ते अवलंबून असतात त्यांना कधींहि ते उघडे पडूं देत नाहींत! राजाजींच्या प्रत्येक कृत्याचा ते कसा पाठपुरावा करीत असतात, पहा! त्यांना जो मनुष्य आपला आहे असं वाटतं, त्याच्यासाठीं ते वाटेल ती गोष्ट करतात—"

मोहननें आवेशानें उच्चारलेलें तें वाक्य ऐकतांच प्रियदर्शनच्या डोळ्यांसमोर दुपारीं शेगांवला घडलेला तो प्रकार उभा राहिला.

गांधीजींना त्यानें आपल्या सर्व अडचणी स्पष्टपणें सांगितल्या; मंत्रिमंडळांतील आपल्या हिंदी सहकाऱ्यांच्या आडमुठ्या वर्तनाचीहि कांहीं उदाहरणें त्यानें दिलीं; व शेवटीं या सगळ्या परिस्थितींतून मार्ग काढण्यासंबंधीं त्यांना सल्ला विचारला.

गांधीजींनीं त्याचें सर्व बोलणें शांतपणानें ऐकून घेतलें. कांहीं वेळ ते स्तब्ध होते. शेवटीं ते उद्गारले—

"मी तुला कांहींहि सल्ला देऊं शकत नाहीं. तूं आपल्या अडचणी वाटल्यास पार्लमेंटरी कमिटीपुढं ठेव—"

गांधीजींकडे आपण प्रकाशाच्या अपेक्षेनं गेलों. पण त्यांच्या त्या उत्तरानें आपल्या मार्गावरील अंधार अधिकच गडद, अधिकच भयानक झाला.

अलिकडे कांहीं वर्षें गांधीजी या प्रान्तांत राहत आहेत. हिंदी आणि मराठी जिल्हे एका ठिकाणीं कोंबल्यामुळें जें वितुष्ट या प्रांतांत सारखें चालू आहे, त्याची कांहींच माहिती त्यांना नसेल काय? कमी उत्पन्नाच्या दरिद्री महाकोसलसाठीं जास्त उत्पन्नाच्या संपन्न महा-

विदर्भाला पन्नास लाख रुपयांची घस वर्षानुवर्षे सोसावी लागल्यामुळें जें वैमनस्य त्यांच्यांत सतत धुमसत आहे, त्याची कांहींच जाणीव त्यांना नसेल का? उत्पन्न अगदीं कमी असूनसुद्धां केवळ लोकसंख्येच्या आधिक्याच्या जोरावर जें राजकीय वर्चस्व महाकोसल महाविदर्भावर आज गाजवीत आहे, त्याबद्दल मराठी जनतेला वाटत असलेल्या वैषम्याची कांहींच कल्पना त्यांना नसेल का? हिंदुस्थानांतल्या इतर कोणत्याहि प्रांतांत कधीं घडले नसतील असे दिवाणगिऱ्यांच्या घडामोडीचे जे डोंबारी खेळ या प्रांतांत आजवर सारखे चालू होते, त्यांची कांहींच हकीकत त्यांच्या कानांवर कधीं गेली नसेल का? वऱ्हाड–मध्यप्रांताच्या राजकारणांत जें विलक्षण, उत्पातकारक अस्थैर्य दृष्टीस पडतें, त्याला फ्रेंच राजकारणांतील अस्थैर्याचीच उपमा खरोखरी शोभेल. आजपर्यंत कोणताहि एक पक्ष या प्रांतांत फार काळ प्रभुत्वानें नांदूं शकला नाहीं; व अखिल हिंदुस्थानाच्या राजकारणांत फूट पाडावयालाहि येथील व्यक्तिगत आणि प्रांतगत भांडणें कारण झालीं. कॉंग्रेससारख्या तत्वनिष्ठ आणि सुसंघटित पक्षाच्या हातीं राज्यसूत्रें आल्यावर तरी या प्रांताच्या राजकारणाला स्थैर्य येईल आणि प्रगतीच्या मार्गावर त्याचें पाऊल झपाट्यानें पडेल, अशी आशा वाटत होती. पण, कॉंग्रेस पक्षांतहि तेच जुने हेवेदावे, एकमेकांना पदच्युत करण्याची तीच जुनी प्रवृत्ति, गेल्या दहा महिन्यांत अनुभवाला आली. ही परिस्थिति गांधीजींना काय दिसत नसेल? पण या परिस्थितींतून मार्ग काढण्यासाठीं त्यांचा सल्ला घ्यावयाला आपण गेलों आणि त्यांनीं आपल्याला मार्ग दाखविण्याचें नाकारलें!

राजाजींच्या कोणत्याहि कृत्याचें समर्थन जे गांधीजी करतात, त्यांनीं आपल्याला सल्ला देण्याचें का नाकारावें? मी 'त्यांचा माणूस' नाहीं, अशी तर त्यांची भावना नसेल?

त्याला एकदम आठवण झाली.

असेंब्लीच्या पहिल्या बैठकीच्या पूर्वी आपण महात्माजींचा सल्ला

घ्यावयाला गेलों होतों. त्या वेळीं दारूबंदीच्या कार्यक्रमापेक्षां शेतसारा कमी करण्याचा प्रश्न अधिक महत्वाचा आहे असें जेव्हां आपण त्यांना म्हटलें, तेव्हां त्यांचा तो प्रसन्न चेहरा क्षणार्ध किती गंभीर झाला! त्यानंतर त्यांनीं आपल्या स्मितयुक्त मधुर वाणीनें कॉंग्रेसची नैतिक भूमिका विशद करून दारूबंदीच्या कार्यक्रमाची आवश्यकता आपल्या गळीं उतरवली, हें खरें. पण राज्यकारभाराच्या धोरणासंबंधींच्या आपल्या आणि त्यांच्या कल्पना आमूलाग्र भिन्न असल्याची जी जाणीव त्या चर्चेच्या वेळीं त्यांना तीव्रतेनें झाली, तिचा परिणाम त्यांच्या वर्तनावर झाल्याशिवाय राहिला नाहीं. तेव्हांपासून वर्किंग कमिटीच्या आणि कॉंग्रेसच्या निमित्तानें आपण ज्या ज्या वेळीं त्यांना भेटलों, त्या त्या वेळीं त्यांच्या वागण्यांत पूर्वीचा जिव्हाळा आढळला नाहीं--निदान आपल्याला तरी तसा भास झाला. विशेषतः हरिपुरा कॉंग्रेसच्या वेळीं शाळाकॉलेजांतून निशाणबाजीचें शिक्षण सुरू करण्याची आपली योजना जेव्हां आपण त्यांना सांगितली, तेव्हां आपल्या अपेक्षेप्रमाणें त्यांनीं कांहीं आपलें अभिनंदन केलें नाहीं.

आणि आज?

आज तर ते आपल्याशीं एकाद्या तिऱ्हाइताप्रमाणें वागले. "पचमढीहून मुद्दाम मला भेटायला का आलास?" असा प्रश्न त्यांनीं आपल्याला जातांक्षणींच विचारला. तेव्हां आपण आपल्या सगळ्या अडचणी त्यांच्यापुढें अगदीं मोकळ्या मनानें मांडल्या. संपाची प्रथमपासूनची हकीकत आणि जीवनवेतनाच्या बिलाची आपली योजना आपण त्यांना सांगितली; व शेवटीं त्या योजनेला पंडितजींचा विरोध असल्याचें जेव्हां आपण बोललों, तेव्हां फक्त एकच वाक्य त्यांच्या तोंडून अचानक बाहेर पडलें--

"मुख्य प्रधानाला आपल्या सहकाऱ्यांचा विश्वास संपादन करतां आला पाहिजे, प्रियदर्शन!—"

एकच वाक्य. पण किती अर्थपूर्ण होतें तें!

त्यांनीं तें वाक्य उच्चारतांच आपल्याला राहवलें नाहीं. आणि आपल्या हिंदी सहकाऱ्यांकडून आपल्याला होत असलेल्या उपद्रवाची कल्पना आपण त्यांना दिली.

त्यांनीं ती शांतपणानें ऐकून घेतली. पण आपल्याला कांहींहि सल्ला देण्याचें मात्र नाकारलें.

तरीहि आपण धीर सोडला नाहीं.

आणि, ज्या एका महत्त्वाच्या योजनेसंबंधीं त्यांचा आज सल्ला घेण्याचें आपण ठरविलें होतें, ती योजना त्यांना निरुत्साह न होतां सादर केली.

आपल्या हातीं राज्यसूत्रें आल्यावर चार महिन्यांनीं विजयादशमीस जबलपूर येथें हिंदुमुसलमानांचा मोठा दंगा झाला; व मंडला, सागर, अकोला आणि नागपूर या शहरांतहि थोडीबहुत धामधूम झाली. या दंग्याची चौकशी करीत असतांना, पोलिसांच्या जोरावर जरी दंगा शमवितां आला, तरी त्याचा कायमचा बीमोड या मार्गानें होऊं शकत नाहीं आणि दंग्याच्या वेळीं पोलिसांची कुमकहि अनेक दृष्टींनीं अपुरी पडते, असें आपल्या अनुभवाला आलें. म्हणून आपण स्थानिक संस्था आणि स्थानिक अधिकारी यांच्या संयुक्त नेतृत्वाखालीं प्रांतभर नागरिक संरक्षकदलें (Civic Guards) स्थापन करण्याची योजना तयार केली. ती योजना महात्माजींना दाखवून प्रथम त्यांची संमति घ्यावी आणि नंतर बिल तयार करून तें असेंब्लींत आणावें, असा आपला बेत होता.

ती योजना जेव्हां आपण त्यांना समजावून सांगितली, तेव्हा त्यांनीं शांतपणानें आपल्याला विचारलें, "गणेश शंकर विद्यार्थीजींच्या वीरमरणाची हकीकत माहित आहे ना तुला?—"

"हो—"

"तशा प्रकारच्या शांतिवीरांचीं दलें जागोजाग स्थापन झालीं पाहिजेत! हिंदु–मुस्लिन दंग्यांचा बीमोड व्हायला विद्यार्थीजींसारख्या हुतात्म्यांच्या आत्मयज्ञाचा प्रभाव उपयोगी पडेल. ही सिव्हिक गार्डची योजना कितपत काम देईल याबद्दल जबर शंका वाटते मला!—"

एवढें बोलून ते थांबले आणि त्यानंतर अगदीं मुग्ध होते.

आपण निरोप घेतांना पुन्हा एकवार त्यांना म्हटलें, "आपण कांहीं तरी सल्ला मला द्यावा आणि या साऱ्या अडचणींतून बाहेर पडण्याचा मार्ग दाखवावा अशा अपेक्षेनं आज आलों होतों मी—"

त्याबरोबर—

"असल्या बाबतींत मार्ग दाखविण्याचा अधिकार माझा नाहीं. तूं पार्लमेंटरी कमिटीकडे जा!—"

—असें उत्तर त्यांनीं हंसत हंसत आपल्याला दिलें.

थंडीनें गारठलेल्या माणसावर पांढऱ्या शुभ्र बर्फाची वृष्टि व्हावी, तसें तें त्यांचें हास्य वाटलें आपल्याला!

मोहन म्हणाला तेंच खरें.

बापूंचा आपल्यावर पहिल्यासारखा लोभ, पहिल्यासारखा विश्वास नाहीं. 'हा आपला माणूस आहे' असें त्यांना पूर्वीप्रमाणें आपल्याविषयीं वाटत नाहीं. त्यामुळें, त्यांनीं कोणत्याहि प्रकारचा सल्ला न देतां, आज आपल्याला तिऱ्हाईतपणानें वाटेला लावलें.

पण आपल्या हातून अशी कोणती चूक घडली कीं, जिच्यामुळें त्यांचा आपल्यावरील विश्वास उडावा, लोभ कमी व्हावा?

आपल्या हातून चूक अशी कोणतीच झालेली नाहीं. फक्त आपण आपल्या बुद्धीला योग्य वाटेल तसें वागण्याचा प्रयत्न करीत आहोंत.

आणि इथेंच सगळें चुकलें.

कारण बापूंचा आणि आपला जीविताकडे, समाजरचनेकडे आणि राजकारणाकडे पहाण्याचा दृष्टिकोन अगदीं भिन्न आहे.

ते भूतदयावादी आहेत; आपण समाजवादी आहोंत. ते आपल्या तत्त्वज्ञानाचा एक प्रयोग म्हणून हिंदी राजकारणाकडे पहातात; आपण राष्ट्रहिताच्या व्यावहारिक दृष्टीनें राजकारणाकडे पहातों. त्यामुळें त्यांचा दारूबंदीचा नैतिक कार्यक्रम आपल्याला निकडीचा वाटत नाहीं आणि त्यांचा अहिंसेविषयींचा आग्रह तर आपल्याला सर्वथैव अनिष्ट वाटतो.

त्यांच्या आणि आपल्या दृष्टिकोनांत जें हें मूलगामी अंतर आहे, तें आपण राज्यकारभार हातीं घेतल्यापासून स्पष्ट आणि तीव्र होत चाललें आहे.

अर्थात् त्यांच्या दृष्टीनें मी आतां त्यांचा माणूस नाहीं. त्यांनीं मला सल्ला देण्याचें नाकारलें, तें या कारणामुळें तर नसेल ?

पण महात्माजींच्या ठिकाणीं हा पक्षपात, हा आपपरभाव संभवतो का ?

"हा माझा माणूस नव्हे, तेव्हां मी याला सल्ला देणार नाहीं आणि याची तरफदारीहि करणार नाहीं," असें एकाद्या व्यावहारिक मुत्सद्द्यानें म्हटलें, तर त्याला तें शोभून जाईल. पण महात्माजींच्या मनांत जर असा दुजाभाव येत असेल, तर त्यांच्यांत आणि इतर राजकारणी पुरुषांत फरक तो काय राहिला ? "माझ्या तंत्रानें अक्षरशः चालेल तो माझा माणूस आणि त्याचीच तेवढी मी तरफदारी करीन,' असें एकाद्या अहंकारी माणसानें खुशाल म्हणावें. पण जगाला अहिंसेचे आणि अनासक्तियोगाचे पाठ देणाऱ्या महात्म्याला ही वृत्ति कशी शोभेल ?

आणि बापू जर खरोखरीच इतके अहंकारी आणि पक्षपाती असतील, तर मग त्यांचा महात्मेपणा तो कुठें उरतो ?

पण हा विचार मनांत येतांच प्रियदर्शनला अगदीं कसेंसेंच वाटलें आणि तो एकदम भानावर आला.

मोहनची भेदक, जिज्ञासु दृष्टि आपल्या चिंतनमग्न चेहेऱ्यावर खिळलेली होती, हें लगेंच लक्षांत आलें त्याच्या.

तोंच मोहन हंसून त्याला म्हणाला, "कसला विचार करतो आहेस तूं, प्रियदर्शन ?—

"कसला नाहीं—"

त्यानें किंचित् वरमून उत्तर दिलें.

"तूं राजकारणांत अजून अगदीं कच्चा आहेस, प्रियदर्शन! नाहीं तर आपल्या हातीं आलेल्या सत्तेच्या जोरावर तूं आपलं राजकारणांतलं स्थान अढळ करून टाकलं असतंस! मग बोल, मी जर लेखी बयाण दिलं, तर तूं काय देशील मला? तुला कोणाविरुद्ध कोणत्या प्रकारचा पुरावा हवा आहे, हें माहित आहे मला; न् तसा पुरावा मी तुला हवा तितका देऊं शकेन. पण तूं मला भरपूर मोबदला दिला पाहिजेस—"

"कोणत्या प्रकारचा मोबदला हवा तुला, मोहन ?"

"माझी पहिली मागणी ही आहे कीं, आमच्या हिंदुस्थान लिमिटेड कंपनीच्या कारभारांत पोलिस हात घालणार नाहींत असं वचन तूं मला दिलं पाहिजेस. आणखी दुसरी मागणी अशी कीं, माझं कर्ज फेडायला तूं मला मदत केली पाहिजेस—"

"कर्ज? कुणाचं कर्ज आहे तुला?—"

"मला हिणवण्यासाठीं विचारतो आहेस तूं हा प्रश्न मला—"

"नाहीं रे. तुला कर्ज आहे हें आज प्रथमच ऐकतोंय मी! दरमहा चारपांचशें रुपये कमावणाऱ्या तुझ्यासारख्या हुषार माणसाला कर्ज आहे अशी कल्पना कशी येईल माझ्या मनांत ?—"

"त्या युरोपियन बाईचं मला किती देणं आहे हें माहितच आहे तुला! शिवाय आमच्या कंपनींतूनहि कांहीं रकम उचलली आहे मी!"

"अस्सं! किती रक्कम उचललीस तूं आतांपर्यंत?"

"माझं सगळं कर्ज दहा हजारांपर्यंत जाईल, प्रियदर्शन!—"

"एवढी रक्कम मी तुला कुठून देऊं मोहन?—"

"का बरं? तूं मुख्य प्रधान आहेस. रघूनं कुबेरावर स्वारी करण्याचं प्रस्थान ठेवतांच त्याच्या राजधानीवर सोन्याचा वर्षाव झाला.

तशी तूं नुसती इच्छा व्यक्त करतांच अनेक मार्गांनीं तेवढी रक्कम उभी होईल एका क्षणांत—"

मोहननें हंसून म्हटलें.

पण प्रियदर्शन अगदीं गंभीर होता.

त्यानें अगदीं शांतपणानें विचारलें—

"मग तुझ्या या दोन मागण्या कबूल केल्याशिवाय कांहीं तूं मला आपल्याजवळचा पुरावा देणार नाहीं म्हणतोस?—"

"हो. त्या पुराव्याचा मोबदला माझ्या पदरांत पडला पाहिजे. तो पुरावा किती बहुमोल आहे याची जाणीव तुला आहेच. नाहीं तर तूं एवढ्या रात्रीं आणला नसतास इथं मला आपल्या मोटारींतून!—"

प्रियदर्शन स्तब्ध होता.

मोहननें सिगारेट पेटवली आणि तिचा एक झुरका घेतला.

प्रियदर्शन उठून खोलींत फेऱ्या घालूं लागला.

त्याच्या त्या स्तब्धतेला कंटाळून अखेर मोहननें विचारलें, "मग काय ठरतंय तुझं? मला गेलं पाहिजे आतां—"

"खरंच बारा वाजायला आले कीं! माझं ठरलं नक्की—"

"काय ठरलं?—"

"मला तुझ्याशीं सौदा करणं शक्य नाहीं!—"

"का? मजजवळचा पुरावा तुला महत्त्वाचा वाटत नाहीं?—"

"नाहीं. तो पुरावा किती महत्वाचा आहे याची जाणीव आहे मला!"

"मग?—"

"तरीसुद्धां अशा प्रकारचा सौदा करणं हें माझ्या तत्त्वांना, सार्वजनिक चारित्र्याविषयींच्या माझ्या कल्पनांना धरून होणार नाहीं—"

त्यानें समोर उभे राहून संथपणानें उच्चारलेले ते शब्द ऐकून मोहन थिजल्यासारखा झाला. पण क्षणभरच. त्यानें सिगारेटचें थोटूक रक्षापात्रांत टाकलें आणि तो संतापानें उद्गारला—

"तुला जर आपल्या चारित्र्याची एवढी घमेंड आहे, तर तूं बोलावून आणलास कशाला मला इथं? आणि इतका वेळ चर्चा तरी कशाला केलीस माझ्याजवळ? मला फसवलंस तूं प्रियदर्शन! माझ्याकडून कबुलीजबाब घेतलास, माहिती काढून घेतलीस आणि आतां मला नकार देऊन वाटेला लावतोस! ढोंगी! लबाड!—"

पण प्रियदर्शन अगदीं शांत होता.

क्षणभरानें तो किंचित् हंसून म्हणाला, "तूं उगाच संतापला आहेस, मोहन! मी तुला फसवलं नाहीं न् कसलं ढोंगहि केलेलं नाहीं. मला जर तुला खरोखरीच फसवायचं असतं, तर पलिकडल्या खोलींत रेकॉर्डिंगची व्यवस्था करून मी आपल्या दोघांच्या संभाषणाचा ध्वनिलेख घेतला असता! पण, तो ज्या अर्थी मी घेतला नाहीं, त्या अर्थी तुझ्या या तोंडी कबुलीचा आणि माहितीचा मला काय उपयोग होणार? तूं जें मला आतां सांगितलंस, त्यातलं बहुतेक अगोदरच कळलं होतं मला!—"

मोहन अगदीं हताश होऊन त्याच्याकडे पहात होता.

तो अखेर दीनपणानें उद्गारला—

"मग तूं मला तुरुंगांत घालणार तर?—"

"कशावरून म्हणतोस तूं हें?—"

मोहन कांहीं बोलला नाहीं.

थोडया वेळानें आवंढा गिळून कपाळाचा घाम पुशीत तो म्हणाला—

"प्रियदर्शन, तुला कल्पना नाहीं तूं सध्यां कोणत्या संकटांत आहेस याची! नाहीं तर तूं मजजवळच्या पुराव्याचा असा अव्हेर केला नसतास! माझी मदत जर तूं या वेळीं घेतलीस, तरच तुझा अधःपात टळणार आहे!"

"तूं देऊं केलेल्या मदतीबद्दल आभारी आहे मी तुझा, मोहन पण तसल्या मदतीच्या जोरावर आपलं राजकारणांतलं स्थान कायम ठेवण्यापेक्षां अधःपात पतकरेल मला!—"

# घर आवो प्रीतम प्यारा

"तुला थोडीसुद्धां दया येत नाहीं का माझी, अण्णा ?—"

"हा प्रश्न दयेचा नाहीं, मोहन ! मला शक्य असतं तर मी स्वतःचं घर गहाण ठेवून रक्कम उभी केली असती तुझ्यासाठीं ! पण तुला माहितच आहे, माझ्या बायकोपुढं कांहीं चालत नाहीं माझं ! नाहीं तर, तिच्या नांवावर पंधरा हजार रुपये आहेत बँकेंत, त्यांतून नसते का दहा हजार रुपये दिले तुला मी ? पण तिच्यापायीं मी अगदीं लाचार झालोंय बघ —"

"मग कसं करायचं आतां ? मी तुला सारी स्थिति स्पष्ट सांगितली आहे. काल रात्रीं प्रियदर्शननं तें सगळं स्पष्ट सांगितल्यापासून पैसे उभ करण्यासाटीं सारखी धडपड चालली आहे माझी ! आज दुपारीं इश्वरदासजींची तार आल्यापासून मला सुचेनासं झालंय कांहीं ! मी जर सडा फटिंग असतों, तर जीव दिला असता किंवा बेपत्ता झालों

असतों! पण लग्नामुळं गळ्यांत धोंड बांधल्यासारखी स्थिति झाली आहे माझी!—"

"अरे बाबा, तुझ्या गळ्यांतली ती धोंड नाहीं. लाख मोलाची रत्नमाला आहे ती! तूं तिला नुसतं म्हणायची खोटी कीं, ती आपल्या बापाकडून दहा हजारांचा चेक आणील एका क्षणांत! कल्पवृक्षाखालीं बसलेल्या माणसानं येणाऱ्याजाणाऱ्यापुढं हात पसरावेत तसं चाललंय हें तुझं! तूं आतांच्या आतां घरीं जा न् गुप्तासाहेबांकडे बायकोला पाठव!"

अण्णासाहेब चषक भरीत हंसत हंसत म्हणाले.

पण मोहनचा चेहरा रागानें लाल झाला होता. तो चिडून उद्गारला—

"अण्णा, बायकोच्या मार्फत सासऱ्याकडून पैसा उकळून त्यावर चैन करणारा तुझ्यासारखा नालायक नाहीं मी! मी आजपर्यंत हजारों रुपये मिळविले आहेत आणि हजारों उडवले आहेत. धंद्यांत पडल्यापासून गेल्या दहा वर्षांत कोणताहि भोग भोगायचा शिल्लक ठेवलेला नाहीं मी! तेव्हां माझं तकदीरच जर आज उलटलं असेल, तर मरायला किंवा नामशेष होऊन जायला तयारी आहे माझी! पण बायकोसाठीं जीव घुटमळतोय माझा. लग्नाला अद्याप वर्ष नाहीं झालेलं आमच्या; न् त्यांतून तिची प्रसूति अडीच तीन महिन्यांवर आलेली! तिच्या मोहानं पाय गुंतल्यासारखा झाला आहे माझा! पण म्हणून कांहीं मी सासऱ्याच्या दारांत जाऊन दयेची भीक मागणार नाहीं! अण्णा, मी बदफैली आहे; कदाचित् दुष्टहि असेन. पण दुसऱ्याच्या पैशावर मजा मारण्याची माझी वृत्ति नाहीं! मला खात्री आहे कीं, हें गंडांतर टळल्यावर जर सहा महिने मी व्यवस्थितपणानें राह्यलों, तर दहा हजार रुपये सहज फेडून टाकीन मी! म्हणून तुझ्यासारख्या नापाक माणसाच्या मनधरण्या करतोंय पैशासाठीं!—"

त्याचा तो संताप पाहून घाबरलेले अण्णासाहेब अगदीं मिनतवारीनें म्हणाले, "मोहन, गैरसमज करून घेऊं नकोस माझ्या सूचनेबद्दल! मी तुला पैसे देऊं शकत नाहीं; गुलाबचंदजींचीहि इतकी रक्कम देण्यासारखी स्थिति नाहीं. अशा अडचणींत कर्जच काढायचं, तर तें गुप्तासाहेबांकडून काढायला काय हरकत आहे? म्हणून मी सहज सुचवलं तुला —"

मोहननें कांहीं उत्तर दिलें नाहीं.

ते दोघे एम्पायर हॉटेलामधील मोहनच्या खोलींत बसले होते. टेबलावर फक्त सोडा आणि मद्य यांच्या बाटल्या, सिगारेटचा डबा व रक्षापात्र एवढयाच काय त्या वस्तु होत्या. मोहनचा हात अर्धवट संरलेल्या चषकावर ठेवलेला होता. तो कोठेंहि बघत नव्हता आणि त्याला कांहींहि दिसत नव्हतें—असली विलक्षण शून्यता त्याच्या दृष्टींत आणि वृत्तींत आली होती. जागरणांनीं आणि त्याहिपेक्षां चिंतेनें ओढलेल्या त्याच्या चेहऱ्यावरील काळजीचे कंगोरे दिव्याच्या प्रकाशांत स्पष्ट आणि खोल दिसत होते. स्वतःच्या विचारांत तो इतका कांहीं चूर होता कीं, त्याच्या त्या निश्चेष्ट स्थितींत जिवणीच्या डाव्या टोकाशीं जळत असलेल्या सिगारेटचीं धूम्रवलयें हीं त्याचें मन आणि शरीर यांची हालचाल चालू असल्याची साक्ष देत होती.

त्यानें चषकावरील हात उचलला आणि एक एक घोट घ्यावयाला सुरवात केली.

कंपनीचा हिशेबतपासनीस येणार असल्याबद्दल ईश्वरदासजींची जी तार त्याला दुपारीं अचानक आली, तिच्यामुळें त्याच्या मनाचा धीर सुटल्यासारखा झाला. तो गुप्तासाहेबांकडे गेला असता, तर एका क्षणांत त्याला दहा हजार रुपये खरोखरीच मिळाले असते. पण आपल्या सासऱ्याकडे पैशासाठीं जाऊन आपल्या चारित्र्याविषयीं निःशंक असलेलें त्यांचें मन दूषित करावें, ही कल्पना त्याला दुःसह झाली; व म्हणून पैसे

उभे करण्याच्या या एरवीं अत्यंत सोप्या मार्गाचा अवलंब करावयाचा नाहीं, असें त्यानें ठरविलें. नागपुरांत त्याचे जेवढे धनिक परिचित होते, तेवढ्या सगळ्यांपाशीं त्यानें अंदाजानें शब्द टाकून पाहिला. पण सात आठ हजारांची रकम एका मुठीनें द्यावयाला कोणीहि तयार होईना. त्यामुळें त्याच्या मनाचा तोल सुटल्यासारखा झाला.

उद्यां सकाळीं मुंबईहून कंपनीचा हिशेबतपासनीस आल्यावर त्याला कसें तोंड दाखवावयाचें ?

त्याच्या आगमनाला आतां पुरते बारा तासहि उरले नव्हते. या बारा तासांत जर आपण आठ हजार रुपये उभे करूं शकलों नाहीं, तर—तर आपली गति काय होईल ?—

प्रियदर्शनचें तें भयंकर वाक्य त्याला आठवलें !—

"मी जरी कदाचित् तुला तुरुंगांत घातला नाहीं, तरी ईश्वरदासजी तुला तुरुंगांत घातल्याशिवाय रहातील का ?—"

दोन वर्षांपूर्वी जेव्हा त्यानें कंपनीचे तीन हजार रुपये खाजगी कामासाठीं वापरल्याचें प्रथमच उघडकीला आलें, तेव्हां ईश्वरदासजींनी त्याची गय केली होती. आपल्या राजकीय कारवायांत होणारा त्याचा उपयोग लक्षांत घेऊन, त्यानें ताबडतोब रक्कम भरण्याचें कबूल करतांच, ईश्वरदासजींनीं ती अफरातफर पोटांत घातली. पण आज—आज प्रश्न आठ हजारांचा होता. आणि कंपनीचे पैसे खाजगी कामासाठीं वापरल्याची ही दुसरी वेळ !

आपण जर मागल्या खेपप्रमाणें आपल्या कृत्याची मुकाट्यानें कबुली दिली, तर ईश्वरदासजी आपल्याला क्षमा करतील का ? की ताबडतोब पोलिसांच्या ताब्यांत देतील ?

त्याला हें माहित होतें कीं, आपण संकटांत आहों असें समजतांच गुप्तासाहेब आपल्या साह्याला धांवून येतील. पण आपल्या चारित्र्याची

झांकली मूठ त्यांच्यासमोर अशा रीतीनें उघडी पडावी, ही कल्पना त्याला सहन होईना.

तो चैनी खरा, पण मानी होता. आपल्या बुद्धीच्या जोरावर नाना प्रकारच्या घालमेली कराव्या, पाण्यासारखा पैसा मिळवावा आणि तो पाण्यासारखाच उडवावा, अशी त्याची बेदरकार, कलंदर वृत्ति होती. स्वतःच्या बौद्धिक करामतीवर त्याचा पूर्ण विश्वास होता. त्यामुळेंच त्याला सारखें असें वाटत होतें कीं, ही उद्यांची तपासणीची वेळ जर आपण निभावून नेऊं शकलों, तर मग कांहीं आपल्याला भय नाहीं.

पण ही वेळ कशी निभावून नेणार ?

ईश्वरदासजी काय, गुलाबचंदजी काय किंवा पंडितजी काय, या सगळयांच्या दृष्टीनें एक धाडसी कर्तबगार हस्तक एवढीच काय ती आपल्याला किंमत आहे, याची त्याला जाणीव होती. राजकारणांतलें आपलें वर्चस्व कायम ठेवण्यासाठीं आणि त्या वर्चस्वाच्या जोरावर मिळेल तिकडून पैसा ओढण्यासाठीं धडपडत असलेल्या या महत्वाकांक्षी चारित्र्यहीन माणसांच्या ठिकाणीं माणुसकीचा पूर्ण अभाव आहे, हें त्याला माहित होतें; व म्हणून आपली उपयुक्तता कमी होतांच किंवा त्या उपयुक्ततेची फाजील किंमत द्यावी लागते असें दिसतांच आपल्याला धोका द्यावयाला ते चुकणार नाहींत, याचीहि त्याला पूर्ण कल्पना होती. त्यामुळेंच तो आज निराश आणि भयभीत झाला होता. त्यांच्या चारित्र्यहीनतेमुळें जशी त्यांच्याकडे धांव घेण्याची आज सोय उरली नव्हती, तसाच स्वतःच्या चारित्र्याच्या अभिमानामुळें प्रियदर्शनहि त्याला पारखा होऊन बसला होता.

एरवीं आपण संकटांत सापडलों असतों, तर प्रियदर्शननें आपल्या-विषयींच्या स्नेहबुद्धीला जागून वाटेल ती मदत आपल्याला केली असती. पण आपण त्याच्याशीं सौदा करावयाला गेलों, तिथें आपलें चुकलें. प्रियदर्शनची दया भाकून जर आपण त्याच्याजवळ सरळ सरळ दहा

हजार रुपये मागितले असते, तर कदाचित् ज्या 'सागर व्हिला'च्या इस्टेटीचा तो विश्वस्त आहे, तिच्यांतूनहि त्यानें तेवढी रक्कम आपल्याला काढून दिली असती. पण आपण त्याच्याजवळ सौदा करण्याची भाषा बोललों आणि त्यामुळें त्याचा स्वतःच्या चारित्र्याविषयींचा अभिमान डिंवचला गेला. आपल्याजवळचा पुरावा खरोखरी इतका बिनतोड आहे कीं, त्या पुराव्याच्या जोरावर प्रियदर्शनला पंडितजी आणि गुलाबचंदजी या दोघांनाहि राजकारणांतून कायमचें उठवतां आलें असतें. पण चारित्र्याविषयींच्या भलत्याच कल्पनांमुळें प्रियदर्शननें त्या पुराव्याचा अव्हेर केला.

पण त्याच्या जागीं जर पंडितजी किंवा गुलाबचंदजी असते तर?–

ती कल्पना मनांत येतांच मोहनचे तांबारलेले, मलूल डोळे त्याच्या हातांत असलेल्या चषकांतील मद्यापेक्षांहि एकदम लकाकले; व एका घोटांत त्यानें उरलेली दारू संपवून टाकली.

आणि खुर्चीवरून एकदम उठून तो उद्गारला—

"ऊठ अण्णा! जाऊं या आपण आतां. माझं जेवण व्हायचंय अजून—"

पण अण्णासाहेबांच्या दृष्टीनें त्यांचा पिण्याचा कार्यक्रम अद्याप पूर्ण झालेला नव्हता. त्यामुळें ते खुर्चीवरून न हलतां म्हणाले—

"पण तूं काय करायचं ठरवलं आहेस मग?—"

"त्याच्याशीं तुला काय करायचंय? तूं तर कांहीं मला पैसे देत नाहींस ना? चल, जाऊं या —"

मोहननें करड्या, त्रासिक आवाजांत म्हटलें.

आणि तो लगेच खोलीबाहेर पडलाहि.

त्यामुळें अण्णासाहेबांना उठावेंच लागलें. त्याच्या मनोवृत्तींत एकाएकीं झालेला बदल त्यांच्या लक्षांत आला. पण त्याचा उमज मात्र त्यांना होईना. म्हणून ते त्याला चुचकारण्याच्या हेतूनें म्हणाले—

"माफ कर हां मोहन! तुझ्या गरजेला उपयोगी पडतां येत नसल्याबद्दल मला किती वाईट वाटतंय याची कल्पना नाहीं नाहीं यायची तुला!––"

"मला छान कल्पना आहे त्याची! हा का तुझा पहिलाच अनुभव आहे का, अण्णा? तूं कधीं कोणाच्या गरजेला उपयोगी पडला आहेस आजपर्यंत? त्या बिचाऱ्या विठोबाला अटक झाल्यावर कोर्टांत जमिनाचा अर्ज करायलासुद्धां हजर राहला नाहींस तूं! तुझ्या वल्गना तेवढ्या ऐकाव्या एक एक! जातिवंत फोकनाड आहेस अगदीं!—"

बोलतां बोलतां तो एकदम थांबला. आपण मर्यादेपलीकडे गेलों, असें त्याला वाटलें की काय कोण जाणें. आणि किंचित् नरमाईनें पण तुच्छतेनें त्यानें विचारलें—

"तुला तुझ्या घरापयत पोंचवून द्यावं लागेल नाहीं रे?––"

त्याचें तें सगळेंच बोलणें अण्णासाहेबांना अगदीं वर्मी लागलें होतें. पण ते हसल्यासारखे करून त्याला म्हणाले––

"आज घरीं कांहीं विशेष कार्यक्रम आहे का जेवणाचा? तूं फार घाईत दिसतोस, मोहन!––"

आणि ते त्याच्या पाठोपाठ मोटारींत बसले.

पण मोहन कांहीं बोलला नाहीं. त्यानें मोटार वेगानें हॉटेलच्या आवाराबाहेर काढली.

त्यांचा शहरांतील तो सहप्रवास अगदीं निःशब्द झाला.

कारण मघाशीं अचानक मनांत आलेल्या त्या कल्पनेनें मोहनचें मन विलक्षण अस्वस्थ करून सोडलें होतें.

प्रियदर्शन आणि पंडितजी यांच्यांतील वैमनस्य विकोपाला गेलें असून, त्या दोघांपकीं कोणीतरी एक मंत्रिमंडळांतून निघाल्याशिवाय तें वैमनस्य शांत होणार नाहीं, हें त्याला कळून चुकलं होतें; व पंडितजींच्या

विरुद्ध प्रियदर्शन कोणत्या प्रकारचा पुरावा गोळा करीत आहे, याचीहि कल्पना त्याला आली होती. प्रियदर्शननें जर त्याला मदत करण्याचें कबूल केलें असतें, तर त्यानें आपल्या जवळचा सारा पुरावा–खाणींच्य लिलावापासून संपाच्या उठावणीपर्यंतच्या पंडितजींच्या साऱ्या कारवायांचा वृत्तांत त्यानें प्रियदर्शनला सप्रमाण पुरवला असता. पण प्रियदर्शननें त्याच्या जवळचा पुरावा घेण्याचें जाणूनबुजून नाकारलें. आणि त्याला तर पैशाची आज इतकी निकड होती कीं, प्रियदर्शन आणि पंडितजी यांच्यांतल्या या वैमनस्याचा फायदा घेतल्याशिवाय त्याला आतां गत्यंतर नव्हतें.

प्रियदर्शनच्या हटवादीपणामुळें तो फायदा घेण्याचा एकच मार्ग आतां उरला होता. आणि तो म्हणजे त्याला पदच्युत करण्यासाठीं पंडितजींनीं रचलेल्या व्यूहाला हातभार लावणें.

ती कल्पना मध्यांशीं जेव्हां प्रथम त्याच्या मनांत आली, तेव्हां त्याला विलक्षण हर्ष झाला; व आपल्यापुढें दत्त म्हणून उभ्या असलेल्या साऱ्या अडचणींतून बाहेर पडण्याचा मार्ग सांपडला म्हणून त्याचें मन आनंदानें बेहोष होऊन गेलें.

पण तो आनंद फार वेळ टिकला नाहीं.

प्रियदर्शनच्या गुणांवर लुब्ध असलेलें त्याचें मन त्याला वारंवार सांगूं लागलें कीं, त्याच्यासारख्या चारित्र्यवान्, निःस्पृह पुरुषाला पदच्युत करण्याचा कारस्थानांत आपण का सामील व्हावें? त्याचें धोरण ढिलें आणि घाबरट आहे हें सिद्ध करण्यासाठीं पंडितजींच्या प्रेरणेनें आपण नाना प्रकारच्या कारवाया आजवर त्याच्या विरुद्ध केल्या. पण आतां तर त्याला पदच्युत करण्याचा प्रयत्न चालला आहे. त्या पातकांत आपण का वाटेकरी व्हावें?

पण त्याबरोबरच त्याच्या मनांत अशीहि एक शंका चमकून जाई कीं, प्रियदर्शन जोंपर्यंत मुख्य प्रधान आहे, तोंपर्यंत आपल्याला कोणत्याहि

प्रकारची सुरक्षितता नाहीं. ईश्वरदासजींचे आणि इझाबेलाचे पैसे जरी आयण वेळेवर देऊं शकलों, तरी आपल्या कंपनीच्या पोकळ कारभाराची चौकशी करून तो आपल्याला कोणत्याहि क्षणीं तुरुंगाची वाट दाखवूं शकेल. अशा स्थितींत त्याला गाडण्याचें जें कारस्थान पंडितजींनीं रचलें आहे, त्यांत सामील होण्याशिवाय आपल्याला दुसरी कोणती गति आहे ?

पण, आत्मरक्षणासाठीं जरी पंडितजींना साह्य करण्याचें आपण ठरविलें, तरी त्यामुळें आज आपल्यापुढें असलेला पैशाचा प्रश्न कसा सुटणार ? पंडितजी पचमढीला आहेत, आपण नागपूरला आहोंत. त्यांच्याकडून मदत होण्याची आशा असती, तरीहि तें आतां शक्यतेच्या पलिकडलें आहे.

शिवाय पंडितजी आज जरी कदाचित् नागपूरला असते, तरीहि त्यांनीं एवढी रक्कम आपल्याला दिली नसती.—तें मुळीं त्यांच्या स्वभावांतच नाहीं. गेल्या सात आठ महिन्यांत त्यांचे आणि आपले जे व्यवहार झाले, त्या साऱ्या व्यवहारांत त्यांचा हिशेबी, दुसऱ्याला पिळून काढण्याचा स्वभाव आपल्या प्रत्ययाला आलेला नाहीं काय ?

अर्थात् आत्मरक्षणासाठीं, या संकटाच्या पाठोपाठ जें दुसरें कंपनीच्या चौकशीचें संकट आपल्यावर येऊं घातलें आहे, तें टाळण्यासाठीं प्रियदर्शनच्या नाशाकरितां पंडितजींनीं रचलेल्या कारस्थानांत आपण केवळ गत्यंतर नाहीं म्हणून सामील होणार. पण उद्यांचा प्रश्न शिल्लक उरतोच. तो कसा सोडवायचा ? आपल्या मदतीची उपयुक्तता लक्षांत घेऊन पंडितजी कदाचित् आपल्याला हजार पांचशें रुपये पुढें देतील. पण आज—आज जे आठ हजार रुपये भरण्याची निकड आहे, ते कोठून आणणार ?

हा एकच एक विचार मनांत थैमान घालीत असतांना त्या संभ्रांत, अनिश्चित मनःस्थितींतच तो आपल्या बंगल्याच्या आवारांत शिरला; व त्यानें मोटार गॅरेजमध्यें नेऊन उभी केली.

गाडी ठेवून तो बंगल्याच्या पायऱ्या चढावयाला लागतांच रेडियों-तून निघणाऱ्या मधुर गानलहरी सुस्पष्टतेनें त्याच्या कानांवर पडल्या.

**घर आवो प्रीतम प्यारा । है तुम बिन सब जग खारा**

रोजला अत्यंत प्रिय असलेल्या मिराबाईच्या एका भजनाचे आर्त सूर होते ते.

तो पाय न वाजवतां हळूच दिवाणखान्यांत आला.

छातीवर दोन्ही हात ठेवून सोफ्यावर अर्धवट निजलेली रोज त्याच्या दृष्टीस पडली.

तिच्या मस्तकावरील अस्मानी रंगाचा पदर किंचित् मागें झुकला होता; व उशालगत शीतकांत ( Cooler ) ठेवलेल्या पंख्याच्या झोतामुळें तिच्या गोऱ्यापान कपाळावर केस भुरूभुरू उडत होते. गर्भ-भारामुळें जरी तिचीं गालहाडें थोडीं वर आलीं होतीं, तरी तिचें लांबट मुखमंडल मात्र अधिकच कांतिमान् दिसत होतें. गानलहरींत मनाचा लय झाल्यामुळें म्हणा किंवा गर्भजडतेमुळें शरीर सुस्तावल्यामुळें म्हणा तिचे डोळे मिटलेले होते.

टेबलावरील बैठ्या दिव्याचा झगझगीत प्रकाश तिच्या शरीरावर पडलेला होता.

त्या प्रकाशांत तिची ती अस्मानी साडी, ते भुरूभुरू उडणारे केस, मिटलेल्या डोळ्यांच्या त्या दाट पापण्या आणि तो सतेज गौरवर्ण यांचें सौंदर्य कांहीं अनिर्वचनीय वाटत होतें.

तिच्या त्या मुग्धकोमल सौंदर्याकडे मोहननें क्षणार्ध अतृप्त दृष्टीनें पाहिलें—

आणि त्याच्या मनांत आलें कीं, आपल्यावरलें हें संकट जर उद्यां टळलें नाहीं, तर रोजची आणि आपली कदाचित् कायमची ताटातूट होईल.

ती कल्पना मनांत येतांच अंतःकरणाला चरका बसल्यासारखें त्याला झालें.

रेडियोंतून गानलहरी निघत होत्या.

रोजचे डोळे मिटलेले होते.

तो हलकेच तिच्याजवळ गेला आणि खालीं वाकून त्यानें तिच्या कपाळाचें चुंबन घेतलें.

त्याबरोबर ती दचकून उठली आणि त्याला सोफ्याशेजारीं उभा असलेला पहातांच त्याच्या गळ्यांत हांत घालून म्हणाली—

"केव्हां आलांत तुम्ही ?——"

तो प्रश्न विचारीत असतांनाच तिची नजर त्याच्या डोळ्यांकडे गेली आणि ते भरून आले आहेत असा भास तिला झाला.

"डोळ्यांना पाणी यायला काय झालें? बरं नाहीं का तुम्हाला आज ?——"

तिनें लगेच विचारलें.

"आज मी थकलोंय फार, रोज! जेवायला बसूं या आतां आपण. मी कपडे बदलून येतों——"

आणि तो झटकन् आपल्या खोलींत गेला.

त्याच्या त्या वर्तनानें रोज बुचकळ्यांत पडल्यासारखी झाली.

तो मनस्वी होता. प्रेमाची लहर आली, म्हणजे तो पिसाटासारखा बेफाम वागत असे. पण आजच्या त्याच्या त्या वर्तनांत लहरी बेफामपणा नव्हता. तें चुंबन, तें चुंबन-त्यांत नेहमींची ती निर्दय आसक्ति, कधींहि तृप्त न होणारी ती दुर्दम अतृप्तता नव्हती.

मग काय होतें त्या चुंबनांत?

त्यांत आसक्ति नव्हती, उन्माद नव्हता, अतृप्तता नव्हती; मग काय होतें?

रोजला समजेना. मात्र त्याची आजची मनःस्थिति, त्याची वृत्ति आणि दृष्टि कांहीं अगदीं निराळ्या प्रकारची आहे, एवढीच संवेदना त्या चुंबनामुळें तिला झाली.

ती आंतल्या दिवाणखान्यांत आली आणि जेवणाच्या टेबलावर दोन सुंदर पुष्पपात्रें ठेवून तिनें खानसाम्याला वाढावयाला सांगितलें.

तोंच मोहन खुर्चीवर येऊन बसला.

आणि जेवणाला सुरवात झाली.

ती त्याची प्रत्येक हालचाल काळजीपूर्वक पहात होती.

तो खालीं मान घालून मुकाट्यानें जेवत होता. आपली नजर तो टाळीत आहे, हें लगेच तिच्या लक्षांत आलें.

ती हातांतला चमचा खालीं ठेवून हळूच उठली आणि त्याच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाली—

"मोहन, तुम्हांला काय होतंय आज?——"

त्यानें चमचा, कांटा खालीं ठेऊन तिच्याकडे पाहिलें आणि हंसण्याचा प्रयत्न करून म्हटलें——

"कांहींसुद्धां होत नाहीं——"

तिनें आपल्या दोन्ही हातांनीं त्याचें मस्तक वर उचललें आणि त्याच्या दृष्टींत दृष्टि मिसळून अगदीं कळवळून म्हटलें——

"मोहन, तुम्ही लपवतां आहांत माझ्यापासून!——"

तिनें ते शब्द उच्चारतांच त्याचे डोळे पाण्यानें भरून आले.

तिनें मुकाट्यानें त्याचें मस्तक आपल्या वक्षःस्थलावर टेकलें आणि त्याच्या केंसांतून अंगुलि फिरवीत ती म्हणाली——

"मोहन, तुम्ही आज सांगितलं पाहिजे मला सगळं कांहीं——"

तिच्या हातांतून त्यानें आपलें मस्तक हळूच सोडवून घेतलें आणि अगदीं अशरणतेनें तो उद्गारला—

"रोज, मी आज संकटांत आहे फार!——"

"कसलं संकट? मला कळूं द्या तरी. मग पाहूं या कांहीं मार्ग निघतो का?——"

तिनें त्याचे हात आपल्या हातांत घेऊन म्हटलें.

टेबलावरल्या प्लेट्स उचलावयाला आलेला खानसामा तें चमत्कारिक दृश्य पाहून हळूच मागच्या मागें परतला.

"दुपारीं आलेली तार तूं बघितलीस ना? उद्यांच्या उद्यां आठ हजार रुपये भरले पाहिजेत मला कंपनीचे!—"

"एवढंच ना? मी आतां आपलं जेवण झाल्याबरोबर पपांकडे जातें!—"

"नाहीं रोज! त्यांची मदत मला नको आहे या बाबतींत! मी खरोखरी कसा आहे हें तुला माहित झालंय तेवढं पुरे! त्यांना कळायला नको आपल्या जावयाचं चारित्र्य! मग कधींहि उजळ माथ्यानं जातां येणार नाहीं मला त्यांच्याकडे!—"

"पण त्यांना माहित आहे तुम्ही नेहमीं नाना प्रकारच्या उलाढाली करीत असतां हें. त्यांत ठोकर बसली न् म्हणून पैसे भरावे लागणार आहेत असं सांगतां येईल त्यांना. आपण फेडून टाकूं मागाहून त्यांचे पैसे--"

"नाहीं. त्यांना यांतलं कांहींहि कळतां कामा नये!--"

"मला पटत नाहीं तुमचं हें म्हणणं. प्राणांवर बेतली असतां आपण जर पपांकडे जायचं नाहीं तर कुणाकडे जायचं? त्यांच्याशिवाय कोण आहे दुसरं आपल्याला?—"

"पण प्राणांपेक्षांहि बहुमोल असं कांहीं तरी असतं आयुष्यांत! तें गमवायची इच्छा नाहीं माझी! म्हणून--"

पण तेवढा शब्द बोलून तो थांबला.

ती अगदीं स्तब्ध उभी होती.

त्या स्थितींत कांहीं क्षण गेले असतील नसतील, तोंच तिचा चेहरा एकदम उल्लसित झाला.

आणि ती हर्षभरानें म्हणाली--

"पपांकडे जायचं नाहीं एवढंच ना? आपल्या घरींच भागूं शकेल आपली ही अडचण. आपल्या लग्नाच्या वेळीं माझ्या नांवानं ठेवलेले पांच हजार रुपये पपांनीं मला दिले. माझं बँकबुक देतें मी

तुम्हांला आणि त्याच्या भरीला माझे जरूर पडतील तेवढे दागिने !--"

"रोज, काय म्हणतेस तूं हें? तुझे दागिने--"

त्याला पुढें बोलवेना. त्याच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले.

तिनें त्याचें मस्तक आपल्या कुशींत घेतलें आणि ती त्याला कुरवाळीत उद्गारली--

"आतांच तुम्ही सांगितलं ना मला प्राणांपेक्षां बहुमोल असं कांहीं तरी आयुष्यांत असतं म्हणून! त्यापेक्षां कांहीं माझे दागिने खास बहुमोल नाहींत !--"

तिला हळूच बाजूला सारून तो उठला आणि म्हणाला--

"रोज, मी किती वाईट माणूस आहे हें माहित आहे ना तुला? मी नाहींसा झालों, तर माझ्या पाशांतून तूं कायमची मोकळी होशील ! तूं मला वाचवावंस अशी लायकी नाहीं माझी !--"

त्याचे ते उद्गार ऐकतांच इतका वेळ त्याच्याशीं धीरानें बोलत असलेल्या रोजच्या डोळ्यांत एकदम अश्रु उभे राहिले आणि ती आवेशानें त्याला म्हणाली--

"मोहन, काय बोलतां तुम्ही? तुम्ही कसेहि असा आणि कसेहि वागा! माझ्या तुमच्यावरल्या प्रेमाचा तुमच्या वर्तनाशीं कांहीं संबंध नाहीं! तसं असतं, तर माझं मन यापूर्वींच विटलं असतं तुमच्याविषयीं! तें विटलं नाहीं याचाच अर्थ असा कीं, प्राणांपेक्षां, लौकिकापेक्षां आणि चारित्र्यापेक्षां निराळ्या अशा कोणत्या तरी कारणामुळं तुम्ही मला प्रिय आहांत! मला तें कारण समजलेलं नाहीं आणि समजून घेण्याची इच्छाहि पण नाहीं !--"

तो मुकाट्यानें तिचे ते उद्गार ऐकत होता.

ती बोलण्याची थांबतांच तो तिच्याजवळ गेला--

--आणि तिच्या अश्रुपूर्ण नेत्रांचें त्यानें चुंबन घेतलें.

# अधिकारातिक्रमाचा आरोप

प्रियदर्शननें नागपुरहून निघतांना असा अगदीं निश्चय केला होता कीं, पचमढीला आतां जो आपल्याला निवांत असा महिना दीड महिना वेळ मिळेल, तो सर्व असेंब्लीच्या पावसाळी बैठकीपुढें ठेवण्याचा कार्यक्रम तयार करण्यासाठीं खर्च करावयाचा.

आपल्या मार्गांतील अडचणींची त्याला पूर्ण जाणीव होती. विशेषतः, शेगांवहून परत आल्यापासून त्याच्या मनानें असें घेतलें होतें कीं, आपल्याला आपल्या स्वतःच्या कल्पना आणि योजना अमलांत आणावयाच्या असतील, तर एक प्रकारच्या करारीपणानेंच आपण यापुढें वागलें पाहिजे. आपला कार्यक्रम कोणत्याहि दृष्टीनें कांग्रेसच्या धोरणाशीं विसंगत नाहीं. मग मुख्य प्रधानाला योग्य अशा स्वतंत्र बाण्यानें तो अंमलांत आणावयाला काय हरकत आहे?

त्याप्रमाणें त्यानें चौकशी कमिटीच्या शिफारसी लक्षांत घेऊन

गिरणी कामगारांच्या जीवनवेतनाचें बिल तयार केलें; व उत्तमरावांच्या सहकारितेनें मालगुजारांचा संमतीचा आणि अग्रक्रियेचा हक्क मर्यादित करणारा कुळकायदाहि तयार केला. नागपूर, यवतमाळ आणि अकोला या तीन जिल्ह्यांतून सारावसुलीच्या जुलमाविरुद्ध कांहीं ठिकाणीं शेतकऱ्यांनीं तात्कालिक स्वरूपाचा सत्याग्रह केला होता. इतकेंच नव्हे, तर पश्चिम वऱ्हाडांतल्या सात तालुक्यांतली जादा सारावाढ रद्द न झाल्यास सामुदायिक प्रतिकाराची चळवळ हातीं घ्यावी लागेल, अशी घोषणा विदर्भ कांग्रेसनेंहि केली होती. प्रियदर्शननें जप्त्या आणि लिलांव ताबडतोब थांबवून सत्याग्रहाच्या चळवळीची नांगी मोडली हें खरें; पण, त्याबरोबरच त्याला हेंहि कळून चुकलें कीं, शेतसारा योग्य प्रमाणांत कमी केल्याशिवाय हा प्रश्न कायमचा सुटणार नाहीं. म्हणून त्यानें पश्चिम वऱ्हाडांतली जादा सारावाढ अजिबात रद्द करण्याची व प्रान्तांतील सरसकट सर्वच शेतसारा वीस टक्क्यांनीं कमी करण्याची योजना तयार केली.

शेतसारा कमी करण्याच्या या योजनेला जें प्रास्ताविक टिपण त्यानें जोडलें होतें, त्यांत त्यानें असें म्हटलें होतें कीं, "सरसकट सर्वच शेतकऱ्यांवर सारा आकारण्याची सध्यांची पद्धत चुकीची आणि अन्यायाचीहि आहे. प्राप्तीवरील कर ज्या तत्त्वावर आणि ज्या पद्धतीनें आकारला जातो, त्या तत्त्वानुसार आणि त्या पद्धतीनें शेतसाराहि आकारला गेला पाहिजे. सारा आकारण्याच्या सध्यांच्या पद्धतीमुळें इतर धंदेवाल्यांपेक्षां शेतकऱ्यांवर करांचें ओझें किती तरी जास्त पडतें. प्राप्तीवरील कर हा उत्पन्नाच्या कांहीं एका मर्यादेनंतरच आकारला जातो. हें तत्त्व शेतकऱ्यांनाहि लागू करण्यांत आलें पाहिजे; व उत्पन्नाची किमान मर्यादा ठरवून तिच्यापेक्षां ज्याचें उत्पन्न कमी आहे अशा शेतकऱ्यावर सारा आकारला जातां कामा नये. इतर साऱ्या धंदेवाल्यांप्रमाणें शेतकऱ्याच्याहि रोख वार्षिक उत्पन्नावरच कर आकारला जाणें जरूर

आहे. या पद्धतीनें शेतसाऱ्याची पुनर्घटना झाल्याशिवाय शेतकऱ्याच्या डोईवरील कर आणि कर्ज यांचें दुहेरी ओझें कमी होणार नाहीं; व इतर प्रगत धंदेवाल्यांच्या मानानें होणारी या श्रमजीवी दलित वर्गाची आज होत असलेली निर्दय पिळणूकहि थांबणार नाहीं."

शेतसारा एकदम वीस टक्क्यांनीं कमी केल्यावर जी जबर तूट प्रांताच्या तिजोरींत पडणार होती, ती भरून काढण्यासाठीं करवाढीचीं दोन नवीं बिलें आणण्याचें त्यानें ठरविलें. त्यांपैकीं एक कर प्राप्तीवरील कर देणाऱ्या सर्व धंदेवाल्यांवर (Tax on Professions) बसविण्यांत येणार होता; व दुसऱ्या बिलानें ज्यांना आपल्या धंद्यांत तीस हजारांच्या वर नफा मिळेल, त्यांच्या त्या नफ्याचा $\frac{1}{3}$ भाग सरकारला मिळावा अशी व्यवस्था करण्यांत आली होती.

या बिलांना जोडण्यांत आलेल्या प्रास्ताविक टिपणांत त्यानें असें म्हटलें होतें कीं, "आजपर्यंत करांचें बव्हंश ओझें शेतकऱ्याच्या डोक्यावर लादून त्याच्या मानानें कमी श्रम करणारे समाजांतील इतर सुखवस्तु वर्ग त्याच्या जिवावर स्वास्थ्य आणि संरक्षण भोगीत होते. करआकारणींतील ही विषमता लक्षांत घेऊन सरकारनें शेतसारा कमी करण्याचें योजिलें आहे. तेव्हां समाजांतील इतर सुखवस्तु, पांढरपेशा वर्गांनीं शेतकऱ्याच्या डोईवरील ओझें कमी करण्याच्या सरकारच्या या योजनेला हातभार लावण्यासाठीं थोडासा स्वार्थत्याग करावयाला आनंदानें तयार झालें पाहिजे."

पण या दोन करांमुळें उत्पन्नांत येणारी सर्वच तूट भरून निघणें कांहीं शक्य नव्हतें. म्हणून प्रांतांत आणखी चार ठिकाणीं दारूबंदी करण्याचा जो कार्यक्रम सरकारनें योजला होता, तो एक वर्षापुरता तरी बहुधा लांबणीवर टाकावा लागेल, अशी भीति प्रियदर्शननें व्यक्त केली होती. या बाबतींत त्यानें असा खुलासा केला होता कीं, "दारूबंदीच्या कार्यक्रमाची आवश्यकता आणि त्याचा नैतिक प्रभाव यांची मला पूर्ण

जाणीव आहे. पण शेतसारा कमी करण्याचा प्रश्न हा मला अधिक जिव्हाळ्याचा आणि निकडीचा वाटतो; व म्हणून तो सोडविण्यासाठीं दारूबंदीचा नवा कार्यक्रम कदाचित् पुढें ढकलावा लागण्याचा संभव आहे."

कामगार आणि कास्तकार यांच्या कल्याणाच्या या योजनांबरोबरच त्यानें हरिजनांना सर्व सार्वजनिक विहिरी, देवळें, धर्मशाळा आणि पाणवठे खुले करण्याचेंहि बिल तयार केलें.

पण या सर्व योजनांपेक्षां अपूर्व आणि क्रांतिकारक अशी एक अभिनव योजना त्यानें आपल्या या कार्यक्रमांत समाविष्ट केली होती.

होळीच्या आणि नंतर लगेच रामनवमीच्या दिवशीं जबलपूरला आणि प्रांतांतील इतरहि कांहीं शहरीं हिंदुमुसलमानांचे जे दंगे झाले, त्यांतून एक नवीनच प्रश्न उपस्थित झाला होता. होळीच्या वेळीं जबलपूरला झालेल्या भीषण दंग्यासंबंधीं प्रांतिक कायदेमंडळांत तेथील एका हिंदी सभासदानें कामतहकुबीची सूचना आणली; व तिच्यावर भाषण करतांना, त्या दंग्यांत पोलिसांचा बंदोबस्त आणि संरक्षण हीं दोन्ही अपुरीं पडल्यामुळें नागरिकांची कशी दैना झाली, याचें त्यानें हृदयस्पर्शी वर्णन केलें. त्या सूचनेला उत्तर देतांना प्रियदर्शननें असें आश्वासन दिलें होतें कीं, "जातीय दंग्यांच्या वेळीं पोलिसांचा बंदोबस्त अपुरा पडतो आणि नागरिकांना भरपूर संरक्षण द्यावयाला ते असमर्थ ठरतात, असा अनुभव दसऱ्याच्या दिवशीं जबलपूर येथें आणि अन्यत्र जे दंगे झाले त्याच वेळीं आम्हांला प्रथम आला; व तेव्हांपासून अशा दंग्यांच्या वेळीं नागरिकांना संरक्षण देण्यासाठींच केवळ नव्हे, तर सहकारितेनें शांतता स्थापन करण्यासाठींहि कांहीं तरी निराळी व्यवस्था करावी, असा विचार माझ्या मनांत घोळत आहे. यासंबंधींची माझी योजना मी असेंब्लीच्या पुढल्या बैठकींत आपल्याला सादर करीन; व असेंब्लींतील सर्व पक्षांनीं पाठिंबा द्यावा असेंच त्या योजनेचें स्वरूप राहील, अशी मी आपल्याला ग्वाही देतों."

जबलपूरच्या या दोन्ही दंग्यांची चौकशी त्यानें स्वतः जातीनें केली होती; व प्रांतांत ज्या ज्या ठिकाणीं दंगे झाले, त्या त्या ठिकाणीं तो स्वतः चौकशी करावयाला गेला होता. या चौकशींत निरनिराळ्या पक्षांच्या कार्यकर्त्यांकडून जी अंतःस्थ माहिती त्याला मिळाली आणि त्या त्या ठिकाणच्या पोलिस अधिकाऱ्यांनीं जें महत्त्वाचें साहित्य त्याला पुरविलें, तें सर्व लक्षांत घेतल्यावर त्याची अशी खात्री होऊन चुकली कीं, हिंदु आणि मुसलमान या दोन्ही समाजांच्या पुढाऱ्यांना एकत्र आणून नागरिकांच्या संरक्षणाची जबाबदारी त्यांच्यावर टाकल्याशिवाय बंदोबस्ताचा आणि संरक्षणाचा प्रश्न सुटणार नाहीं. म्हणून त्यानें नागरिक संरक्षक दलाची (Civic Guards) योजना तयार केली; व ती बिलाच्या रूपानें असेंब्लीपुढें मांडण्याचें ठरविलें.

पण त्या योजनेचें स्वरूप इतकें क्रांतिकारक होतें कीं, प्रांताधिपति आणि कांग्रेसचे वरिष्ठ अधिकारी यांची संमति तिला मिळेल कीं नाहीं, याबद्दल त्याला शंका वाटली. म्हणून प्रथम त्यानें गांधीजींचा सल्ला या बाबतींत घेण्याचें ठरविलें. त्याला खात्री होती कीं, हिंदु आणि मुसलमान या दोन्ही समाजांना सहकारितेनें स्वसंरक्षण करण्याची संवय लावण्याचा आणि परस्परांना जबाबदार धरण्याचा जो हेतु त्या बिलाच्या मुळाशीं होता, त्याची उपयुक्तता आणि महत्त्व लक्षांत घेऊन गांधीजी त्याला तत्काळ संमति देतील.

पण ही त्याची अपेक्षा फसली.

तथापि तो नाउमेद झाला नाहीं. अहिंसेच्या चौकटींत तें बिल बसत नसल्यामुळें गांधीजींनीं जरी त्याला आशीर्वाद दिला नाहीं, तरी त्याच्या लोकोपयोगी स्वरूपामुळें असेंब्लींतील कॉंग्रेस पक्ष आणि इतरहि सारे पक्ष त्याला पाठिंबा देतील, अशी प्रियदर्शनला खात्री वाटत होती.

म्हणून आतां प्रांताधिपतींची संमति त्या योजनेला मिळविण्याच्या उद्योगाला तो लागला.

कारण ती योजना हत्यारांच्या कायद्याच्या कक्षेंत येत होती.

ना. गव्हर्नरांचा आपल्यावर किती लोभ आणि विश्वास आहे, याची त्याला जाणीव होती. त्याची ऋजुता, बुद्धिमत्ता आणि कर्तव्य-दक्षता जों जों त्यांच्या प्रत्ययाला येत गेली, तों तों त्यांचा त्याच्यावरला स्नेहयुक्त विश्वास वाढत गेला; व त्यामुळें त्याच्या कोणत्याहि नवीन कल्पनेला ते शक्य तोंवर साह्य करीत असत. शाळा–कॉलेजांतून निशाण-बाजीचें शिक्षण देण्याची त्याची योजना एकदम मान्य करणें त्यांना प्रथम कठीण गेलें. पण नंतर हिंदुस्थान सरकारची संमति मिळवून त्यांनी ती योजना अंमलांत आणण्याच्या कामीं प्रियदर्शनला उत्साहानें मदत केली.

त्यांच्या या स्नेहबुद्धीवर विश्वास ठेवूनच प्रियदर्शननें नागरिक संरक्षक दलाची योजना एक दिवस त्यांच्यापुढें ठेवली.

गव्हर्नरसाहेबांनीं त्या समयोचित योजनेबद्दल त्याचें अभिनंदन केलें; पण त्याबरोबरच त्या योजनेला मान्यता देणें हें आपल्या अधिकार-कक्षेबाहेरचें आहे, ही गोष्टहि त्यांनीं त्याच्या निदर्शनाला आणून दिली.

"पण आपल्याला स्वतःला तर ही योजना आक्षेपार्ह किंवा अव्यवहार्य वाटत नाहीं ना?—"

"नाहीं. ती सावधगिरीनं व जबाबदारीनं अंमलांत आणल्यास यशस्वी व्हायला हरकत नाहीं असं वाटतं मला—"

"मग आपण एक गोष्ट आपल्याला प्रिय असलेल्या या प्रांताचं हित लक्षांत घेऊन करावी अशी माझी विनंति आहे आपल्याला—"

"कोणती?—"

"आपण स्वतः आपल्या अनुकूल शिफारसीसह ही योजना हिंदुस्थान सरकारकडे पाठवावी; व त्यांची संमति मिळवण्याचा प्रयत्न करावा. निशाणबाजीचें शिक्षण शाळा–कॉलेजांतून देण्याची योजना जेव्हां मी आपल्यापुढं ठेवली, तेव्हां सुद्धां हाच प्रश्न उपस्थित झाला

होता; व त्या वेळीं आपण स्वतः हिंदुस्थान सरकारकडे शिफारस करून त्या योजनेला मंजुरी मिळवून दिली होती—"

"हो. पण ही योजना त्यापेक्षां किती तरी व्यापक आहे, क्रांतिकारक आहे. आपल्या प्रांतापुरता हत्यारांचा कायदाच मुळीं रद्द करावा लागणार आहे या योजनेमुळें!—"

"हो. मला जाणीव आहे त्याची. म्हणूनच मी म्हणतों कीं, आपण प्रयोग म्हणून या योजनेचा स्वीकार करण्याविषयीं हिंदुस्थान सरकारला शिफारस करावी. जर या योजनेचा अनिष्ट परिणाम किंवा दुरुपयोग होतो असं सरकारला आढळून आलं, तर ती तात्बडतोब रद्द करतां येईल त्यांना—"

त्याचा तो युक्तिवाद ना. गव्हर्नरांना व्यक्तिशः पटला; व तो मुख्य प्रधान असतांना असल्या प्रकारची कोणतीहि योजना त्याच्या नेतृत्वाखालीं अंमलांत आणावयाला हरकत नाहीं, असेंच त्यांचें मत होतें. पण हिंदुस्थान सरकारकडे त्या योजनेची शिफारस करावयाला त्यांचें मन कचरत होतें. त्यामुळें ते कांहीं बोलले नाहींत.

पण त्यांच्या मदतीनें ती योजना मंजूर करून घेण्याचा प्रियदर्शनचा अगदीं निश्चय झाला होता. त्यामुळें त्यानें पुन्हा गव्हर्नरसाहेबांना आग्रहानें म्हटलें—

"आजपर्यंत माझा प्रत्येक उपक्रम यशस्वी करण्याच्या कामीं आपण मला मनःपूर्वक साह्य केलें आहे. तसेंच याहि वेळीं आपण केलें पाहिजे. जातीय दंग्यांना आळा घालण्याच्या कामीं हा प्रयोग जर माझ्या अपेक्षेप्रमाणें यशस्वी झाला, तर सर्व हिंदुस्थानाला उदाहरण घालून दिल्याचं श्रेय आपल्या प्रांताला मिळेल!—"

शेवटीं त्याच्या त्या कळकळीच्या विनंतीला मान देऊन गव्हर्नरसाहेबांनीं आपल्या शिफारसीसह ती योजना हिंदुस्थान सरकारकडे पाठविली.

आणि आश्चर्याची गोष्ट अशी कीं, हिंदुस्थान सरकारनें ती योजना मान्य केली. फक्त त्यांनीं अशी अट घातली कीं, तूर्त नागपूर, जब्बलपूर, रायपूर, उमरावती आणि अकोला या प्रांतांतील पांच शहरांतच ही योजना अमलांत आणून पहावी.

प्रियदर्शननें ती अट मान्य केली आणि प्रांतांतील या पांच शहरांतून प्रयोगादाखल नागरिक संरक्षक दलें स्थापन करण्यासंबंधींचें बिल तयार केलें.

असेंब्लीच्या पावसाळी बैठकीपुढें ठेवावयाचा आपला हा कार्यक्रम तयार करण्याच्या गडबडींत तो असतांनाच एक दिवस उमाकांतानें त्याला विचारलें—

"मोहन भेटायला आला होता का तुला, प्रिया?—"

"नाहीं बुवा! का बरं?—"

"आज सकाळीं पंडितजींच्या मोटारींत दृष्टीस पडला तो मला! म्हणून विचारलं—"

"नाहीं. माझ्याशीं कांहीं त्याचं काम असण्याचा संभव नाहीं." प्रियदर्शननें हंसून म्हटलें.

पण त्याच्या त्या हंसण्यांतली खोंच उमाकांताच्या लक्षांत आली नाहीं.

आणि, प्रियदर्शन आपल्या त्या कार्यक्रमाचें पत्रक तयार करण्याच्या नादांत इतका कांहीं गर्क होता कीं, मोहनबद्दल उमानें विचारलेल्या त्या प्रश्नाचा त्याला तत्क्षणींच विसर पडला.

आपला हा कार्यक्रम सर्वच दृष्टींनीं क्रांतिकारक असून कांग्रेस पक्षांतहि त्याला विरोध होण्याचा संभव आहे, याची प्रियदर्शनला जाणीव होती. म्हणून त्या बाबतींत लोकमत तयार करण्याच्या उद्देशानें तो सर्व कार्यक्रम त्यानें इंग्रजी, मराठी आणि हिंदी अशा तिन्ही भाषां-

तून पत्रकरूपानें प्रसिद्ध करण्याचें ठरविलें. तो कार्यक्रम तयार करतांना जरी हर एक बाबतींत त्यानें उत्तमरावांची मदत घेतली होती, तरी आपल्या इतर सहमंत्र्यांशीं मात्र त्यानें त्यासंबंधीं कांहींहि वाटाघाट केलेली नव्हती. म्हणून 'माझा कार्यक्रम' असें साधें व्यक्तिगत नांव त्यानें त्या पत्रकाला दिलें.

तें पत्रक प्रसिद्ध होतांच त्यावर चहूं बाजूंनीं टीकेचा भडिमार झाला. धंदेवाले आणि मालगुजार, भांडवलवाले आणि कम्युनिस्ट, सनातनी आणि कांग्रेसवाले या सर्वांनाच तो कार्यक्रम आपआपल्या परीनें आक्षेपार्ह वाटला. मालगुजार आणि भांडवलवाले यांना त्या कार्यक्रमांत समाजवाद दिसला; तर कम्युनिस्टांनीं त्याला अर्धवट व म्हणून टाकाऊ ठरविलें. सनातन्यांना तो कार्यक्रम धर्मांत आणि समाजव्यवस्थेंत ढवळाढवळ करणारा वाटला; तर गांधीवाद्यांना त्याला हिंसेची घाण आली.

पण, त्या कार्यक्रमावर अत्यंत विषारी अशी सूचक टीका जर कोणी केली असेल, तर ती 'लोकहित' पत्रानें.

'लोकहिता'नें आपल्या अग्रलेखांत असें म्हटलें होतें कीं, "मुख्य प्रधानांनीं हें पत्रक प्रसिद्ध करतांना 'माझा कार्यक्रम' असें व्यक्तिगत नांव त्याला देण्यांत धूर्तपणा दाखविला आहे, यांत शंका नाहीं. पण या पत्रकाची भाषा हें स्पष्ट दर्शविते कीं, आपण प्रांताचे मुख्य प्रधान असल्याचा विसर त्यांना हा कार्यक्रम तयार करतांना क्षणमात्रहि पडला नव्हता. समाजांतील सगळ्या सुप्रतिष्ठित वर्गांना डिवचण्याचा पण करूनच जणुं कांहीं त्यांनी हा कार्यक्रम तयार केलेला दिसतो. कामगार आणि कास्तकार यांच्या कल्याणाची जरी कांग्रेसला उत्कट कळकळ असली, तरी वर्गकलहाच्या तत्वाला तिचा तीव्र विरोध आहे. पण, प्रस्तुत कार्यक्रमांतील बहुतेक योजना वर्गावर्गांत वैमनस्य उत्पन्न करणाऱ्या आहेत, असें म्हटल्याशिवाय गत्यंतर नाहीं. करवाढीचीं जीं दोन

नवीं बिलें या कार्यक्रमांत दिलीं आहेत, तीं प्रांतिक सरकारच्या अधिकारमर्यादेच्या पलिकडचीं (ultra-vires) आहेत, असें आम्हाला वाटतें; व हीं दोन बिलें आणि जीवनवेतनाचा कायदा हीं जर प्रांताच्या औद्योगिक स्वास्थ्याबद्दल जबाबदार असलेल्या उद्योगमंत्र्यांच्या सहविचारानें तयार करण्यांत आलीं असतील, तर तो एक चमत्कारच समजला पाहिजे. नागरिक संरक्षक दलें उभारण्याची योजनाहि प्रांतिक सरकारच्या अधिकारकक्षेबाहेरची आहे. शिवाय, ही योजना कांग्रेसच्या अहिंसातत्त्वाला सर्वथैव विसंगत आहे, हें निदान कांग्रेस पक्षाला तरी सांगावयाला नको. दारूबंदीचा कार्यक्रम पुढें ढकलण्याचा बेत आणि नागरिक संरक्षक दलांची योजना या प्रस्तुत कार्यक्रमांतल्या दोन महत्त्वाच्या घोषणा करण्यापूर्वी मुख्य प्रधानांनीं महात्माजींचा सल्ला घेतला होता काय ? मुख्य प्रधानांचा हा कार्यक्रम गांधीवादापेक्षां एकंदरींत समाजवादाला जास्त जवळ आहे; व तो तयार करतांना त्यांनीं आपल्या सहमंत्र्यांना विश्वासांत घेतलें असावें, असें आम्हांला वाटत नाहीं. अशा तऱ्हेचा अत्यंत वादग्रस्त आणि वर्गावर्गांत अप्रीति माजविणारा कार्यक्रम कांग्रेसच्या नांवानें प्रांतापुढें मांडला जावा, हें दुर्दैव होय."

'लोकहितां'तली ही टीका जेव्हां उमाकांतानें प्रियदर्शनला वाचून दाखविली, तेव्हां तो हंसून एवढेंच म्हणाला, "उद्याच्या आमच्या खाजगी बैठकींत पंडितजी काय बोलतील याची चांगली कल्पना दिली 'लोकहिता'नं आपल्याला !—"

आणि, दुसऱ्या दिवशीं सकाळीं प्रियदर्शनच्या बंगल्यावर मंत्रिमंडळाची जी अनौपचारिक बैठक भरली, तींत बाहेर घोंघावत असलेल्या या टीकेच्या वादळाचा प्रतिध्वनि जोरानें उमटला.

प्रारंभीं प्रियदर्शननें थोडेंसें प्रास्ताविक भाषण करून आपल्या कार्यक्रमावर दिलखुलास चर्चा करण्याची विनंती आपल्या सहकाऱ्यांना केली.

त्याबरोबर पंडितजींनीं त्याला विचारलें—

" या कार्यक्रमावर आतां चर्चा करण्यांत कोणता फायदा आहे?"

" कां बरं?—"

" आपण तो आपल्या इच्छेप्रमाणं तयार केला, आपल्या जबाबदारीवर छापून प्रसिद्ध केला आणि अशा रीतीनं आमचा सल्ला न घेतां किंवा पक्षाची सभा भरण्याचीहि वाट न पाहतां परस्पर लोकमत विश्वासांत घेतलें. आतां त्यावर चर्चा करून उपयोग काय? मेलेल्या घोड्याला चाबूक मारण्यासारखाच प्रकार आहे हा!—"

" असं कसं म्हणतां आपण? हा कार्यक्रम कच्चा आहे; व आपली सर्वांची आणि पक्षाची संमति घेतल्याशिवाय मी तो असेंब्लीपुढें मांडणार नाहीं—"

" मग आपण तो प्रसिद्ध करण्याची घाई का केली?—"

" त्यांतील कांहीं बिलांवर रण माजण्याचा संभव आहे. तेव्हां लोकमत त्या बाबतींत तयार केलेलं असावं म्हणून मी मुद्दामच तो प्रसिद्ध केला—"

" पण प्रसिद्ध करण्यापूर्वी निदान आम्हांला तरी तो दाखवायला नको होता का?—"

" मी हें पत्रक आपल्याला आधीं दाखविलेलें नाहीं हें खरें; पण त्यांतील बहुतेक प्रश्नांची आपण अनेक वेळां चर्चा केलेली आहे—"

" आणि त्या प्रत्येक वेळीं मी माझा मतभेद आपल्याला स्पष्ट सांगितलेला आहे! म्हणूनच मी म्हणतों कीं, आपलं हें चर्चेचं आमंत्रण मला निव्वळ औपचारिक वाटतं. जीवनवेतनाच्या बिलाला मी प्रतिकूल आहे हें आपल्याला माहित होतं. तरीसुद्धां त्या बिलाचा समावेश आपण या कार्यक्रमांत केला आहे—"

"हो. आपण प्रतिकूल आहांत हें माहित असतांनासुद्धां मी कामगारांना जाहीर सभेंत आश्वासन दिलं—"

"पण ज्या खात्याचा कारभार माझ्याकडे सोपविलेला आहे, त्या खात्याच्या बाबतींत कोणतीहि महत्त्वाची योजना निश्चित करण्याचा अधिकार माझा आहे कीं आपला?—"

"सामान्य परिस्थितींत तो अधिकार आपला आहे, हें कोणीहि कबूल करील. पण असामान्य परिस्थितींत मुख्य प्रधान या नात्यानं सगळीच जबाबदारी माझ्यावर पडते, हें आपल्यालाहि मान्य होईल असें मला वाटतें. नागपुरांत दोन वेळां संप झाल्यानंतर आणि प्रांतांत इतरत्रहि संप होण्याचीं चिन्हं दिसत असतां मला स्वस्थ बसणं शक्य नव्हतं–"

"कामगारांनीं जसे संप केले, तशीच मालकांनींहि आपली बाजू आपल्यापुढं आणि पार्लमेंटरी कमिटीपुढं मांडली होती––"

"हो. म्हणूनच मी प्रातिनिधिक चौकशी कमिटी नेमली आणि तिच्या किमान शिफारसी लक्षांत घेऊन बिल तयार केलें. आपण तें बिल वाचून पाहिलं आहे का?—"

"मला तें वाचण्याची गरज नाहीं. आपण तें तयार केलें आहे; आपणच तें असेंब्लीपुढें मांडा! दुसऱ्याचं मूल स्वतःचं म्हणून कडेवर घेऊन मिरविण्याची माझी इच्छा नाहीं!––"

"ठीक आहे. आपण राजी नसाल, तर मला तें बिल असेंब्लीपुढं मांडावं लागेल. आपल्याला आणखी कांहीं बोलायचं आहे?––"

"दारूबंदीचा पुढील वर्षाचा कार्यक्रम जरूर तर तहकूब करण्याची जी घोषणा आपण या पत्रकांत केली आहे, ती करण्यापूर्वी आपण माझा सल्ला घ्यायला नको होता का?—"

"हो. तो नुसता एक अंदाज आहे, घोषणा नव्हे. निश्चित घोषणा करण्याची ज्या वेळीं गरज वाटेल, त्या वेळीं आपला सल्ला घ्यायला मी चुकणार नाहीं––"

" आपल्यावर या बाबतींत विश्वास ठेवणं अशक्य आहे मला!–"

" का?—"

" करवाढीचीं जीं दोन नवीं बिलं आपण या कार्यक्रमांत घातलीं आहेत, तीं तयार करतांना माझा सल्ला घेणं हें आपलं कर्तव्य नव्हतं का?––"

त्या प्रश्नाला प्रियदर्शन उत्तर देणार, तोंच उत्तमराव मध्येंच म्हणाले, " शेतसारा वीस टक्क्यांनीं कमी करायचं जेव्हां आम्ही ठरवलं, तेव्हां उत्पन्नांतली तूट भरून काढण्यासाठीं करवाढ करणं जरूरच होतं. शिवाय दारूबंदीचा कार्यक्रम अंमलांत आणण्याच्या बाबतींत आपण आग्रह धराल, याचीहि आम्हांला जाणीव होती. म्हणून हीं बिलं आम्ही तयार केलीं––"

" पण तीं तयार करतांना माझा सल्ला घेण्याची आपल्याला गरज वाटली नाहीं असाच या उत्तराचा अर्थ नव्हे का?—"

" नाहीं. या कार्यक्रमांतली अत्यंत अनिश्चित बाब जर कोणती असेल तर ती या बिलांची आवश्यकता ही होय! शेतसारा वीस टक्क्यांनीं कमी करण्याचं जर नक्की ठरलं, तरच हीं बिलं असेंब्लीपुढं आणावी लागतील. तेव्हां या बिलांचा शेतसाऱ्याच्या प्रश्नाशीं असलेला संबंध लक्षांत घेऊन आपण बोलाल तर बरं होईल!––"

पंडितजी कांहीं बोलले नाहींत.

तेव्हां उत्तमराव म्हणाले, " हा कार्यक्रम कच्चा आहे हें आतां आपल्या लक्षांत आलंच असेल?––"

त्यांच्या त्या उद्गारांतली खोंच पंडितजींच्या मर्मीं झोंबली. ते रागानें उसळून उद्गारले—–

" जर हा कार्यक्रम कच्चा आहे, तर तो लोकांपुढं आगाऊ ठेवण्याचा मतलब काय? ज्या योजनांना आपल्या सहकाऱ्यांकडून विरोध

होण्याचा संभव आहे त्या योजनांच्या बाबतींत प्रांतांतील लोकमत चुचकारून आपल्या बाजूला वळवून घ्यावं हाच कीं नाहीं? माझ्या दृष्टीनं मुख्य प्रधानांचं हें सगळं वर्तन अधिकारातिक्रमाचं आहे!—"

"आपण म्हणतां त्याप्रमाणं माझं वर्तन जर खरोखरीच अधिकारातिक्रमाचं असेल, तर तो अधिकारातिक्रम मी स्वेच्छेनें केलेला नाहीं. आपण मला तो करायला भाग पाडलं आहे—"

प्रियदर्शननें अगदीं शांतपणानें पंडितजींना उत्तर दिलें.

"आपलं हें विधान चुकीचं आहे!"

"आपल्याला विसर पडलेला दिसतो. असेंब्लीच्या पहिल्या बैठकीच्या पूर्वी अंदाजपत्रक तयार करण्याच्या वेळेस शेतसारा कमी करण्याबद्दल उत्तमरावांनीं आपल्याला परोपरीनें विनविलें. पण आपण आमच्या शब्दाला मान दिला नाहीं. शेवटीं पक्षाच्या सभेंत निषेध झाल्यामुळं आपल्याला आयत्या वेळीं अंदाजपत्रकांत बदल करावा लागला! शेतसारा कमी करण्याच्या आमच्या योजनेला संमति देऊन आपण जर त्या दृष्टीनं अंदाजपत्रक तयार केलं असतं, तर प्रांतांत ठिकठिकाणीं सारावसुलीविरुद्ध जे सत्याग्रह झाले, ते करण्याचा प्रसंग शेतकऱ्यांवर येता ना! शेतसाऱ्याचा प्रश्न हा कांहीं सर्व प्रांताचा प्रश्न नाहीं, तो फक्त वऱ्हाडचा प्रश्न आहे, असे उद्गार त्या वेळीं आपण खाजगी बैठकींत काढले होते; व एकट्या वऱ्हाडसाठीं म्हणून कांहींहि करायला आपण तयार नव्हता. पण, आतां जबलपूर विभागांत दुष्काळ पडल्यामुळें विदर्भ कॉंग्रेस कमिटीच्या पाठोपाठ जबलपूर कॉंग्रेस कमिटीनें शेतसाऱ्याच्या बाबतींत जे सत्याग्रहाचे ठराव केले आहेत, ते आपण पाहिलेच असतील. ते ठराव अंमलांत येऊन आपल्या मंत्रिमंडळाचें हंसें होऊं नये, म्हणून आम्हाला शेतसारा कमी करण्याची योजना तयार करावी लागली आणि शेतकऱ्यांना धीर वाटावा म्हणून हा

कार्यक्रम प्रसिद्धहि करावा लागला. आम्ही आपला सल्ला घेतल्याशिवाय वागलों असूं, तर तें आपण सल्ला देण्याचें नाकारतां असा अनुभव आल्यामुळें! नागपूरला संप आणि लाठिमार झाल्यावर मी ज्या वेळीं आपल्याला माझ्याबरोबर तिथं चलण्याची विनंती केली, त्याहि वेळीं आपण मला नकार दिला आणि शेवटीं एकट्यानें नागपुरास जाऊन मला संप मिटवावा लागला. प्रांतांत कांग्रेस मंत्रिमंडळ अधिकारारूढ असतांना कामगारांचे संप आणि शेतकऱ्यांचे सत्याग्रह वारंवार होत राहावेत, हा प्रकार कांहीं आपल्याला भूषणावह नाहीं; व मंत्रिमंडळांतील आपल्यासारख्या ज्येष्ठ अनुभविक मुत्सद्द्यानेंच खरोखरी आम्हाला या परिस्थितींत योग्य मार्ग दाखवावयाला हवा होता. पण ती जबाबदारी आपण न घेतल्यामुळं मला इच्छा नसतांना सुद्धां हा अधिकारातिक्रम करणं भाग पडलं!—"

प्रियदर्शन आवेशानें बोलत होता.

पंडितजी अगदीं स्तब्ध होते.

ते कांहीं बोलत नाहींत असें पाहून तो दुसऱ्या दोघां हिंदी दिवाणांना उद्देशून म्हणाला, "आपल्याला कांहीं बोलायचं असेल, तर मोकळ्या मनानं बोला—"

तेव्हां त्यांपैकीं एका दिवाणानें विचारलें, "नागरिक संरक्षक दलासंबंधींचं आपलें हें बिल असेंब्लीपुढं मांडायला ना. गव्हर्नर आपल्याला परवानगी देतील अशी खात्री आहे का आपली?—"

"हो. आधीं तशी स्वतःची खात्री करून घेतल्यावरंच हें बिल नीं आपल्या कार्यक्रमांत समाविष्ट केलें!—"

हें उत्तर देतांना प्रियदर्शनच्या डोळ्यांत खेळलेली अभिमानाची चमक वृद्ध पंडितजींच्या पांढऱ्या शुभ्र भुंवयांनी झांकून गेलेल्या गृध्र नजरेंतून सुटली नाहीं.

"कांग्रेसच्या अहिंसेच्या ब्रीदाला हें बिल विसंगत आहे, असं नाहीं वाटत आपल्याला ?—"

दुसऱ्या दिवाणानें विचारलें.

"नाहीं. त्या दृष्टीनं तर्काच्या अंतिम टोंकाला जायचं म्हणजे सगळं पोलिस खातंच मुळीं रद्द करावं लागेल ! अहिंसेचं या पद्धतीचं आचरण ज्या समाजानं अराज्यवाद अंमलांत आणला आहे, त्या समाजांतच फक्त शक्य होईल ! मला आपलं मत कळलं नाहीं या योजनेबद्दलचं, पंडितजी ?—"

"तें कळण्याची कांहीं विशेष गरज दिसत नाहीं मला !—"

"मर्जी आपली ! माझी अशी अपेक्षा होती कीं, या कार्यक्रमांतल्या कांहीं बाबी बऱ्याच वादग्रस्त असल्यामुळें तो पक्षाच्या सभेपुढं मांडण्यापूर्वी आपलं सर्वांचं त्या बाबतींत मतैक्य व्हावं !—"

"ती अपेक्षा चुकीची होती. जो कार्यक्रम आम्हांला विश्वासांत न घेतां तयार आणि प्रसिद्ध करण्यांत आला, तो पक्षाच्या सभेंत आमच्या नांवावर खपविण्याचा डाव आम्ही यशस्वी होऊं देणार नाहीं !—"

बोलतां बोलतां पंडितजी उठून उभे राहिले.

आणि त्याच क्षणीं मंत्रिमंडळाची ती अनौपचारिक बैठक मोडली.

# पचमढी

त्यानंतर तिसऱ्या दिवशीं सकाळीं प्रातरुपाहार आटोपल्यावर प्रियदर्शन आपल्या अभ्यासिकेंत येऊन बसतो न बसतो, तोंच पंडितजींच्या चपराशानें एक जाड लिफाफा अदबीनें सलाम करून त्याच्या हातीं दिला.

आणि लगेच आपण आणलेल्या पावतीच्या तयार कागदावर सही करण्याची त्याला विनंती केली.

प्रियदर्शननें त्या कागदावर सही करून दिली आणि टेबलावरली पत्रें फाडण्याची हस्तिदंती सुरी घेऊन तो लिफाफा फोडला.

पंडितजींच्या राजीनाम्याचा खलिता होता तो.

त्या खलित्यांत प्रियदर्शनवर पुढील पांच आरोप करण्यांत आले होते—

(१) मुख्य प्रधानांनीं माझ्या वर्तनासंबंधीं संशय घेऊन सी. आय. डी. कडून माझी गुप्त चौकशी करविली.

(२) माझ्या खात्यांत ढवळाढवळ केली.

(३) संयुक्त जबाबदारीचें तत्त्व धाब्यावर बसवलें.

(४) स्वतःच्या सहकाऱ्यांविषयीं अविश्वास बाळगून ना. गव्हर्नरांशीं रहस्य ठेवलें.

(५) कांग्रेसच्या तत्त्वांशीं विसंगत अशा धोरणाचा अवलंब केला.

हे आरोप केल्यावर पंडितजींनीं शेवटीं असें म्हटलें होतें कीं, "अशा तऱ्हेच्या अविश्वासाच्या आणि तत्त्वभ्रष्टतेच्या वातावरणांत, मंत्रिमंडळाची आमूलाग्र पुनर्घटना झाल्याशिवाय, किंवा मुख्य प्रधानांचे अधिकार अत्यंत मर्यादित झाल्याशिवाय, मला कांग्रेसच्या तत्त्वांप्रमाणें काम करणें शक्य दिसत नसल्यामुळें मी निरुपायानें राजीनामा देत आहें."

पंडितजींच्या या खलित्याला दोघां हिंदी दिवाणांनीं आपलें छोटें पत्र जोडलें होतें. त्या पत्रांत त्यांनीं असें लिहिलें होतें कीं, "ना. पं. गदाधरप्रसाद वाजपेयी यांनीं मुख्य प्रधानांवर केलेले आरोप, आमच्या माहितीप्रमाणें, खरे आहेत; व पार्लमेंटरी कमिटीनें त्या आरोपांची चौकशी करून मंत्रिमंडळाची पुनर्घटना करावी, अशी आमची तिला नम्र सूचना आहे."

मात्र या दोघांहि दिवाणांनीं राजीनामा दिलेला नव्हता.

प्रियदर्शन तो खलिता वाचून खालीं ठेवणार, तोंच चपराशानें सकाळचें टपाल आणून त्याच्यापुढें ठेवलें. तेव्हां अगदीं वरतींच असलेला 'लोकहिता'चा अंक त्यानें उत्सुकतेनें फोडून पाहिला. तों त्याच्या पहिल्याच पानावर मोठा थोरला सप्तस्तंभी मथळा त्याच्या दृष्टीस पडला —

**मध्यप्रांत मंत्रिमंडळांत बेबनाव : उद्योगमंत्र्यांचा राजीनामा**

त्या मथळ्याखालीं ना. पं. वाजपेयी यांचें छायाचित्र आणि त्यांच्या राजीनाम्याच्या पत्राचा सारांशहि अंदाजी म्हणून दिला होता.

पण त्या अंदाजी सारांशांत दिलेले प्रियदर्शनवरील पांच आरोप मात्र अक्षरशः बिनचूक होते. ही बातमी दिल्यावर शेवटीं असें म्हटलें होतें कीं, "या राजीनाम्यामुळें बऱ्याच मनोरंजक आणि महत्त्वाच्या गोष्टी बाहेर पडणार असून, सध्याचें मंत्रिमंडळ पदच्युत होण्याचाहि संभव आहे."

प्रियदर्शननें स्वतःशींच हंसून तो अंक खालीं ठेवला आणि दाराशीं उभ्या असलेल्या चपराशाला हांक मारून म्हटलें—

"छोटया साहेबांना जलदी बोलावून आण—"

टपालांतील इतर वृत्तपत्रें प्रियदर्शन चाळीत असतांनाच उमाकांत आंत आला.

पण त्याला बोलावयाला किंवा बसावयाला वेळ न देतां प्रियदर्शननें म्हटलें—

"उमा, तूं आपली गाडी घेऊन उत्तमरावांकडे जा आणि त्यांना घेऊन ये आपल्याबरोबर. म्हणावं अगदीं निकडीचं काम आहे—"

आणि त्यानें पुन्हा टपाल पहावयाला सुरवात केली.

त्यांतील वर्तमानपत्रांवर नजर टाकण्याचें काम बहुतेक झालेंच होतें. म्हणून त्यानें पत्रें फोडून तीं वाचावयाला प्रारंभ केला.

तोंच उत्तमराव आणि उमाकांत आंत आले.

"कां? एवढया तांतडीनं बोलावलं मला?—"

उत्तमरावांनीं खुर्चीवर बसतां बसतां विचारलें.

"हें वाचून पहा. म्हणजे समजेल मी कां बोलावलं तें!—"

प्रियदर्शननें 'लोकहिता'चा अंक त्यांच्या हातीं देत म्हटलें.

उत्तमरावांनीं ती बातमी वाचली आणि उमाकांताच्या हातीं अंक देऊन विचारलें—

"कितीसं तथ्य आहे या बातमींत?—"

"शंभर टक्के खरी आहे ती बातमी! अर्ध्याच तासापूर्वीं पंडितजींकडून हा खलिता आला माझ्याकडे!—"

त्यानें तो लिफाफा उत्तमरावांना दिला.

उत्तमरावांनीं तीं पत्रें काळजीपूर्वक वाचलीं आणि नंतर विचारलें—

"मग काय करायचं ठरवलंय तुम्ही ?—"

"मी काय करावं असं वाटतं तुम्हाला ?—"

"मला वाटतं, तुम्ही पंडितजींच्या राजीनाम्याचा स्वीकार करावा. युक्तप्रांताचे शिक्षणमंत्री पं. प्यारेलाल शर्मा यांनीं जेव्हां राजीनामा दिला, तेव्हां ना. पं. पंत यांनीं त्याचा स्वीकार करून लगेच नव्या दिवाणाची नेमणूक केली, हें लक्षांत असेलच तुमच्या !—"

"हो. पण पंडितजींनी हा राजीनामा मला सादर केलेला नाहीं; पार्लमेंटरी कमिटीच्या अध्यक्षाला सादर केला आहे ! शिवाय त्यांनीं आपल्या पत्रांत माझ्यावर गंभीर स्वरूपाचे आरोपहि केले आहेत—"

"तरीहि मार्ग निघू शकतो या पेंचांतून ! तुम्ही मुख्य प्रधान आणि पक्षाचे नेते आहांत. तुम्ही राजीनामा दिल्याबरोबर हें मंत्रिमंडळ कोलमडून पडेल आणि दुसरं मंत्रिमंडळ लगेच तुम्हांला बनवितां येईल. पंडितजींच्या आरोपांना काय किंमत द्यायची हें आपल्याला माहित आहे; व त्या आरोपांची परवा करण्याचंहि कांहीं कारण नाहीं आपल्याला ! म्हणून मला असं वाटतं कीं, तुम्ही स्वतः राजीनामा देऊन हें मंत्रिमंडळ मोडून टाकावं आणि स्वतःच्या विश्वासांतलं दुसरं मंत्रिमंडळ स्थापन करावं—"

"इतर सामान्य परिस्थितींत तुमची ही सूचना रास्त ठरली असती, उत्तमराव ! पण आपण एका विशिष्ट नाजुक परिस्थितींत काम करीत आहोंत हें लक्षांत घेतलेलं नाहीं तुम्ही—"

"नाहीं. तें लक्षांत घेऊनच बोलतों आहे मी ! हें मंत्रिमंडळ ज्या वेळीं तुम्ही बनवलं, त्या वेळीं जरी पार्लमेंटरी कमिटीच्या अध्यक्षाचा तुम्ही सल्ला घेतला, तरी त्याप्रमाणं वागण्याचं बंधन असं कांहीं तुम-

च्यावर नव्हतं. उलट ‘तुम्हाला योग्य आणि विश्वासार्ह वाटतील असे सहकारी तुम्ही निवडा’ असंच कमिटीच्या अध्यक्षांनीं तुम्हांला बजावून सांगितलं होतं. मग तो त्यांचा सल्ला या प्रसंगीं अंमलांत आणून तुम्ही या पेंचांतून मार्ग का काढूं नये?—”

“नाहीं, उत्तमराव! अशा रीतीनं स्वतःचा मार्ग स्वतः मोकळा करून घ्यायला मी स्वतःचा मालक नाहीं. मी जर फक्त असेंब्लींतील कांग्रेस पक्षालाच जबाबदार असतों, तर तुम्ही म्हणतां त्याप्रमाणं हें मंत्रिमंडळ मोडून नवं मंत्रिमंडळ बनवलं असतं. कारण पक्ष माझ्या-विरुद्ध जाणार नाहीं अशी खात्री आहे माझी. पण मी नुसता कांग्रेस पक्षालाच जबाबदार नाहीं; तर पार्लमेंटरी कमिटी आणि वर्किंग कमिटी या दोहोंनाहि जबाबदार किंवा खरं बोलायचं म्हणजे त्यांचा ताबेदार आहे. माझं मुख्य प्रधानपद त्यांच्या मर्जीवर अवलंबून आहे; केवळ पक्षाच्या पाठिंब्यावर नाहीं. अर्थात् माझ्याविरुद्ध त्यांच्याकडे तक्रार गेली असतां, त्यांचा सल्ला किंवा संमति न घेतां, मी असलं कोणतंहि कृत्य करणं अविचाराचं, स्वार्थाचं आणि कदाचित् भित्रेपणाचंहि होईल. पं. प्यारेलाल शर्मा यांनीं आपला राजीनामा कांहीं पार्लमेंटरी कमिटीकडे पाठविला नव्हता किंवा पं. पतांवर कांहीं आरोपहि केले नव्हते. तो प्रकार निराळा आणि हा प्रकार निराळा!—”

“मग तुम्ही काय करायचं ठरवलंय?”

“मी या आरोपांची पक्षाच्या सभेंत चौकशी व्हावी अशी मागणी करणार आहे—”

“भलतंच कांहीं तरी! तो कलिपुरुष तुमच्यावर काय वाटेल ते आरोप करील. म्हणून काय तुम्ही चौकशीला तयार व्हायचं? त्यापेक्षां राजीनामा दिलेला काय वाईट?—”

“खरं आहे तुमचं म्हणणं, उत्तमराव! मी राजीनामा दिलाहि असता. पण स्वतःवरील आरोप खोटे आहेत असं सिद्ध न करतां जर

मी राजीनामा दिला, तर हा कलंक जन्मभर चिकटून राहील माझ्या चारित्र्याला! म्हणून मी मुद्दामच कमीपणा पदरांत घेऊन चौकशीची मागणी करणार आहे--"

"मला तुमच्या या मागणींत स्वाभिमान कुठं दिसत नाहीं. माफ करा स्पष्ट बोलल्याबद्दल!--"

"तुम्ही म्हणतां तें खरंच आहे एका अर्थानं, उत्तमराव! पण आपल्या सार्वजनिक चारित्र्यावर आपल्या एका जबाबदार सहकाऱ्यानं शिंतोडे उडविले असतां मी राजीनामा देऊन तोंड चुकवणं योग्य होणार नाहीं. ते आरोप खोटे ठरवूनच मला या पेंचांतून मार्ग काढला पाहिजे--"

"तुमच्या या सरळपणामुळंच हा प्रसंग ओढवला आज अखेर--"

"पण या सरळपणाच्या जोरावरच मी हा प्रसंग निभावून नेऊं शकेन अशी खात्री वाटते मला. मात्र तुम्ही मला शेवटपर्यंत साथ दिली पाहिजे आतां, उत्तमराव!—"

"तुमच्याबरोबर मी सुळावर जायलासुद्धां तयार आहे, प्रियदर्शन!"

उत्तमरावांनीं त्याचा हात घट्ट धरून म्हटलें.

"मग मी तार करतों तशी पार्लमेंटरी कमिटीच्या अध्यक्षांना–"

"नको. तुम्ही स्वतः होऊन आधीं कांहींच कळवूं नका! त्यांच्याकडे ज्या अर्थी पंडितजींचा राजीनामा गेलेला आहे, त्या अर्थी ते स्वतःच विचारतील तुम्हाला कांहींतरी. त्यांच्याकडून आधीं काय येतंय तें पहा न् मग त्यांना काय लिहायचं तें ठरवूं—"

पण त्यांना फार वेळ वाट पहावी लागली नाहीं.

कारण उत्तमराव हें बोलत असतांनाच चपराशानें तार आंत आणून दिली.

उमाकांतानें ती घेतली आणि फोडून वाचून दाखविली--

“वाजपेयींचा राजीनामा मिळाला. तुमचें म्हणणें काय आहे तें कळवा.”

“मग आतां तर उत्तर पाठवायला कांहीं हरकत नाहीं ना?--”

प्रियदर्शननें उत्तमरावांना विचारलें.

“नाहीं. मात्र तुम्ही असं कळवा कीं, माझ्यावरील आरोपांची चौकशी पार्लमेंटरी कमिटीनें पक्षाच्या सभेंत करावी, स्वतः अध्यक्षांनीं त्या सभेचें अध्यक्षस्थान स्वीकारावें आणि पक्षाच्या बहुमताचा निर्णय प्रमाण मानला जावा--”

“ठीक आहे. तशीच्च तार करतों मी--”

उमाकांतानें पुढें ठेवलेल्या तारेच्या फॉर्मवर त्यानें उत्तमरावांच्या सूचनेप्रमाणें उत्तराचा मजकूर लिहिला आणि तो फॉर्म त्यांच्या हातीं दिला.

उत्तमरावांनीं तो काळजीपूर्वक वाचला आणि नंतर ते म्हणाले—

“मला अजूनहि असं वाटतं प्रियदर्शन, कीं तुम्ही या प्रसंगीं कोणाचीहि परवा न करतां स्वतंत्रपणानं वागावं आणि स्वतः राजीनामा देऊन नवं मंत्रिमंडळ बनवावं. मी आपला राजीनामा इथल्या इथं लिहून देतों तुम्हाला--”

तेव्हां प्रियदर्शन हंसून म्हणाला, “ती तार जाऊं द्या आधीं! उत्तमराव, मी जर स्वतंत्र मुख्य प्रधान असतों, तर तुमचा सल्ला ताबडतोब अंमलांत आणला असता. पण ज्या कांग्रेस संस्थेचा सेवक म्हणून मी मुख्य प्रधान झालों आहे, तिची या परिस्थितींत मी अवज्ञा करणं योग्य होणार नाहीं--”

“पण या चौकशीपायीं तुमची अवज्ञा होईल तिची वाट काय? मुख्य प्रधानाविरुद्ध त्याच्याच एकाद्या उपद्व्यापी सहकाऱ्यानं कागाळ्या कराव्यात आणि पार्लमेंटरी कमिटीनं त्यांची चौकशी करण्याचा घोळ घालावा, असला प्रकार मंत्रिमंडळाची इभ्रत वाढवायला कारण होइल कीं कमी करायला? मला तर असं वाटतं कीं, पार्लमेंटरी कमिटीच्या

अध्यक्षांचीच फूस असली पाहिजे पंडितजींना या कामीं! त्यांच्या शिफा-रशीप्रमाणं ते कन्हान योजनेचं कंत्राट तुम्ही त्यांच्या त्या कंपनीला दिलं नाहींत न् त्यांनीं सुचविलेल्या माणसांच्या नेमणुकाहि केल्या नाहींत, त्याचा आकस नडतोय हा तुम्हाला!"

"असेलहि कदाचित्! पण माझं चारित्र्य जोंपर्यंत निष्कलंक आहे, तोंपर्यंत पार्लमेंटरी कमिटीला काय, वर्किंग कमिटीला काय किंवा खुद्द महात्माजींना काय भिण्याचं कांहीं सुद्धां कारण नाहीं मला! माझी खात्री आहे कीं, आज जरी मी चौकशीला तयार होण्यांत एक प्रकारचा कमी-पणा स्वतःकडे घेत असलों, तरी त्यामुळं माझं चारित्र्य पुन्हा अधिकच उज्ज्वल झालेलं दिसेल!"

"तुमचा हा चारित्र्याचा अभिमान व्यर्थ आहे, प्रियदर्शन! राजकारणांत चारित्र्याचा प्रभाव पडत नाहीं; कौटिल्याचा पडतो!—"

"महात्माजींना तुम्ही कुटिल म्हणाल का, उत्तमराव? त्यांचा जो अद्वितीय प्रभाव राजकारणांत पडला आहे, तो चारित्र्याचा कीं कौटिल्याचा?—"

"तुम्हीच स्वतः विचार करून पहा आपल्या मनाशीं! गांधींच्या संतपणावर माझा विश्वास नाहीं हें मी अनेकदां उघड बोलून दाखवलंय. हिंदुस्थानांतल्या अडाणी, अंधश्रद्ध, धर्मभोळ्या लोकांना झुलवायला संतपणाचा सोज्वळ मुखवटा फार उपयोगी पडतो, म्हणून तो चढवला आहे त्यांनीं आपल्या तोंडावर! एरवीं एकीकडे कांग्रेसचं चवण्णी सभासदसुद्धां राह्यचं नाहीं आणि दुसरीकडे कांग्रेसच्या वतीनं व्हाइस-रायाशीं बोलणं करण्यासाठीं मात्र स्वतः दिल्ली–सिमल्याच्या वाऱ्या करायच्या या विसंगत वर्तनाचा दुसरा अर्थ काय करणार? राजकार-णांतून आणि पुढारीपणापासून निवृत्त झालेला प्रामाणिक मनुष्य कशाला खेटे घालील व्हाइसरॉयाकडे? आणि वर्किंग कमिटीच्या बैठकींना तरी कशाला हजर राहील? मला तर हा सगळा ढोंगीपणा वाटतो; हें सगळं

पद्धतशीर कौटिल्य वाटतं! स्टालिन, मुसोलिनी, हिटलर किंवा कमाल या जगांतल्या चारी अरेरावांपेक्षां गांधी हा फारच घोटीव अरेराव आहे; न् त्याचे मार्ग फार सूक्ष्म आहेत हें कबूल आहे मला !—"

"पुरे, पुरे उत्तमराव! महात्माजींच्या ठिकाणीं दोष नाहींत असं नाहीं; न् त्यांचं वर्तनहि पुष्कळदां गूढ आणि विसंगत असतं. पण त्यांना ढोंगी मानायला कांहीं मन धजत नाहीं माझं!--"

"आतांपर्यंत दोन वेळां तुम्हांला सल्ला द्यायचा नाकारला त्यांनीं हें खरं ना? याचा अर्थ तुम्ही काय करतां?——"

"याचा अर्थ मी असा करतों कीं, त्यांना प्रांतिक सरकारच्या चिल्लर भानगडींत मन घालायची इच्छा नाहीं--"

"चुकतां तुम्ही! तुम्हांला सल्ला द्यायचं मनांत नव्हतं त्यांच्या म्हणून सल्ला द्यायचं नाकारलं त्यांनीं! जो इसम 'हरिजनां'तून राजाजींची, पंतांची आणि मुन्शींची तरफदारी करण्यासाठीं आपली लेखणी सारखी झिजवतोय, त्याचं काय प्रांतिक राजकारणांत चित्त नाहीं म्हणतां? प्रांतिक राजकारणाच्या भानगडींत न पडण्याइतकं कांहीं गांधीचं मन विशाल आणि निःपक्षपाती नाहीं —"

उत्तमरावांच्या त्या विलक्षण स्पष्टोक्तीमुळें प्रियदर्शनच्या स्वतःच्या मनांत अलिकडे गांधीजींच्या वर्तनाविषयीं ज्या शंका उत्पन्न झाल्या होत्या, त्या जोरानें चाळवल्या गेल्या; व त्याला ती चर्चा नकोशी वाटली. म्हणून त्यानें म्हटलें—

"या विषयावरलीं आपली मतं कधीं जुळण्याचा संभव नाहीं, उत्तमराव! मी तारेचं उत्तर आल्याबरोबर तुम्हाला पुन्हा बोलावून घेईन —"

उत्तमराव थोडेसे रागानेंच खोलींतून बाहेर पडले.

पार्लमेंटरी कमिटीच्या अध्यक्षांचें उत्तर त्या दिवशीं संध्याकाळींच आलें. प्रियदशनची चौकशीची मागणी त्यांनी मान्य केली होती; व

असेंब्लीतील कांग्रेस पक्षाची सभा ताबडतोब बोलावण्याचा त्याला आदेश दिला होता.

ती तार प्रियदर्शननें उत्तमरावांना वाचून दाखवितांच ते त्याला म्हणाले, "असेंब्लीचे अध्यक्ष ना. पं. मिश्रा आणि शेठ गुलाबचंदजी आतांच माझ्याकडे आले होते—"

"कशाला ?—"

"त्यांचं म्हणणं असं आहे कीं, हें भांडण आपसांत मिटवून टाकावं आणि त्यांनीं युक्तिही सुचवली आहे तें मिटविण्याची !—"

उत्तमराव हंसून म्हणाले.

"काय युक्ति सुचविली आहे ?—"

"ती अशी कीं, तुम्ही आपल्याकडे असलेलीं सगळीं खातीं सोडून द्यावीं आणि मुख्य प्रधान या नात्यानं एकंदर कामाकाजावर देखरेख ठेवायचं काम तेवढं करावं !—"

"तें काम करायला ना. गव्हर्नरसाहेब आहेतच कीं ! एक काम करायला दोन माणसं कशासाठीं ? आणि माझ्याकडे जर कोणतंच खातं ठेवायचं नसेल, तर मग मला मुख्य प्रधान तरी कशाला ठेवायचं ? प्रांताच्या तिजोरींत कांहीं पैसा जास्त नाहीं झालेला !—"

"तसं नाहीं. तुमचा आग्रहच असेल तर जंगल आणि वैद्यक हीं दोन खातीं तुमच्याकडे ठेवायला तयार होतील ते ! पण कायदा आणि सुव्यवस्था व राज्यकारभार हीं जीं महत्वाचीं खातीं सध्यां तुमच्याकडे आहेत, तीं सोडायला तयार झालं पाहिजे तुम्ही !—"

"माझ्याकडे सध्यां असलेलीं खातीं मी पंडितजींना द्यावीं आणि जंगल न् वैद्यक हीं खातीं ते मला बहाल करतील, असं म्हणणं आहे एकूण त्यांचं ! मला राजकारणांतून उठवून जंगलांत पाठविण्याची ही त्यांची योजना फार छान आहे ! पण असल्या अटीवर मला मुख्य प्रधान राह्यची इच्छा नाहीं असं कळवा तुम्ही त्या दोघांना—"

"नाहीं. मी त्यांना निराळीच योजना सुचविली—"

"कोणती?—"

"कांहीं झालं तरी प्रांताचें मुख्य प्रधानपद तुमच्याकडे कायम ठेवून समेट करण्याचा त्यांचा आग्रह दिसला! म्हणून मी त्यांना असं सुचवलं कीं, "मुख्य प्रधानांनीं रोज संध्याकाळीं सर्व दिवाणांना आपल्या बंगल्यावर ब्रिज खेळायला बोलवावं, त्या वेळीं दिवसभर झालेल्या कामाची माहिती करून घ्यावी आणि त्या खेळांत जे पैसे मिळतील ते सर्व महात्माजींच्या हरिजनफंडाला द्यावे!" माझी ही सूचना ऐकतांच ते दोघेहि रागानं उठून गेले!—"

उत्तमरावांनीं सांगितलेली ती हकिकत ऐकून प्रियदर्शन मनापासून मोठ्यानें हंसला आणि नंतर त्यानें विचारलें—

"पण गुलाबचंदजी कशाला आले आहेत इथं या वेळीं?—"

"ते एकटेच नाहीं आलेले. त्यांच्याबरोबर मोहनसुद्धां आहे—"

"अस्सं!—"

"अन् ते दोघं का आले असले पाहिजेत हें लक्षांत आलंच असेल तुमच्या—"

"त्यांच्या त्या कंपनीची चौकशी सुरू झाली म्हणूनच कीं नाहीं? पण पंडितजींकडे खेटे घालून हे काय करणार? लॉ अन् ऑर्डरचं खातं अजून कांहीं गेलेलं नाहीं त्यांच्याकडे!—"

प्रियदर्शननें हसून म्हटलें.

"पण पंडितजींकडे तें खातं नसलं म्हणून काय झालं? दाबादाबी करायला न् वाटेल त्या प्रकारचे पुरावे बनवायला त्यांचा उपयोग खात्रीनें होईल! शिवाय, तुमच्यावर जे आरोप पंडितजींनीं केलेले आहेत, ते शाबीत करायच्या कामांत मदत करायलाहि आले असतील ते दोघे!—"

"हो. हें मात्र संभवतं खरं !—"

प्रियदर्शनच्या तोंडून उद्गार बाहेर पडला.

संप मिटविण्यासाठीं तो नागपूरला गेला असतां त्या दिवशीं रात्रीं मोहनशीं झालेल्या संभाषणाचा प्रसंग त्याच्या डोळ्यांपुढें उभा राहिला.

त्या संभाषणानंतर आठ दिवसांच्या आंतच त्या फ्रेंच बाईनें मोहनविरुद्ध पोलिसांत गुदरलेली तक्रार आपसांत तडजोड झाल्यामुळें काढून घेतल्याचें त्याला सिटीसाहेबांनीं कळवलें होतें.

आणि कंपनीचेहि आठ हजार रुपये मोहननें वेळेवर भरल्याची बातमी त्याला समजली होती.

तेव्हां अशा रीतीनें संकटमुक्त झालेला मोहन आपल्याविरुद्ध पुरावा जमविण्याच्या कामीं पंडितजींना मदत करण्यासाठीं इथं आला असावा तर!—

हा विचार मनांत येतांच त्याचा हात एकदम आपल्या टेबलाच्या खाजगी कागदपत्रें ठेवण्याच्या खणाकडे गेला.

पण लगेच त्यानें हात मागें घेतला आणि त्या बाबतींत जास्त कांहीं न बोलतां उत्तमरावांना रजा दिली.

त्यानंतर तीन दिवस समेटाचे प्रयत्न सारखे चालू होते. ना. पं. मिश्रा आणि शेठ गुलाबचंदजी हे दोघेहि त्याच्याकडे तीन वेळां येऊन गेले. पण मोहन मात्र त्याला भेटला नाहीं.

त्या तीन दिवसांत पचमढीवर जणुं महादेवाची यात्रा लोटली. असेंब्लींतील बहुतेक सर्व पक्षांचे सदस्य, प्रांतांतील प्रमुख कांग्रेस कार्यकर्ते, अशा प्रकारच्या धामधुमींत आपला हात साधून घेणारे संधिसाधु, नागपुरांतील प्रतिष्ठित आणि लटपट्या व्यक्ति इत्यादि नाना प्रकारची मंडळी मुख्य प्रधानांच्या चाकशीचा तो समारंभ पहावयाला गोळा झाली. हें मंत्रिमंडळ मोडून नवीन मंत्रिमंडळ स्थापन होणार या

आशेनें कांग्रेस पक्षाचे कांहीं सदस्य त्यांत आपली वर्णी लागावी म्हणून एव्हांपासून खटपटी करीत होते; व दिवसभर एकमेकांच्या पत्रिका पाहून भाकितें वर्तविणें किंवा पैजा मारणें ही त्यांची करमणूक होऊन बसली होती. जे धंदेवाईक ज्योतिषी आणि हस्तसामुद्रिक पचमढीला आले होते, त्यांना मात्र या धांदलींत चांगलाच लाभ झाला. शेठ गुलाबचंदजी, ईश्वरदासजी, मोहन, अण्णासाहेब वगैरे मंडळी पंडितजींच्या बाजूनें सभासदांचीं मनें वळविण्यासाठीं शिकस्तीचे प्रयत्न करीत होती. पंडितजींच्या तर्फे होत असलेला तो मतप्रचार पाहून प्रियंवदेला स्वस्थ बसवेना. तिनें दोन तीन वेळां प्रियदर्शनला सभासदांना जाऊन भेटण्याबद्दल सूचना केली.

तेव्हां प्रियदर्शननें म्हटलें, "माई, हें माझ्या स्वभावांत नाहीं—"

"असं म्हणून कसं चालेल? दद्दा तशी गरज नसतांना सुद्धा असेंब्लीच्या सभासदांना कसे खाने देत असत हें आठवतं ना ? आतां तर काय ही लोकशाही आहे!—"

"पण या लोकशाहीचा खुषमस्कऱ्या बनण्याची माझी तयारी नाहीं, माई!"

आणि खरोखरीच तो त्या तीन दिवसांत कोणाकडे गेला नाहीं. असेंब्लींचे जे सभासद त्याच्याकडे उतरले किंवा त्याला आपण होऊन भेटावयाला आले, त्यांचा सत्कार मात्र त्यानें नेहमींप्रमाणें अगत्यानें केला.

चवथ्या दिवशीं सकाळीं पार्लमेंटरी कमिटीचे सदस्य आले, तेव्हां पक्षाचा नेता आणि मुख्य प्रधान या नात्यानें त्यानें त्यांचें यथोचित स्वागत केलें. पण कोणत्याहि प्रकारची फाजील नम्रता किंवा अगत्य मात्र दाखविलें नाहीं.

कमिटीच्या अध्यक्षांनीं पचमढीला आल्यानंतर एक क्षणभरहि विश्रांति घेतली नाहीं. कांग्रेस पक्षांतील निरनिराळ्या गटांच्या पुढाऱ्यांच्या

त्यांनी भेटी घेतल्या; व नंतर प्रत्येक दिवाणाला व्यक्तिशः बोलावून त्याच्याशीं त्यांनीं या बेबनावाबद्दल चर्चा केली.

प्रियदर्शन आणि उत्तमराव यांचा स्नेहसंबंध त्यांना माहित होता. म्हणून त्यांनीं प्रथम उत्तमरावांना भेटीला बोलावलें; व प्रियदर्शनचें मनोगत त्यांच्याकडून काढून घेण्याचा प्रयत्न केला.

"मुख्य प्रधानांवरील आरोपांबद्दल तुमचं काय मत आहे?—"

"हा मताचा प्रश्न नाहीं. पंडितजी जो काय पुरावा आणतील, त्यावर त्या आरोपांचं महत्त्व अवलंबून राहील. मला कांहींच कल्पना नाहीं त्यांच्याजवळ काय पुरावा आहे याची—"

"तुम्हाला हें भांडण आपसांत मिटावं असं नाहीं वाटत?—"

"अर्थात् वाटतं. कारण प्रांतांतील कांग्रेस पक्षाच्या इभ्रतीवर त्याचा फार अनिष्ट परिणाम होणार आहे—"

"मग तें मिटविण्याचा प्रयत्न तुम्ही का केला नाहीं?—"

"प्रयत्न करण्याच्या पलिकडे सगळया गोष्टी गेल्या आहेत असं मला वाटतं म्हणून!—"

"तें कसं काय?—'

"पंडितजींनीं आपल्याला धाडलेलं राजीनाम्याचं पत्र ज्या दिवशीं मुख्य प्रधानांच्या हातीं पडलं, त्याच दिवशीं तें 'लोकहितां'त प्रसिद्ध झालं! एकदां आरोप जगजाहीर झाल्यावर त्याची चौकशी झाल्याशिवाय समेटाची भाषा बोलणं चुकीचं ठरलं असतं—"

"पण तें पत्र प्रसिद्ध कसं झालं?—"

"ते खरोखरी आपल्याला किंवा पंडितजींनाच माहित!"

उत्तमरावांचे ते उद्गार अध्यक्षांना झोंबले. पण आपला राग गिळून ते अगदीं शांतपणानें म्हणाले—

"मी पंडितजींना जाब विचारणारच आहे त्याबद्दल! पण अजूनहि समेट होऊं शकेल असं मला वाटतं—"

"हो. पंडितजींनीं जर मुख्य प्रधानांवर केलेले आरोप जाहीर रीतीनें परत घेतले, तर समेट होऊं शकेल अजूनहि !—"

"पण आरोप बिनशर्त परत घ्यायला तयार होतील का ते? समेट म्हटला कीं देवाण घेवाण आलीच !—"

"मग पंडितजी कोणत्या अटी घालतील असं आपल्याला वाटतं?-'

"मला अद्याप कांहींच कल्पना नाहीं. पण त्यांच्या पत्रावरून असं दिसतं कीं, मुख्य प्रधानांकडे सध्यां जीं खातीं आहेत, त्यांच्या कारभाराबद्दल महाकोसलच्या मंडळींत बरंच असमाधान असावं!—"

"तें असमाधान दूर करण्याचा अगदीं सोपा उपाय आहे !—"

"कोणता ?—"

"पंडितजींना मुख्य प्रधानपद देणं—"

"तुम्ही थट्टा करतां आहांत—"

अध्यक्षांचा राग त्यांच्या खुनशी, कावेबाज डोळ्यांतून आणि जाड, कळकट ओठांच्या स्फुरणांतून आतां स्पष्टपणानें व्यक्त झाला.

"नाहीं. आपण जितक्या गंभीरपणानं माझ्याशीं बोलतां आहांत, तितक्याच गंभीरपणानं मीहि बोलतों आहे—"

"मग कोणत्या दृष्टीनं तुम्ही उपाय सुचवलात हा ?—"

"पंडितजींचं राजीनाम्याचं पत्र वाचून आपल्या हें लक्षांत आलंच आहे कीं, महाकोसलमधील एका गटाला मुख्य प्रधानांकडे असलेल्या खात्यांचा कारभार पसंत नाहीं. याचाच सरळ अर्थ असा कीं, त्यांना प्रियदर्शन हे मुख्य प्रधान राहायला नको आहेत. पंडितजींच्या पत्रावरून आपण जो निष्कर्ष काढलात, तो मी अगदीं स्पष्ट शब्दांनीं मांडला एवढंच—"

"तुमच्या म्हणण्याचा रोख असा दिसतो की, हें सारं भांडण मुख्य प्रधानपद कोणाकडे रहावं याबद्दल आहे—"

"पंडितजींच्या राजीनाम्याच्या पत्रांतून तसा उघड ध्वनि निघतो. आणि मला त्याबद्दल नवलहि वाटत नाहीं—"

"का बरं?—"

"महाकोसलचा चरितार्थ जरी नागपूर-वऱ्हाडच्या पैशावर चालला असला, तरी असेंब्लींत महाकोसलचे प्रतिनिधि महाराष्ट्रीयांपेक्षां जास्त आहेत. तेव्हां प्रांताचं मुख्य प्रधानपद महाकोसलला मिळावं असं महाकोसलच्या मंडळींना वाटणं अगदीं स्वाभाविक आहे—"

"या चौकशीचा परिणाम काय होईल असं तुम्हाला वाटतं?—"

"चौकशीचा निकाल कांहींहि झाला, तरी हें मंत्रिमंडळ टिकणं शक्य नाहीं—"

"असं का म्हणतां तुम्ही?—"

"मी प्रियदर्शनना असं स्पष्टच्च सांगितलंय कीं, पंडितजींनीं तुमच्याविरुद्ध केलेले आरोप जर त्यांना सिद्ध करतां आले आणि पक्षाचं बहुमत जर तुमच्या विरुद्ध पडलं, तर तुम्ही तत्क्षणींच राजीनामा द्या; इतकंच नव्हे, तर राजकारणांतूनसुद्धां निवृत्त व्हा. उलट पंडितजींना जर आरोप सिद्ध करतां आले नाहींत, तर त्यांनाहि राजीनामा देऊन राजकारणांतून निवृत्त व्हावं लागेल. चौकशीनंतर दोघांनाहि प्रामाणिकपणाचा मार्ग एवढाच शिल्लक उरतो—"

उत्तमरावांचें तें थिनतोड उत्तर ऐकून अध्यक्ष थिजल्यासारखे झाले. त्यांनीं आपल्या टक्कलावरून हात फिरवला आणि थोड्या वेळानें उत्तमरावांना विचारलें—

"मंत्रिमंडळ अशा रीतीनं मोडणं अत्यंत अनिष्ट वाटतं मला. कांग्रेसच्या इभ्रतीवर आणि दराऱ्यावर त्याचे परिणाम फार वाईट होतील. या पेंचांतून मार्ग काढण्यासाठीं तुम्ही मदत केली पाहिजे आम्हाला—"

"तें तर कर्तव्यच आहे माझं!—"

"खात्यांची फेरवाटणी करून हा प्रश्न सुटणार नाहीं कां ?—"

"प्रियदर्शन फेरवाटणीला कबूल होतात की नाहीं, हें विचारून पहा त्यांना आपण! खात्यांच्या फेरवाटणीला त्यांनीं तयार होणं म्हणजे पर्यायानं पंडितजींनीं त्यांच्यावर केलेले आरोप कबूल करण्यासारखंच आहे त्यांनीं! मी जर त्यांच्या जागीं असतों, तर कधींहि कबूल झालों नसतों या गोष्टीला—"

अध्यक्षांच्या कुटिल डोळयांत पुन्हा एकदा रागाची चमक खेळली. पण ते आपला सगळा राग गिळून म्हणाले—

"मग चौकशी होऊं देण्याशिवाय गत्यंतर नाहीं म्हणतां ?—"

"हो, असं दिसतं खरं. एरवी आपण तरी कशी संमति दिली असती चौकशीला ?—"

"कांग्रेस पक्षांत महाकोसलच्या सभासदांचं बहुमत असतां प्रियदर्शननी चौकशीला तयार होणं धोक्याचं नाहीं वाटत तुम्हांला ?—"

"धोका तर आहेच! पण तो त्यांनीं जाणून बुजून पत्करलेला दिसतो—"

"का बरं ?—"

"त्यांची अशी श्रद्धा आहे की, महात्माजींचं राजकारण हें सत्यावर अधिष्ठित झालेलं आहे. त्यामुळं त्यांना असं वाटतं कीं, कांग्रेस पक्षांत जरी महाराष्ट्रीय अल्पसंख्य असले, तरी सत्य आणि चारित्र्य यांना जर कांग्रेसच्या राजकारणांत खरोखरीच कांहीं किंमत असेल, तर या लढयांत बहुमताचा कौल आपल्या बाजूला पडलाच पाहिजे!—"

# सह्याद्रीचा बेलाग सुळका

उत्तमरावांना रजा दिल्यानंतर पार्लमेंटरी कमिटीचे अध्यक्ष आपल्या खोलींत किती तरी वेळ एकटेच सचिंत बसले होते.

खिडकींतून दिसणारा देखावा मोठा रमणीय होता. सायंसूर्याची सुखोष्ण सोनेरी प्रभा पचमढीच्या त्या हिरव्या पिवळ्या पठारावर चौफेर पसरली होती. व्यवस्थित कापलेली हिरवळ, ठिकठिकाणीं उमललेलीं नाना रंगांचीं वासंतिक फुलें आणि मधूनमधून उंच वाढलेलें वाळकें काळें पांढरें गवत वाऱ्याच्या झुळकेनें हललें म्हणजे त्या जुनाट गिरि-शिखराच्या अंगावरील रंगीबेरंगी प्रावरण हलल्यासारखें वाटे. डोंगर-माथ्यावर चहूंबाजूंनीं जागोजाग टेकलेलें स्वच्छ निळें क्षितिज त्याच्या नीलकांतींत दूरदूरचीं धूसर शिखराग्रें बुडून गेलीं होतीं. त्या सुंदर पठारा-वर मधूनच उठलेले उघडेवाघडे, काळेभोर, उंच सुळके! — खिडकींतून समोर दिसणारा तसला एक उंच, बेलाग सुळका पाहून अध्यक्षांच्या

चिंताक्रांत मनांत असा विचार येऊन गेला कीं, महाराष्ट्रीयांची मनोरचना एका परीनें या डोंगरासारखीच नाहीं का? त्यांच्या त्या व्यावहारिक, मोकळ्या, प्रसन्न मनोवृत्तींत करारी ध्येयवादाचा कुठें तरी एक असा बेलाग उंच सुळका असतो कीं, ज्याला कोणत्याहि पार्थिव वासनेचा, कसल्याहि ऐहिक भीतीचा किंवा मोहाचा मलिन स्पर्श होऊं शकत नाहीं. नेव्हिन्सननें आपल्या पुस्तकांत सिंहगडावर झालेल्या टिळकांच्या भेटीचें रोमांचकारी वर्णन केलें आहे. त्याची त्यांना तो भयानक सुळका पाहून आठवण झाली. तानाजीच्या वीरमरणानें पुनीत झालेल्या त्या सिंहगडासारखीच, सांजसकाळीं धुक्यांत अंतर्धान पावणाऱ्या सह्याद्रीच्या त्या बेलाग, एकाकी सुळक्यासारखीच मराठ्यांची मनोवृत्ति नाहीं का? 'मराठा' शब्दावरली ती कोटि!—'मरेल पण हटणार नाहीं'—तीही त्यांना आठवली.

——आज सकाळीं त्यांचें स्वागत करण्यासाठीं आलेल्या प्रियदर्शनच्या त्या विशाल, निर्भय नेत्रांत त्याच उग्र मनोवृत्तीची दीप्ति त्यांना दिसली होती.

गेल्या सहा महिन्यांत त्याच्या काराभाराविषयीं अनेक तक्रारी त्यांच्याकडे आल्या होत्या. पं. वाजपेयी हे तर बारीकसारीक गोष्टीसुद्धा त्यांना कळवीत असत. म्हणून केव्हां केव्हां त्यांनीं त्याला सूचक लिहून पाहिलें. पण त्याच्या धोरणाचा ताठरपणा कांहीं कमी झाला नाहीं. विशेषतः, भांडवलवाल्यांचें शिष्टमंडळ त्यांच्याकडे येऊन गेल्यावर जीवन-वेतनाचें बिल आणण्याची घाई करूं नये, उलट मुंबईच्या मंत्रिमंडळा-प्रमाणें संपांना आळा घालण्यासाठीं जरूर तर औद्योगिक तंट्यांचें बिल आणावें, अशी सूचना जेव्हां त्यांनीं प्रियदर्शनला केली, तेव्हां 'अशा प्रकारचें बिल आणणें हें माझ्या राजकीय तत्त्वज्ञानाला सोडून होईल,' असें स्पष्ट उत्तर त्यानें अध्यक्षांना दिलें होतें.

गेल्या सहा महिन्यांतले असले सगळे प्रकार त्यांना आठवले आणि त्यांच्या मनांत आलें, इतका ताठ, इतका करारी माणूस आपण किती दिवस निभावून नेऊं शकूं?

पंडितजींनी लिहिलें तें खरेंच आहे. आपल्या राजीनाम्याच्या खलित्याबरोबर पंडितजींनीं जें गुप्त, व्यक्तिगत पत्र त्यांना लिहिलें होतें, त्यांत स्पष्टच म्हटलें होतें कीं, पक्षाच्या शिस्तीचा लगाम तो फार दिवस सहन करणार नाहीं. तसा प्रसंग येऊन तो अनावर होण्याच्या आधींच !—

पण त्याला काढणार कसा ? आणि आज प्रांतिक कांग्रेस पक्षांत तरी त्याच्या इतका बुद्धिमान्, कर्तबगार आणि चारित्र्यवान् माणूस दुसरा कोण आहे? पंडितजी घालमेली करण्यांत हुषार आहेत. पण त्यांचें चारित्र्य ? आज दुपारी शेठ गुलाबचंदजींनीं आपल्या त्या नव्या पोकळ कंपनीविरुद्ध सुरू झालेल्या पोलिस चौकशीचें गाऱ्हाणें गातांना साऱ्या गोष्टी सरळच कबूल केल्या होत्या.

छे, त्याला काढणें शक्य नाहीं; निदान आज तरी शक्य नाहीं. पक्षाच्या बहुमताचा कल उघडउघड त्याच्याकडे आहे. आणि या चौकशींतूनहि जें कांहीं निष्पन्न होईल तें त्याला अनुकूलच रहाणार. त्याची चौकशीची मागणी ज्या वेळीं आपण मान्य केली, त्या वेळीं फक्त एकच बाजू आपल्याला पंडितजींकडून कळली होती. पण, आज इथें आल्यापासून जे एक एक प्रकार आपल्या कानांवर आले, ते किती विलक्षण !

अर्थात् त्याला काढणें अशक्य आहे. पण या एकंदर प्रकरणाला आपण असें वळण दिलें पाहिजे कीं, त्यामुळें तो आपण होऊन निघेल. तो हट्टी आहे, करारी आहे, स्वतःच्या शब्दाचा आणि चारित्र्याचा त्याला फार अभिमान आहे. त्या अभिमानाला डिवचून, त्याचा शब्द खोटा पडण्याचा, त्याचा करारीपणा कसाला लावण्याचा प्रसंग आणून !
—होय, तेवढाच एक सोज्ज्वळ मार्ग त्याला राजकीय आत्महत्या करावयाला लावण्याचा, स्वतःच्या हातांनीं स्वतःचा मृत्युलेख लिहावयाला लावण्याचा दिसतो.

पण आज—आज ती चौकशी आधीं टाळतां आली तर टाळली पाहिजे. नाहीं तर वाजपेयींसारखा आपला विश्वासू हस्तक राजकारणांतून कायमचा उठण्याचा प्रसंग येईल. पक्षाच्या सभेंत ही चौकशी न होतां जर पार्लमेंटरी कमिटीनें ती गुप्त रीतीनें करावी असें ठरलें असतें, तर आपण कसेंहि करून या वाजपेयीला वाचवला असता. पण पक्षाच्या सभेंत चौकशी करण्याच्या प्रियदर्शनच्या मागणीला आपण मान्यता देऊन चुकलों. आणि पक्षाच्या बहुमतावर आपण कोणत्याहि प्रकारचें दडपण उघडपणें आणूं शकत नाहीं. तेव्हां, आतां जे पंधरा सोळा तास पक्षाच्या सभेला उरले आहेत, तेवढ्या वेळांत ही चौकशी टाळण्याचे शक्य ते सारे प्रयत्न केले पाहिजेत.

हा विचार मनांत येतांच ते उठले आणि आंतल्या दिवाण-खान्यांत आराम करीत पडलेल्या आपल्या तिघां सहकाऱ्यांकडे गेले.

त्यांच्याशीं त्यांनीं बराच वेळ खलबत केलें; व नंतर असेंब्लीचे अध्यक्ष ना. पं. मिश्रा, प्रांताध्यक्ष शेठ गुलाबचंदजी आणि प. वाजपेयी यांना त्यांनीं बोलावणें पाठविलें.

त्या सात जणांनीं वाटाघाट करून तडजोडीचा पुढील मसुदा तयार केला—

"मुख्य प्रधान ना. ठाकूर आणि उद्योगमंत्री ना. पं. वाजपेयी यांच्यांत उद्भवलेल्या वादासंबंधीं त्यांची पार्लमेंटरी कमिटीच्या सभासदां-समक्ष दिलखुलास चर्चा झाली; व ना. पं. वाजपेयी यांच्या सर्व शंकांचें निरसन करण्यांत आलें. ना. ठाकूर आणि ना. पं. वाजपेयी यांच्यांत आतां पूर्ण दिलजमाई झाली असून, मध्यप्रांत मंत्रिमंडळाचे सर्व सदस्य हे संयुक्त कुटुंबाच्या घटकांप्रमाणें यापुढें एकोप्यानें वागतील अशी पार्लमेंटरी कमिटीला खात्री वाटते."

पण प्रियदर्शनशीं बोलणें करून या मसुद्यावर तडजोड घडवून आणण्याची जबाबदारी ना. पं. मिश्रा आणि शेठ गुलाबचंद या दोघां-

पैकीं कोणीहि पत्करीना. शेवटीं अध्यक्षांनीं स्वतःच प्रयत्न करून पाहण्याचें ठरविलें.

आणि रात्रीं नवाच्या सुमाराला प्रियदर्शनला त्यांनीं आपल्या भेटीसाठीं बोलावलें.

उत्तमरावांनीं अध्यक्षांशीं आपली जी मुलाखत झाली, तिची सर्व हकीगत त्याला सांगितलीच होती. त्यामुळें तो मनाचा निश्चय करूनच त्यांच्या भेटीला आला. प्रथम थोडी औपचारिक प्रश्नोत्तरें झाल्यावर अध्यक्षांनीं एकदम त्याला विचारलें—

"मग उद्या सकाळीं नऊ वाजतां ठरल्याप्रमाणें पक्षाची सभा बोलावली ना तुम्ही ?"

"हो. का बरं ? आपल्या विचारांत कांहीं बदल झाला का ?—"

"बदल काय होणार ? पण, प्रियदर्शन, तुमचं हें भांडण कौटुंबिक आहे न् तें आपसांत मिटवलेलं बरं असं नाहीं वाटत तुम्हांला ?—"

"पण हें कौटुंबिक भांडण चावडीवर कुणी नेलं ? मी खास नव्हे !—"

"पंडितजींची चूकच झाली ती ! मी पुष्कळ दोष दिला त्याबद्दल आतांच त्यांना ! झालं तें झालं. पण आतां यांतून कांहीं मार्ग निघतो कीं नाहीं हें बघायला नको का आपण ?—"

"आपण सुचवा. माझी मुळींच इच्छा नाहीं वाद वाढवायची—"

"मी तरी तेंच म्हणतों ! मघांशीं मी पंडितजींना मुद्दाम बोलावून घेतलें; न् नंतर आम्ही सर्वांनीं मिळून हा मसुदा तयार केला—"

त्यांनीं प्रियदर्शनच्या हातीं मसुद्याचा कागद दिला.

प्रियदर्शननें तो मसुदा काळजीपूर्वक वाचून त्यांना परत दिला.

पण तो कांहींहि बोलला नाहीं.

तेव्हां अध्यक्षांनीं त्याला विचारलें "तुम्हांला कसा काय वाटतो हा मसुदा ?—"

"मसुदा छान आहे! पण त्यांत एक दुरुस्ती करायला हवी असं वाटतं मला--"

"कोणती दुरुस्ती? आम्ही जरूर विचारांत घेऊं ती--"

"मसुद्यांत असं वाक्य आहे की, "...व ना. पं. वाजपेयी यांच्या सर्व शंकांचें निरसन करण्यांत आलें.' त्याच्याऐवजीं 'व ना. पं. वाजपेयी यांनीं ना. ठाकूर यांच्यावर केलेले सर्व आरोप परत घेतले.' असं वाक्य घालायला हवं!--"

प्रियदर्शननें सुचविलेली ती दुरुस्ती ऐकतांच अध्यक्ष क्षणभर कांहीं बोलले नाहींत. त्यांनीं आपल्या टक्कलावरून एकवार हात फिरविला आणि नंतर ते म्हणाले--

"तुम्ही सुचविलेल्या दुरुस्तीचं मर्म लक्षांत आलं माझ्या! पण ती नाहीं केली तर चालणार नाहीं का? हें पहा, प्रियदर्शन, तुम्ही पक्षाचे नेते आहांत. पक्षाची प्रतिष्ठा कायम टिकविण्याची सगळी जबाबदारी तुमच्यावर आहे. तुम्ही केवळ वैयक्तिक मानापमानाच्या दृष्टीनं या प्रश्नाकडे बघूं नका--"

"छे छे! मी पक्षाच्या प्रतिष्ठेच्या दृष्टीनेंच या प्रश्नाकडे पहातों. जो मनुष्य तत्वभ्रष्ट आणि सहकार्याला नालायक असल्याचा डांगोरा जगभर पिटला गेला आहे, त्याच्यावरले ते आरोप पूर्णपणें खोटे होते असं जाहीर झाल्याशिवाय त्याची अब्रू साफ होईल का? आणि ज्याची अब्रू साफ झालेली नाहीं असा मनुष्य पक्षाचा नेता राहिल्यानं त्याच्या प्रतिष्ठेला बाध येतो असं आपल्याला वाटत नाहीं का? मी त्याच दृष्टीनं ही दुरुस्ती सुचवली आहे--"

"याचा अर्थ असा कीं, पंडितजींनीं तुमची माफी मागावी--"

"आपण गैरसमज करून घेत आहांत. मी पंडितजींनीं माफी मागावी असं म्हणत नाहीं. फक्त आरोप परत घ्यावेत असं म्हणतों."

"मग यांत तडजोडीला वाव कुठं रहातो?"

"नाहींच रहात. आरोप सपशेल परत घेणं किंवा आरोपांची चौकशी करणं एवढे दोनच मार्ग या वादांतून बाहेर पडायला दिसतात--"

या त्याच्या उद्गारावर अध्यक्ष बराच वेळ कांहीं बोलले नाहींत. ते अगदीं स्तब्ध होते. त्यांच्या कपाळावर भुंवयांजवळ वारंवार पडणाऱ्या आंठ्या त्यांच्या विचारांचा वेग आणि आवेग दर्शवीत होत्या. शेवटीं ते अगदीं सावकाश म्हणाले—

"मीं ज्या वेळीं तुमची चौकशीची मागणी मान्य केली, त्या वेळीं येथील परिस्थितीची मला फारशी कल्पना नव्हती. पण इथं आल्यावर मला असं दिसून आलं कीं, या चौकशीचे परिणाम फार अनिष्ट होतील. म्हणून मी तडजोड घडवून आणायला इतका उत्सुक आहे. पण तुम्हांला तडजोड नकोय असं दिसतं मला—"

प्रियदर्शन कांहीं बोलला नाहीं.

शेवटीं अध्यक्ष आपल्या करड्या, हुकमी आवजांत म्हणाले, "तुम्ही अजून विचार करा आणि मध्यरात्रीं, पहांटे केव्हांहि मला कळवा. तडजोड झाली नाहीं तर परिणाम फार भयंकर होतील---"

प्रियदर्शननें तें त्यांचें हुकूमवजा भाषण मुकाट्यानें ऐकून घेतलें. आणि नंतर तो अगदीं विनम्रतेनें म्हणाला, "उद्यां सकाळीं मी बरोबर पावणे नवाला मोटार पाठवीन आपल्याकडे--"

अध्यक्ष कांहीं बोलले नाहींत.

तो नमस्कार करून बाहेर पडला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं नऊ वाजतां पक्षाच्या सभेला प्रियदर्शनच्या बंगल्यावर प्रारंभ झाला. पक्षाचे पचमढीला आलेले सर्व सभासद, पार्लमेंटरी कमिटीचे सदस्य, असेंब्लीचे अध्यक्ष ना. पं. मिश्रा, प्रांताध्यक्ष शेठ गुलाबचंदजी आणि इतर निमंत्रित मंडळी सभेला हजर होती. वृत्तपत्रांच्या वार्ताहरांना सभेला हजर रहावयाला मज्जाव करण्यांत आला होता.

प्रथम अध्यक्षांनीं थोडक्यांत भाषण करून मंत्रिमंडळांतील बेबनावाबद्दल खेद व्यक्त केला; व या चौकशींतून कांहींहि निष्पन्न झालें तरी आपसांत फट पडणार नाहीं अशा धोरणानें या वेळीं पक्षानें वागलं पाहिजे असा इषारा दिला.

त्यानंतर ना. पं. वाजपेयी यांचें भाषण झालें.

त्यांनीं प्रथम आपलें राजीनाम्याचें पत्र वाचन दाखविलें; व मग आपल्या सहकाऱ्यावर अशा तऱ्हेचे आरोप आपण निरुपायानें करीत आहोंत असा खुलासा केला.

नंतर ते म्हणाले, "या आरोपांचं समर्थन करायचं म्हणजे पुष्कळ गोष्टी मला इथं सांगाव्या लागतील. त्या सांगणं हें पक्षहिताच्या आणि कारभाराच्या गुप्ततेच्याहि दृष्टीनं कितपत इष्ट होईल याबद्दल माझं मन साशंक आहे. शिवाय पुष्कळ गोष्टी अशा असतात कीं, त्या आपल्याला जाणवतात, समजतात पण सिद्ध मात्र करतां येत नाहींत. उदाहरणार्थ, मुख्य प्रधानांनीं सी. आय. डी. कडून मजवर नजर ठेवली हाच आरोप घ्या. मला स्वतःला ही गोष्ट अनुभवानं जाणवलेली आहे. पण ती सिद्ध कशी करणार ? कोणता पोलीस अंमलदार मुख्य प्रधानासारख्या आपल्या खात्याच्या सर्वाधिकाऱ्याविरुद्ध साक्ष द्यायला तयार होईल ? पण सी. आय. डी. चा ससेमिरा माझ्या मागें लागला असल्याचं मला प्रत्यक्ष जाणवलं. म्हणूनच मी तसा स्पष्ट आरोप मुख्य प्रधानांवर केला आहे. मी त्यांच्यावर केलेल्या दुसऱ्या आरोपाचा अगदीं ताजा पुरावा आपल्यापुढें आहेच. त्यांनीं आपला जो कार्यक्रम छापून प्रसिद्ध केला आहे. त्यांत माझ्या खात्या-संबंधींच्या ज्या ज्या योजना दिलेल्या आहेत, त्यांपैकीं एकहि माझ्या सल्ल्यानें किंवा संमतीनें तयार केलेली नाहीं. मंत्रिमंडळाच्या अनौप-चारिक सभेंत मी या त्यांच्या अरेरावीपणाचा निषेधहि केला. आमच्या-कडे सोंपवलेल्या खात्यांच्या कारभारांत मुख्य प्रधान जर अशा रीतीनें

ढवळाढवळ करणार असतील तर तीं खातीं आमच्याकडून काढून घेतलेलीं काय वाईट ? माझे मित्र शिक्षणमंत्री ना. पं. बलदेवप्रसाद अवस्थी यांचाहि अनुभव असाच आहे. शाळाकॉलेजांतून निशाणबाजीचें शिक्षण सुरू करण्याची योजना मुख्य प्रधानांनीं त्यांची संमति न घेतां परस्परच अंमलांत आणली. संयुक्त जबाबदारीचें तत्त्व त्यांनीं प्रथमपासूनच पद्धतशीर रीतीनें धाब्यावर बसविलें आहे. त्यांचा कार्यक्रम हें त्यांच्या अरेरावी धोरणाचें मूर्तिमंत प्रत्यंतर होय. आमच्यांपकी कोणाचाहि सल्ला न घेतां—मुख्य प्रधानांचे परम स्नेही ना. देशमुख हे अर्थातच अपवाद होत —त्यांनीं हा कार्यक्रम तयार केला; व नंतर तो आमच्यावर लादण्याची खटपट केली. या त्यांच्या कृत्याची चीड येऊनच मी राजीनामा दिला. मंत्रिमंडळाच्या सदस्यांपैकीं आम्हा तिघांवर त्यांचा विश्वास नाहीं; व माझ्याविषयीं तर त्यांनीं घेऊं नये त्या शंका घेतल्या आहेत. नागपूरला नुकताच घडलेला संप हा मी घडवून आणला असा पुरावा पैदा करण्याची खटपट त्यांनीं केली—

"आरोप सिद्ध करा—"

महाराष्ट्रीय सभासदांतून एक आवाज उठला.

"होय. थोडया धीरानें घ्या! मी आपली जबाबदारी ओळखूनच विधानें करतों आहें. मुख्य प्रधानांचे सोशॅलिस्ट पक्षांतील एका काळचे सहकारी श्री. मुरलीमोहनजी यांना, ज्या दिवशीं संप मिटला त्या दिवशीं रात्रीं, आपल्या बंगल्यावर बोलावून त्यांच्याकडून, 'माझ्या चिथावणीनें संप झाला', असें लिहून घेण्याचा प्रयत्न मुख्य प्रधानांनीं केला. मुरलीमोहनजींना त्यांनीं आमिषही दाखविलें. पण त्यांनीं तसें कांहीं लिहून देण्याचें नाकारलें. त्यांना या प्रकाराची इतकी कांहीं चीड आली कीं, त्यांनीं स्वतःच मला पत्र लिहून हा प्रकार कळवला—"

"पत्र वाचून दाखवा—"

एक हिंदी सभासद मध्येंच ओरडले.

पण अध्यक्षांची तें पत्र वाचलें जावें अशी इच्छा नव्हती. म्हणून त्यांनीं प्रियदर्शनकडे बघून विचारलें—

"तें पत्र वाचलें जावें असा सभासदांचा आग्रह आहे काय?"

"नाहीं. तें पत्र वाचून दाखविण्याची कांहीं गरज नाहीं—"

प्रियदर्शननें म्हटलें.

त्याबरोबर सभासदांत सुरू झालेली चुळबुळ एकदम थांबली.

आणि पंडितजींनीं पुन्हा बोलावयाला प्रारंभ केला—

"तें पत्र वाचल्यावर माझ्या मनांत असा विचार आला कीं, मुख्य प्रधान हे जर स्वतः मला आपला शत्रु समजतात तर आपण मंत्रि-मंडळांत रहाण्यांत काय अर्थ आहे? ही त्यांची वृत्ति मंत्रिमंडळाच्या गेल्या आठवड्यांतील अनौपचारिक बैठकींत जेव्हां मला उघड दिसून आली, तेव्हां मी राजीनामा देण्याचें ठरविलें. आम्हां तिघांपेक्षां ना. गव्हर्नर त्याना अधिक जवळचे वाटतात; व केव्हां केव्हां आपल्या योजनांना त्यांची संमति आगाऊ मिळवून आम्हांला कळविल्याशिवाय ते त्या अंमलांत आणीत असतात. निशाणबाजीच्या शिक्षणाच्या बाबतींत असाच प्रकार घडला. नागरिक संरक्षक दलाची जी योजना त्यांनीं आपल्या कार्यक्रमांत दिली आहे, तिलाहि ना. गव्हर्नरांची आगाऊ संमति त्यांनीं घेतली असावी असें त्यांच्या बोलण्यावरून आम्हांला वाटलें. हें त्यांचें वर्तन संयुक्त जबाबदारीच्या तत्त्वाला आणि कांग्रेसच्या ब्रीदालाहि विसंगत आहे, असें आपल्याला वाटत नाहीं काय? आणि आपल्या सहकाऱ्यांना विश्वासांत न घेतां ना. गव्हर्नराशीं रहस्य ठेवण्याचें हें त्यांचें धोरण आम्हांला जर उपमर्दकारक वाटलें असलें, तर त्याबद्दल आपण आम्हांला दोष द्याल काय? आपल्या स्वपक्षीय सहकाऱ्यांपेक्षां मुख्य प्रधानांना ना. गव्हर्नर हे अधिक विश्वासार्ह वाटावेत हें प्रांतांतील कांग्रेस पक्षाचें खरोखरी दुर्दैव होय!—"

शेवटीं दारूबंदीच्या कार्यक्रमाविषयींचा मुख्य प्रधानांचा अनुत्साह आणि अहिंसातत्त्वाला विरोधी अशी लष्करी संघटनेविषयींची त्यांची उत्सुकता यांचा खेदपूर्वक निर्देश करून पंडितजींनीं आपलें भाषण संपविलें.

त्याबरोबर एकदम दोन तीन सभासद प्रश्न विचारावयाला उभे राहिले.

पण अध्यक्षांनीं असें सांगितलें कीं, आजच्या सभेंत कोणालाही प्रश्न विचारण्याची परवानगी दिली जाणार नाहीं; व त्यांनीं लगेच प्रियदर्शनला भाषण करण्याची सूचना केली.

प्रियदर्शन म्हणाला, "पंडितजींचा माझ्यावर मुख्य आरोप असा आहे कीं, माझें वर्तन कांग्रेसच्या तत्त्वांना सोडून आहे व स्वतःच्या सहकाऱ्यांऐवजी ना. गव्हर्नरांशीं माझें रहस्य आहे. दारूबंदीच्या कार्यक्रमाविषयींचा माझा अनुत्साह आणि निशाणबाजीचें शिक्षण देण्याची व नागरिकदलाची माझी योजना हीं तीन उदाहरणें त्यांनीं या बाबतींत दिलीं. दारूबंदीच्या कायक्रमाविषयी पंडितजींच्या इतका उत्साह मला नाहीं हें मी अनेकदां स्पष्ट सांगितलें आहे; व त्याचें कारणहि उघड आहे. प्रांतांतील शेतकरी हा साऱ्याच्या आणि कर्जाच्या ओझ्याखालीं दडपला गेला असतां, त्याच्या घरादारांचे लिलांव होत असतां आणि शेतकीचीं अवजारें सुद्धा वसुलीपायीं जप्त केलीं जात असतां तिकडे दुर्लक्ष करून दारूबंदीसाठीं लाखों रुपये गमवायला जो नैतिक उत्साह लागतो तो खरोखरच माझ्या ठिकाणी नाही. दारू हें शहरांचें व्यसन आहे; नागर जीवनाचा रोग आहे; भांडवलशाहीचा एक दुष्परिणाम आहे. या रोगाचा नायनाट करणें जरूर आहे हें मला समजत नाही असें आपल्याला वाटतं का? पण वर्षानुवर्ष चाललेली नापिकी आणि सारावसुलीचा जुलूम यांच्यामुळें मरगळीला आलेल्या लक्षावधि शेतकऱ्यांचें दैन्य दूर करण्याचा प्रश्न मला अधिक निकडीचा वाटतो त्याला मी काय करूं? असेंब्लीची

पहिली बैठक भरण्यापूर्वी अंदाजपत्रकाचा विचार करण्यासाठीं पक्षाची जी सभा भरली होती, तिच्यांत घडलेला प्रकार आपल्या आठवणींत ताजाच असेल. माझे मित्र उत्तमरावजी यांनीं शेतसारा निदान दहा टक्क्यांनीं तरी कमी करा अशी पंडितजींची त्या वेळीं परोपरीनें विनवणी केली. पण, पंडितजींचें हृदय आमच्या विनवण्यांनीं द्रवलें नाहीं; व एकट्या वऱ्हाडच्या शेतकऱ्यासाठीं सर्व प्रांताला नुकसान सोसण्याचें कांही कारण नाहीं, असे उद्गार त्यांनीं काढले. वऱ्हाडच्या शेतकऱ्याच्या कमाईतील पन्नास लाख रुपये दरसाल महाकोसलच्या संसारावर खर्च होतात, याचा पंडितजींना तेव्हां विसर पडला. पण पक्षाच्या सभेंत आपण सर्वांनीं त्यांच्या या धोरणाचा धिक्कार केला आणि त्यांना आयत्या वेळीं अंदाजपत्रकांत बदल करणें भाग पडलें. आजहि मी जो आपला कार्यक्रम प्रसिद्ध केला आहे, त्यांतल्या शेतसारा वीस टक्क्यांनी कमी करण्याच्या योजनेला त्यांचा प्रछन्न विरोध आहेच. खुद्द त्यांच्या महाकोसलमध्येंच आज दुष्काळानें गांजलेले सिहोऱ्याचे शेतकरी सत्याग्रहाची तयारी करीत असल्यामुळेंच त्यांना आज उघड विरोध करण्याचें धैर्य होत नाहीं. शेतसारा कमी केल्यामुळें प्रांताच्या उत्पन्नांत जी तूट पडेल, ती भरून काढण्यासाठीं योजिलेल्या करवाढीच्या बिलांना मी पंडितजींची आगाऊ संमति घेतली नाही, हें खरें. पण आपणच विचार करा की, प्रांतांत सर्वत्र सत्याग्रहाची उठावणी चालू असतां, जे पंडितजी सारा कमी करण्याची गोष्ट काढूं देत नाहीत, त्यांच्याशी या बिलांसंबंधी आगाऊ वाटाघाट करण्यांत काय फायदा होता ? नागपूरला संप आणि लाठीमार झाल्याचें कळतांच मी त्यांना माझ्याबरोबर तेथें येण्याची विनंती केली. पण ते आले नाहींत आणि चौकशी कमिटीच्या शिफारशींना धरून जें जीवनवेतनाचें बिल मी तयार केलें आहे तेंहि असेंब्लीपुढें मांडण्याचें त्यांनी नाकारलें आहे. वस्तुस्थिति अशी आहे कीं, माझ्या कार्यक्रमांतील सर्व योजनांबद्दल मी त्यांच्याशीं चर्चा करण्याचा प्रयत्न

केला आहे. पण त्या सर्व योजनांना त्यांनीं सरसकट विरोध दर्शविल्यावर मी जर शेवटीं माझ्या आणि उत्तमरावांच्या जबाबदारीवर आपल्या योजना तडीस नेण्याचें ठरविलें असलें तर त्यांत दोष कोणाचा? प्रांताच्या स्वास्थ्याची आणि प्रजेच्या संतोषाची जबाबदारी मुख्य प्रधान या नात्यानें जोंपर्यंत माझ्यावर आहे, तोंपर्यंत माझे सहकारी कसेहि वागले तरी प्रसंगीं त्यांच्या मतभेदाला न जुमानतां मला माझें कर्तव्य केल्याविना गत्यंतर नाहीं—"

"ऐका, ऐका—"

"माझ्या भाषणांत कृपा करून अडथळा आणूं नका. शाळा-कॉलेजांतून निशाणबाजीचें शिक्षण देण्याचा प्रश्न जेव्हां मी उपस्थित केला, तेव्हां पंडितजी आणि बलदेवप्रसादजी या दोघांनींही अहिंसेच्या दृष्टीनें त्याला विरोध केला. मला स्वतःला अहिंसेचें तत्त्व आजच्या समाज-स्थितींत तरी व्यवहार्य वाटत नाहीं; व मुंबई, कानपूर वगैरे ठिकाणीं संप किंवा दंगे मोडण्यासाठीं पोलिसांनीं केलेल्या लाठीमाराचें जें समर्थन स्वतः महात्माजींनीं केलें आहे, त्यावरून त्यांनाहि आत्मरक्षणा-पुरती आणि शांततारक्षणासाठींहि हिंसा मान्य असावी असें दिसतें. आत्मरक्षणाचें सामर्थ्य एकंदर समाजांत आणि विशेषतः नव्या पिढींत उत्पन्न व्हावें व समाजाच्या रक्षणाची जबाबदारी स्वीकारण्याचीहि वृत्ति त्यांच्या ठिकाणीं निर्माण करावी, या हेतूनेंच मी निशाणबाजीचें शिक्षण आणि नागरिक दलांची उभारणी या दोन योजना हातीं घेतल्या आहेत. या दोन्ही योजना हत्यारांच्या कायद्याच्या कक्षेंत येतात, हें आपल्याला माहितच आहे. तेव्हां त्या बाबतींत ना. गव्हर्नरांची आगाऊ संमति मिळविण्याचा प्रयत्न मी केला, यांत माझें कुठें चुकलें? पंडितजींच्या विरुद्ध एकादी कागाळी ना. गव्हर्नरांकडे करून जर त्यांच्या-कडून मी पंडितजींना समज देवविली असती, तर ना. गव्हर्नरांशीं माझें रहस्य आहे असें म्हणतां आलें असतें. पण तसें वर्तन मी केलें आहे असें

पंडितजी म्हणूं शकतील काय? मी त्यांच्याशीं अविश्वासानें आणि संशयानें वागतों अशी जी तक्रार त्यांनी केली आहे, ती खरी आहे. पण ही परिस्थिति कोणी उत्पन्न केली? संयुक्त जबाबदारीचें तत्व प्रथमपासून धाब्यावर बसवून ज्या सहकाऱ्यानें मला पदोपदीं अडविण्याचा आणि माझा तेजोभंग करण्याचा प्रयत्न केला, त्याच्याविषयीं मला विश्वास वाटला नाहीं, तर तो कोणाचा दोष? आतांच माझ्या एका काळच्या सोशॅलिस्ट सहकाऱ्याच्या पत्राचा उपयोग करून नागपूरच्या संपाच्या बाबतींत मी त्यांच्यावर कुभांड रचल्याचा आरोप त्यांनीं केला. पण माझा हा एका काळचा स्नेही आज पंडितजींचा भाडोत्री हस्तक आहे, हें ऐकून आपल्याला आश्चर्य वाटेल. आपल्या पहिल्याच सभेंत खाणींच्या लिलांवाबद्दल जीं प्रश्नोत्तरें झडलीं होतीं, तीं आपल्याला आठवतात का? त्या लिलावांत ज्याची बोली पटून सौदा तडकाफडकी झाला, तोच हा पंडितजींचा भाग्यशाली हस्तक! त्या लिलांवाबद्दल जो बोभाटा सर्व प्रांतभर झाला, त्याचा छडा लावण्यासाठींच मला सी. आय. डी. चा उपयोग करणें भाग पडलें. आपल्याला खरोखरीच अत्यंत नवल वाटेल.—पण या सद्‌गृहस्थानें नागपुरांतील कांहीं प्रतिष्ठित कांग्रेसवाल्यांच्या साहाय्यानें काढलेल्या कंपनीच्या व्यवहारांची चौकशी सध्यां पोलिस करीत असून, या संशयास्पद कंपनीप्रमाणेंच एक अनैतिक स्वरूपाचा क्लबहि त्यानें नागपुरास चालविल्याचा पुरावा पोलिस खात्याकडे त्याच्या एका भागीदाराकडून आलेला आहे. अशा इसमानें माझ्याविरुद्ध केलेला लांच दिल्याचा आरोप आपण खरा मानाल काय? आज हा गृहस्थ पचमढीला आहे; पंडितजींच्या बाजूनें आपण मत द्यावें म्हणून आपली मनधरणी करण्यासाठीं आपल्यापैकीं कांहींना तो भेटलाहि असेल. अध्यक्षांनीं त्याला येथें बोलावून घ्यावा. आणि त्याच्या तोंडावरच मी आपल्याला हें सिद्ध करून देईन कीं, पंडितजींनींच त्याला—”

'त्याला बोलावून आणा;' 'आतांच्या आतां हा सूर्य आणि हा जयद्रथ होऊन जाऊं द्या;' 'ताबडतोब मोटार पाठवा—'

अशा तऱ्हेचे हिंदी-मराठी आवाज प्रियदर्शनचें तें वाक्य पुरतें होण्यापूर्वीच सभागृहांत एकदम सर्वत्र उठले आणि जोराचा गलका सुरू झाला--

प्रियदर्शन गलका शांत होण्याची वाट पहात मुकाट्यानें उभा होता.

तोंच अध्यक्ष उभे राहिले. त्यांचा मनःक्षोभ त्यांच्या त्या क्रुद्ध, खुनशी चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होता. ते म्हणाले--

"मुख्य प्रधानांचें भाषण संपलें आहे--"

'नाहीं, नाहीं!' 'त्यांना बोलूं द्या!' 'मुरलीमोहनलाहि बोलावून आणा!—'

असे आवाज पुन्हा सभागृहांत दुमदुमले.

पण त्या आवाजांकडे दुर्लक्ष करून अध्यक्ष म्हणाले--

"मुख्य प्रधानांचें भाषण संपलें असल्याचें मी जाहीर करतों. आपल्या ऐकण्यांत आतां दोन्ही बाजू आल्या आहेत. त्यांचा आपण शांतपणानें विचार करा. मी ही सभा तहकूब करतों--"

"सभा तहकूब करण्याचें काय कारण? सभासदांपुढें दोन्ही बाजू आल्याच आहेत. मग आतां मतें घ्यायला काय हरकत आहे?--"

वृद्ध दाजीसाहेबांनीं एकदम उठून विचारलें.

"सभासदांचीं मनें क्षुब्ध झालेलीं दिसतात. अशा स्थितींत मतें घेणें इष्ट होणार नाहीं. म्हणून आतां सभा तहकूब करून संध्याकाळीं मतें घेण्याचा माझा विचार आहे—"

"हा आपला विचार अन्यायकारक ठरेल, अशी मला भीति वाटते. आतां सभा तहकूब केल्यावर संध्याकाळीं पुन्हा ती भरेपर्यंत सभासदांत मतप्रचार केला जाणार नाहीं किंवा त्यांच्यावर अयोग्य दडपण आणलें जाणार नाहीं, अशी हमी आपण देऊं शकाल काय?--"

उत्तमरावांनी उठून विचारलें.

"बरोबर आहे! बरोबर आहे! आतांच मतें घ्या!"

पुन्हा जोराचा गलका सुरू झाला.

अध्यक्षांनीं टेबलावर हात आपटून आणि चढया आवाजांत खेंकसून सभासदांना गप्प बसविण्याचा प्रयत्न केला.

पण व्यर्थ. उठलेले सभासद खालीं बसेनात आणि गलकाहि कांहीं केल्या कमी होईना.

तशाच स्थितींत सभा तहकूब केल्याचें जाहीर करून आपण निघून जावें, अशी कल्पना अध्यक्षांच्या मनांत क्षणार्ध चमकून गेली.

पण, लगेच त्यांच्या मनांत आलें, आपल्या अध्यक्षतेखालीं भरलेली कांग्रेस पक्षाची सभा उधळली, मोडली गेली, असा गवगवा उद्यां सर्व हिंदुस्थानभर होईल त्याची वाट काय ?--

लोक आपल्याला सवाई हिटलर समजतात; सातहि प्रांतांतील कांग्रेस मंत्रिमंडळें आपल्यापुढें चळचळां कांपतात; व ठिकठिकाणचे कांग्रेस पक्ष आपला शब्द मस्तकावर झेलतात.--हा आपला दरारा, ही आपली कीर्ति, आजची ही सभा जर सुव्यवस्थित पार पडली नाहीं, तर धुळीला मिळेल !

हा विचार मनांत येतांच ते एकदम मोठ्यानें उद्गारले--

"मित्र हो, आपण शांत व्हा. मी आतांच मतें घेत आहे--"

त्याच क्षणीं सर्व गडबड थांबली. नंतर अध्यक्ष म्हणाले--

"कांग्रेसच्या शिस्तीला आणि इभ्रतीला कमीपणा आणणारा असा हा सगळा प्रकार मला तरी दिसतो. दोन्ही भाषणें ऐकत असतां मला अनेकदां असें वाटलें कीं, आपण येथून निघून जावें--इतक्या त्यांतल्या कांहीं गोष्टी घृणास्पद होत्या; व म्हणूनच मुख्य प्रधानांचें भाषण मला थांबवावें लागलें. या प्रांतांतील कांग्रेसचा लौकिक कायम ठेवण्याची जबाबदारी आपल्यावर आहे, ही जाणीव मनांत बाळगून आपण मतें

दिलीं पाहिजेत. मुख्य प्रधानांवर ज्यांचा विश्वास असेल, त्या सभासदांनीं माझ्यासमोर येऊन आपलीं मतें नोंदावीं--"

त्याप्रमाणें लगेच मतनोंदणीला सुरवात झाली.

पण सभासदांना आपल्यासमोर मतें नोंदावयाला सांगण्यांत अध्यक्षांचा जो उद्देश होता, तो कांहीं सफल झाला नाहीं. कांग्रेस पक्षाच्या ७० सभासदांपैकीं जे ६५ सभासद हजर होते, त्यांपैकीं ५२ सभासद नीं प्रियदर्शनच्या बाजूनें आपलीं मतें नोंदलीं; तीन सभासद तटस्थ राहिले ; व फक्त १० सभासदांनीं विरुद्ध मतें दिलीं.

अध्यक्षांनीं हा निर्णय जाहीर करतांच टाळ्यांचा कडकडाट झाला.

तो थांबल्यावर अध्यक्षांनीं या जयाबद्दल प्रियदर्शनचें मोजक्या शब्दांत अभिनंदन केलें आणि लगेच ते आपल्या सहकाऱ्यांसह निघून गेले.

त्यांना पोचवून प्रियदर्शन दिवाणखान्यांत परत येतांच सभासदांचा त्याच्याभोंवतीं गराडा पडला; व पंडितजींना भेटण्याचा जो विचार त्याच्या मनांत आला होता, तो अंमलांत आणण्याची संधि त्याला मिळालीच नाहीं. ते आणि त्यांचे दोघे सहकारी केव्हां निघून गेले, हें कुणालाच समजलें नाहीं. झालेल्या प्रकाराविषयीं आपसांत चर्चा करण्यांत आणि प्रियदर्शनला धन्यवाद देण्यांत सारे सभासद गर्क झाले होते.

प्रियदर्शनच्या भोंवतालची ती गर्दी पांगल्यावर उत्तमराव त्याच्याजवळ आले आणि त्याच्या खांद्यांवर हात ठेवून उद्गारले--

"प्रियदर्शन, आज तुम्ही सभा जिंकलीत--"

"हो. पण हा सभाजय मला पचेल असं वाटत नाहीं, उत्तमराव !--"

आणि प्रियदर्शनची ती शंका खरी ठरली.

कारण त्या दिवशीं दुपारीं तो अध्यक्षांना भेटावयाला गेला असतां ते त्याला म्हणाले--

"आजच्या सकाळच्या सभेंत एक प्रश्न निकालांत निघाला,

प्रियदर्शन! पण दुसरा प्रश्न अद्याप निकालांत निघायचा आहे—"

"कोणता प्रश्न शिल्लक उरलाय आतां? पंडितजींच्या राजीनाम्याच्या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं ही सभा आपण बोलावली होती आणि तो प्रश्न तर पूर्णपणें निकालांत निघाला आज—"

प्रियदर्शननें चपापून म्हटलें.

अध्यक्षांच्या उग्र मुद्रेवर स्मिताच्या सुरकुत्या पडल्या आणि त्यांच्या जाड जिवणीची डावी कडा किंचित् विभागली. ते म्हणाले—

"हो, मलाहि पण तसंच वाटलं सकाळीं! पण त्या राजीनाम्याच्या प्रश्नांतूनच हा दुसरा प्रश्न उद्भवला आहे आतां. तुमच्या राजकीय चारित्र्यावर पक्षाचा पूर्ण विश्वास आहे हें बहुमतानं सिद्ध झालं सकाळीं. पण आतां तुमच्या कार्यक्रमाचा प्रश्न उपस्थित झाला आहे. पं. वाजपेयींचं म्हणणं असं आहे कीं, तो कार्यक्रम पक्षापुढं ठेवून त्यावरहि मतं घेणं जरूर आहे—"

"मला वाटलं होतं कीं पंडितजींनीं आतांपर्यंत स्वतःचा राजीनामा पाठवला असेल आपल्याकडे—"

"नाहीं. ते राजीनामा देण्याच्या विचारांत होते. पण मीच त्यांना थोपवून धरलं! पक्षाच्या दहा सभासदांचं एक पत्र त्यांनीं माझ्याकडे पाठवलंय. त्यांपैकीं कांहीं सभासदांनीं सकाळीं तुमच्या बाजूनें मतं दिलीं होतीं असं आठवतं मला!—"

"काय म्हणणं आहे त्या सभासदांचं?—"

"त्या सभासदांनीं असं लिहिलंय आपल्या पत्रांत कीं, मुख्य प्रधानांचं राजकीय चारित्र्य जरी आम्हांला शंकातीत वाटत असलं, तरी त्यांचा कार्यक्रम कांहीं आम्हांला सगळाच पसंत नाहीं. त्यांची नागरिक संरक्षक दलाची योजना, करवाढीचीं बिलं आणि जीवनवेतनाचं बिल हीं त्यांनीं आधीं असेंब्लीपुढं आणूं नयेत. या सभासदांची सूचना अशी आहे कीं, तुम्ही आपला कार्यक्रम प्रथम पक्षापुढं ठेवून त्याची संमति मिळविली पाहिजे—"

"याचा अर्थ असा कीं, माझं राजकीय चारित्र्य त्यांना पसंत आहे; पण कार्यक्रम मात्र पसंत नाहीं—"

"हो, असं दिसतं खरं !—"

"मग आपलं म्हणणं काय आहे ?—"

"मला असं वाटतं कीं, पक्षाच्या सध्यांच्या क्षुब्ध मनःस्थितींत हा नवा प्रश्न त्याच्यापुढें ठेवूं नये. तुम्ही न् पंडितजींनी आपसांत समझोता करून घ्यावा हें उत्तम—"

"पण त्यांचा संबंध यांत कुठं येतो ? उलट घटनेच्या शिरस्त्या-प्रमाणें त्यांनीं आतां राजीनामा दिला पाहिजे—"

"तुम्ही चुकतां आहांत, प्रियदर्शन ! वाजपेयींनीं राजीनामा देण्यासारखी परिस्थिति अद्याप उत्पन्न झालेली नाहीं. त्यांची मुख्य तक्रार तुमच्या राजकीय धोरणाविरुद्धच होती; व पक्षानं जरी तुमच्या चारित्र्याविषयीं विश्वास व्यक्त केला असला, तरी तुमच्या राजकीय कार्यक्रमाविषयींचं पक्षाचं मत अद्याप कळायचंच आहे ! म्हणून मी म्हणतों कीं, तुम्ही हा प्रश्न आतां इरेला न घालतां आपसांत तडजोडी-नं त्याचा निकाल लावावा—"

अध्यक्षांचा डाव आतां प्रियदर्शनच्या अगदीं पुरेपूर लक्षांत आला. तो त्यांना शांतपणानें म्हणाला—

"मला अजूनहि वाटतं कीं, आपण माझा कार्यक्रम पक्षापुढं ठेवून त्यावर सरळ मतं घ्यावींत ! माझा कार्यक्रम जर पक्षानं नामंजूर केला, तर मी एक क्षणाचाहि विलंब न करितां राजीनामा देईन—"

हें शेवटचें वाक्य उच्चारतांना प्रियदर्शनच्या विस्फारलेल्या डोळ्यांत जें निश्चयाचें तेज क्षणमात्र झळाळलें, तें पाहून अध्यक्ष थिजल्यासारखे झाले.

काल सायंकाळीं त्यांनीं खिडकींतून बघितलेला तो बेलाग, भयानक सुळका !—त्याच्या त्या काळ्याभोर उंचच उंच शृंगावर या वेळीं ऊन

तळपत होतें.–त्या प्रखर उन्हाची तळपच जणुं प्रियदर्शनच्या नेत्रांत आपण पहात आहोंत, असा भास त्यांना झाला.

पण त्या भासाची मोहनी त्यांनीं आपल्या मनावर टिकूं दिली नाहीं.

उलट, तें वाक्य उच्चारतांना त्याच्या आवाजांत आणि दृष्टींत प्रकट झालेला तो निश्चय आपल्या पथ्यावर पडणार आहे या गोष्टीची जी जाणीव त्यांच्या कावेबाज मनाला लगेच झाली, तिच्यामुळें त्यांच्या जिवणीभोंवतीं पुन्हा उपरोधिक स्मिताच्या दाट सुरकुत्या पडल्या; व आपल्या गोळीच्या टप्प्यांत आलेल्या क्रूर सावजाच्या लखलखणाऱ्या नजरेला नजर देत टिपण साधणाऱ्या सराईत शिकाऱ्याच्या धिम्मेपणानें त्यांनीं विचारलें––

"तुमचा कार्यक्रम कांग्रेसच्या ब्रीदाला सोडून असल्याचा जो आक्षेप पं. वाजपेयींनीं घेतला, त्यांत तथ्य आहे असं नाहीं वाटत तुम्हांला?—"

प्रियदर्शन कांहीं बोलला नाहीं.

"मला वाटतं, तुम्ही जरा शांतपणानं विचार करा सगळ्या गोष्टींचा आणि काय ठरवतां तें मागाहून कळवा मला! आम्ही आज संध्याकाळीं वर्ध्याला परत जायला निघूं––"

प्रियदर्शन तिथून निघाला, तो थेट उत्तमरावांच्या बंगल्यावर आला.

ते व्हरांड्यांत दाजीसाहेबांबरोबर गप्पा मारीत बसले होते.

प्रियदर्शन मोटारींतून उतरून पायऱ्या चढत असतां उत्तमरावांनीं पुढें येऊन विचारलें––

"अध्यक्षांना निरोप देऊन आलांत का? काय म्हणत होते ते?–"

"तसं विशेष कांहीं नाहीं. तुमचं म्हणणं अखेर खरं ठरलं, उत्तमराव! राजकारणांत चारित्र्याची गरज नाहीं; फक्त कौटिल्य लागतं!––"

# शेवटची रात्र

रोजनें आपल्या त्या सोनेरी झांक असलेल्या विपुल केशकलापां-तून एकवार कंगवा फिरवला, तोंच चपराशानें सकाळचें टपाल आणून तिच्यापुढें ठेवलें.

लगेच तिनें कंगवा ब्रशमध्यें खोंचून हातावर घेतलेले केंस एकदम मागें झोंकून दिले; व त्या टपालांतलीं पत्रें आणि वृत्तपत्रें भरभरा विसकटून पाहिलीं.

पण तिची निराशा झाली. तिला हवें असलेलें पत्र त्या टपालांत आढळलें नाहीं.

तिनें एक उसासा टाकला आणि ती कोचावर येऊन पडली.

मोहन दौऱ्यावर गेल्याला आज तीन दिवस झाले होते. पचमढीहून परत आल्यावर तो जेमतेम एकच दिवस नागपूरला राहिला; व दुसऱ्या दिवशीं सकाळच्या गाडीनें दौऱ्यावर निघाला. तो प्रवासांत

असला म्हणजे त्याचें सविस्तर हकीकतीचें पत्र रोज सकाळच्या डाकेनें तिला मिळत असे. पण, आज घरांतून बाहेर पडून त्याला तीन दिवस झाले, तरी त्याचें साधें कार्डहि तिला आलें नव्हतें.

लग्न झाल्यापासून गेल्या सहा सात महिन्यांत कितीतरी वेळां त्यांचे खटके उडाले असतील. पण तो प्रवासांत असला म्हणजे त्याचें रोजचें पत्र कधीं तिला आल्याशिवाय रहात नसे. इतकेंच नव्हे, तर एकादे दिवशीं त्याला पत्र लिहावयाला फुरसत मिळाली नाहीं, तर लगेच एक दिलगिरीचें कार्ड टाकून तो तिला पुढल्या पत्रांत वचपा काढण्याचें आश्वासन देत असे.

त्याचीं तीं प्रवासांतलीं विनोदी वर्णनांनीं भरलेलीं पत्रें म्हणजे तिला एक मोठीच करमणूक असे.

पण या तीन दिवसांत तिला नुसतें मुक्कामाला पोचल्याचेंहि कार्ड आलें नव्हतें आणि त्यामुळें तो या घटकेला कुठें असेल याची कांहींच कल्पना तिला नव्हती.

त्या दिवशीं सकाळीं नास्ता झाल्याबरोबर त्यानें तिचा निरोप घेतला आणि तो एवढेंच म्हणाला—

"रोज, मी आज वर्ध्याला जातोंय. सात आठ दिवसांत परत येईन बहुतेक—"

अर्थात् तो जातांना कुठें गेला, हें तिला माहित होतें. पण आज या वेळीं तो कुठें असेल, याची मात्र कांहींच कल्पना तिला नव्हती; व त्यामुळें तिचें मन विलक्षण चिंतातुर झालें होतें.

आणि तिला काळजी वाटावी असेंच त्याचें वर्तन दौऱ्यावर निघण्याच्या आदल्या रात्रीं घडलें होतें.

त्या दिवशीं दुपारीं दीडच्या सुमारास तो पचमढीहून परत आला. पण आल्यावर त्यानें एक क्षणाचीहि विश्रांति घेतली नाहीं. त्यानें स्नान केलें, भरभरा जेवण उरकलें आणि लगेच तो जो आपल्या अभ्यासिकेंत

जाऊन दार लावून आंत बसला, तो सायंकाळीं सातच्या सुमारास बाहेर आला.

त्याच्या त्या वर्तनाचें रोजला विशेष कांहीं वाटलें नाहीं. कारण, पुष्कळदां तो आपल्या त्या खोलींत जाऊन बसला, म्हणजे चार चार पांच पांच तास बाहेर पडत नसे. अलिकडे तर त्याच्या त्या स्वतःला त्या खोलींत कोंडून घेण्याच्या प्रवृत्तीचें प्रमाण मर्यादेबाहेर गेलें होतें. त्यामुळें तिला त्या प्रकाराबद्दल नवल वाटलें नाहीं आणि तिनें त्याच्या त्या एकांतांत व्यत्ययहि आणला नाहीं.

पचमढीला काय घडलें, हें जाणण्याची तिला विलक्षण उत्सुकता होती. वृत्तपत्रांतून आलेल्या एकतर्फी बातम्या आणि तुटक अधिकृत पत्रकें यांच्यापेक्षां त्याच्या तोंडून आपल्याला खचित अधिक तपशीलवार आणि गमतीदारहि माहिती मिळेल याची तिला खात्री होती. पण तिनें त्याला मुद्दामच कांहीं विचारलें नाहीं. कारण तिला ठाऊक होतें कीं, तो खुषींत आला, म्हणजे आपल्याला नेहमीप्रमाणें आपोआपच सगळी माहिती सांगेल.

पण तिला नवल वाटलें तें या गोष्टीचें कीं, सातच्या सुमारास आपल्या खोलींतून बाहेर पडल्यावर नेहमीप्रमाणे फिरावयाला न जातां तो तिला म्हणाला, "रोज, आतां आपण अर्धा तास बॅडमिंटन खेळू या. मी फार कंटाळलों आहे गेल्या पांच सहा दिवसांच्या दगदगीनें आज विश्रांति घ्यायची ठरवली आहे भरपूर. आपण मजेंत वेळ घालवूं सगळा—"

"मग पहिल्या शोला जायचं का आपण ? आज लॉरेल न् हार्डीचं काम आहे—"

"छे, छे, मला अगदीं वीट आला आहे त्यांच्या त्या निर्बुद्ध धांगडधिंग्याचा ! आज आपण प्रत्येक क्षण घरींच घालवूं एकमेकांच्या सहवासांत—"

त्याचें तें वाक्य तिला आठवलें आणि छातींत अचानक कळ यावी तशी विलक्षण वेदना तिच्या मनाला झाली.

आणि, त्यानंतर रात्रीं तो जें जें बोलला आणि जें जें वर्तन त्यानें केलें, तें सगळें तिला आठवलें. त्याच्या त्या साहचर्याचा प्रत्येक क्षण तिच्या डोळ्यांपुढें रेखल्यासारखा उभा राहिला.

"मग आतां खेळायचंच का अगदीं?——"

तिनें वर आभाळाकडे बघून विचारलें.

मृगाच्या पहिल्या सलामीची एक जोरदार सर नुकतीच पडून गेली होती; व अद्यापहि मधूमधून पावसाचा टपोरा थेंब अंगावर पडत होता. क्षितिजाचा नैऋत्येकडला कोपरा पाण्यानें ओथंबलेल्या मोटेच्या कोथळ्यासारखा दिसत होता; व सूर्य अद्याप बुडालेला नसल्यामुळें त्या कोपऱ्यांत चमकणारी निस्तेज वीज फळ्यावर ओढलेल्या खडूच्या वेडयावांकडया रेषेसारखी दिसत होती. पूर्वेच्या क्षितिजावर इंद्रधनुष्याचें एक शकल शोभत होतें. त्याच्या सौम्य गुलाबी प्रभेनें सर्व आकाश उजळलें होतें. झाडांच्या पानांवर सांकळलेलें पाणी वाऱ्याच्या झुळके-बरोबर टपटपा पडत होतें; व पाण्यानें भिजून ओलेचिंब झालेले पक्षी, आतां लवकर पाऊस येत नाहीं अशा खात्रीनें, आपले पंख झाडीत चित्रविचित्र आवाज काढीत होते.

"कां बरं? पाऊस लवकर येणार नाहीं आतां, रोज! अशा थंड ओलसर हवेंत खेळण्याची मजा कांहीं निराळीच असते——"

पण, खेळ अर्धा तास झाला असेल नसेल, तोंच तो कंटाळला. आणि तिला म्हणाला——

"आज खेळांत मन लागत नाहीं माझं! चल, जेऊन घेऊं या आपण लवकर——

"आज घाई का इतकी जेवायची? जेवल्यावर बाहेर जायचंय का कुठं?——"

"आणि जायचं असलं, तरी मोटार आहे का आतां आपल्याजवळ, रोज ?"

तें वाक्य उच्चारतांना त्याच्या आवाजांत एकदम झालेला बदल रोजला जाणवला आणि ती म्हणाली--

"मोटार नसली म्हणून काय बिघडलं ? मी आतां पपांना फोन करून बोलावतें मोटार बाहेर जायचं ठरत असलं तर !--"

"नको, नको ! आपण आतां जेवण उरकून घेऊं आणि मग पत्ते खेळूं थोडा वेळ —"

"मग मी जेवायची तयारी करतें तुम्ही कपडे बदलीपर्यंत--"

आणि तिनें आंत येऊन जेवणाचें टेबल नेहमींप्रमाणें सजविलें आणि खानसाम्याला वाढण्याची सूचना केली.

तो प्लेट्सची मांडामांड करतो आहे, तोंच मोहन आंत येऊन म्हणाला—

"छे, छे, हें नाहीं चालायचं आज! त्या एदलजीनें आपल्याला लग्नाच्या वेळीं नजर केलेला तो चांदीचा सेट काढ आज न् तुला विजयागौरी मेहतानं तीं पुष्पपात्रं दिलीं आहेत ना त्यांत रातराणीचे तुरे घालून तीं ठेव टेबलावर ! हं, उचल हें सगळं नेहमीचं सामान, अंतोन ! तूं बघतेस काय अशी माझ्याकडे, रोज ?--"

"तुम्हांला काय झालंय समजत नाहीं मला ! आज कांहीं सण आहे का कसला तें सामान काढायला ? का लग्नदिवस आहे आपला ?"

"हो हो, तसंच समज घटकाभर ! कोणी पाह्यलंय लग्नाचा वर्षदिवस साजरा करायला आपण जिवंत रहातों कीं नाहीं तें —"

"असं भलतंच कांहीं तरी बोलूं नका ! तुम्ही वाचीत बसा थोडा वेळ आपल्या खोलींत. तोंपर्यंत मी पुन्हा सगळी मांडामांड करतें--"

रोज तें सामान काढावयाला आपल्या खोलींत गेली आणि तिच्या मनांत असा विचार आला की, आज हे असें काय विचित्र वर्तन करताहेत मघाच्च पासून ?

पण त्याच्या लहरीविरुद्ध जाण्याची सोय नव्हती. म्हणून मुकाट्यानें तिनें तें सगळें सामान काढलें आणि त्याच्या सूचनेप्रमाणें टेबल सजवून घंटा वाजवली.

त्याबरोबर तो आंत आला आणि मोहक रीतीनें सजविलेल्या त्या टेबलाकडे बघून इंग्रजींत उद्गारला, "तू फार छान मुलगी आहेस, रोज !––"

आणि तिचे दोन्ही दंड धरून त्यानें तिला गदगदां हलविलें.

"लग्नाच्या पूर्वी जसे तुम्ही वागत असां, तसं वागायची लहर आलेली दिसतेय आज तुम्हांला––"

रोजनें त्याच्या हातांतून आपल्याला सोडवून घेत हंसत हंसत म्हटलें.

पण तो एकदम गंभीर होऊन उद्गारला, "रोज, आपलं लग्न झालं नसतं तर फार बरं झालं असतं, असं नाहीं वाटत तुला?––"

"का बरं? तुमच्या मनांत याच वेळीं ही कल्पना का आली?–"

"कारण कांहीं नाहीं तसं! पण अगदीं सहज विचारलं तुला. आणि तुला आठवत असेल, माझ्याशीं लग्न करण्याचा नाद सोडून देण्याविषयीं त्याहि वेळीं मी आग्रहानं सांगितलं होतं तुला––"

"पण जें व्हायचं तें होऊन गेलं. आतां कशाला त्याची चर्चा?–"

"का बरं? आपलं नोंदणीचं लग्न आहे. तें केव्हांहि रद्द करून घेतां येईल तुला!––"

"हें जें लग्नाच्या वेळीं माझ्या न् तुमच्या मित्रमंडळीनं नजर केलेलं सामान इथं माझ्याकडून मुद्दाम काढून मांडवलंत, तें लग्न रद्द करण्याच्या गोष्टींची चर्चा करण्यासाठीं का? छान!––"

रोजचे डोळे पाण्यानें भरून आले.

"वेडी आहेस तू! मी त्या अर्थानं बोलतोंय का हें? माझं फक्त एवढंच म्हणणं कीं, ज्याच्या कर्जापायीं तुला आपलं स्त्रीधन

गमवावं लागलं न् मोटार विकावी लागली त्या स्वच्छंदी न् बेजबाबदार नवऱ्याचा तिटकारा कसा नाहीं येत तुला?"

"हें पहा, तुम्ही जर असं कांहीं बोलत रहाणार असाल, तर तुम्ही एकटेच जेवा. मी आपली माझ्या खोलींत जाऊन पडतें !--"

आणि अश्रुपूर्ण नेत्रांनीं एकवार त्याच्याकडे पाहून ती खुर्चीवरून उठली.

त्याबरोबर तो तिच्याजवळ गेला आणि तिच्या खांद्यांवर हात ठेवून म्हणाला--

"रोज, मी जें बोललों तें अप्रिय असलं, कडू लागण्यासारखं असलं, तरी तें खरं नाहीं का? माझा इतका वाईट अनुभव येऊनहि तूं जें प्रेम माझ्यावर करतेस तें अगदीं अनाठायीं, व्यर्थ, घातक ठरणार आहे शेवटीं! ज्याची स्मृति सुद्धां तुझ्या मनांत डोकावली असतां तें अच्छोदसरोवरासारखं निरागस मन दूषित होऊन जावं असा भ्रष्ट मनुष्य आहे मी! रोज, तूं मला विसरून जायचा प्रयत्न कर!--"

बोलतां बोलतां त्याच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले.

रोज मुकाट्यानें अश्रु गाळीत होती.

कांहीं वेळानें तिनें डोळे पुसले आणि ती म्हणाली--

"चार दिवसांनीं तुम्ही आज घरीं परत आलांत आणि आल्यापासून सारखं भलभलतं बोलतां आहांत ! खरंच, पंचमढीला कांहीं कुणी बोललं का तुम्हाला ? आणखी कांहीं देणं तर नाहीं ना शिल्लक राह्यलेलं? मला खरंखरं सांगा. तुम्ही असं वेड्यासारखं बोललांत म्हणजे माझा जीव व्याकुळ होऊन जातो अगदीं!"

तिचे ते उद्गार ऐकतांच तो भानावर आला; त्याला आपली चूक कळून आली; व तिला खुर्चीवर बसवून तो म्हणाला--

"नाहीं. आतां कुणाचंहि देणं राहिलेलं नाहीं आपल्याला न् कसलीहि काळजी नाहीं माझ्यामागं! पण मी किती वाईट आहे आणि

माझ्यामुळं तुझं किती नुकसान झालं आहे, याची आठवण झाली म्हणजे नाहीं नाहीं ते विचार येतात माझ्या मनांत! बरं, आतां आपण जेवूं या—"

त्यांनीं जेवावयाला सुरवात केली.

पण तिच्या लगेच ध्यानांत आलें कीं, त्याचें जेवणांत मुळींच लक्ष नाहीं आणि तिनें म्हटलें—

"तुम्ही उगाच घाई केलीत इतक्या लवकर जेवायला बसायची. दुपारीं आज उशीरा जेवण झालं होतं. त्यामुळं भूक नाहीं लागलेली दिसत तुम्हांला अजून—"

"हो, खरं आहे तुझं म्हणणं—"

आणि आपल्या हातांतला चमचा न् कांटा खालीं ठेवून तो एकदम उठला.

"पत्ते खेळायचे का आतां?"

तिनें बाहेरच्या दिवाणखान्यांत आल्यावर त्याला विडा देऊन विचारलें.

"बरं, खेळूं या थोडा वेळ—"

पण त्या खेळांतहि त्याचें मन रमेना आणि हातांतली पानें एकदम खालीं टाकून तो म्हणाला—

"तूं गाडी मागव फोन करून! खरंच, आपण फिरून येऊं या थोडा वेळ. चांदणंहि पडलंय आतां—"

"मी मघांशीच म्हटलं तुम्हांला. आज दिवसभर इतकी दगदग केली आहे तुम्ही कीं, उघडया हवेंत फिरून आल्यानं थोडं तरी बरं वाटलं असतं तुम्हांला. थांबा हं, मी फोन करतें—"

तिनें कोपऱ्यांतल्या टेबलाजवळ जाऊन फोन हातांत घेतला आणि मोटार पाठविण्याविषयीं आपल्या आईला सांगितलें.

नंतर ती त्याच्याकडे वळून म्हणाली, "पपा विचारताहेत, तुम्ही त्यांना केव्हां भेटाल? पचमढीची हकीगत तुमच्या तोंडून ऐकायची फार उत्सुकता आहे त्यांना—"

मोहननें वर न पाहतांच हातांतल्या सिगारेटची राख झटकीत तिला म्हटलें--

"जमल्यास उद्यां सकाळी येतों म्हणून सांग त्यांना—"

तिनें आणखी कांहीं बोलून फोन खालीं ठेवला.

तोंच मोटार कमानीखालीं येऊन उभी राहिली.

"निघायचं ना?"

तिनं आपली मनीबॅग आणि सुंदर छत्री घेऊन विचारलें.

"हो--"

त्यानें ड्रायव्हरला रजा दिली आणि चाक स्वतःच्या हातीं घेतलें.

मोटार अंबाझरीच्या कांठावर येतांच तीं दोघें खालीं उतरलीं.

मृगाचा पहिला आठवडा बहुतेक कोरडा गेल्यामुळें तलावांत पाणी फारसें आलें नव्हतें आणि पाण्याचा रंगहि बदलला नव्हता. नैऋत्येकडलें क्षितिज अगदीं काळेंभोर झालें होतें. त्याची सांवली पाण्यावर पडून तेंहि इतकें काळवंडून गेलें होतें कीं, तलावाच्या त्या बाजूला खालपासून वरपर्यंत नुसता काळोखच काळोख पसरला आहे, असें वाटे. अष्टमीच्या चंद्राचें अर्धबिंब मधल्या निरभ्र आकाशांत तळपत होतें. त्याचा सौम्य प्रकाश तलावाच्या सपाटीवर पडल्यामुळें नैऋत्येकडील क्षितिजाचा तो गडद काळेपणा भीषण आणि भयाण वाटत होता. विशेषतः तलावाच्या सपाटीपासून तों आभाळाच्या मध्यापर्यंत वीज जेव्हां वेगानें उंचच उंच तळपत जाई, तेव्हां तें नैऋत्येकडलें क्षितिज तरवारीनें खसकन् चिरल्याचा भास होत असे. दक्षिणेकडलें तें काळेभोर क्षितिज, त्यावर वारंवार उफाळणारी ती वीज, आकाशाच्या निरभ्र मध्यावर तळपणारा तो अर्धचंद्र आणि त्याच्या मधुर प्रभेनें आर्द्र सृष्टीला आलेली प्रसन्नता!—नटेश्वराच्या अर्ध्या शशिमुखावर जणु प्रणयोत्कंठेची सुषमा पसरली होती आणि अर्ध्या रुद्रमुखावर जगाच्या विनाशचिंतेचा विषाद प्रकट झाला होता.

तें सारेंच दृश्य मोठें विलक्षण आणि सजीव वाटत होतें.

"मला हें काळेंभोर पाणी बघायला मुळींच आवडत नाहीं, मोहन! क्षितिजाच्या त्या दक्षिणेकडल्या टोंकाला जग संपलेलं असावं, काळा कुळकुळीत राक्षसी अंधार जगाला त्या बाजूनें गिळून टाकीत असावा, अशी भयाण कल्पना येते हा देखावा पाहिल्यावर माझ्या मनांत! आपण तेलंखेडीवर जाऊं या गडे—"

"पण, रोज, नेहमीं सुंदर न् आल्हाददायक गोष्टीच बघितल्या पाहिजेत असा आग्रह का तुझा? एकाद दिवशीं तरी सृष्टीची भीषणता कशी असते, तें पाहून घेऊं या आपण--"

"नको, नको! वीज चमकल्यावर किती भेसूर दिसतं तें क्षितिज! चला, आपण आपलीं तेलंखेडीच्या बगिचांत जाऊं या--"

ती त्याच्या अंगाला येऊन बिलगली आणि आपल्या उजव्या हातानें तिला लपेटून तो मोटारजवळ आला.

तेलंखेडीवरील दृश्य त्या मानानें खरोखरीच सौम्य आणि मनोहर होतें.

अंबाझरीवर टेकलेल्या नैऋत्य क्षितिजावरली ती भयाण काळोखी येथें टेकडीमागें दडली होती; व उलट चंद्राच्या प्रकाशांत तलावाचें स्वच्छ, निळसर पाणी वाऱ्याच्या मंद झुळकांबरोबर चमचम करीत नाचत होतें. उमरावतीच्या रस्त्यानें जाणाऱ्या येणाऱ्या मोटारींच्या दिव्यांच्या प्रकाशाचा झोत पाण्यावर पडला म्हणजे ती कांहीं निराळीच शोभा क्षणमात्र दिसे! तलावाच्या उत्तरेला असलेल्या टेकडीवर लुकलुकणारा एकच एक दिवा, मधून मधून कानांवर येणारे गुरांच्या गळ्यांतील घंटांचे गोड आवाज आणि छत्तिसगडी जवानांनीं भेदक सुरांत छेडलेल्या लावण्यांच्या उन्मत्त लकेरी त्या निर्जन, एकांत स्थानापासून मनुष्यवस्ती फारशी दूर नाहीं, याची जाणीव देत होत्या. संध्याकाळीं

पडून गेलेल्या पावसाच्या झडीमुळें झाडांचा खालीं पडलेला पाचोळा आणि वरची हिरवी गार पालवी भिजून जाऊन किंचित् उबट किंचित् ताजा असा चमत्कारिक मिश्र गंध हवेंत दरवळला होता; व झाडांच्या लांबलचक सावल्यांतून विखुरलेले चांदण्याचे पांढरे शुभ्र कवडसे भुईवर प्राजक्ताच्या फुलांचा सडा पडल्याचा भास उत्पन्न करीत होते.

तलावाजवळ येतांच मोहननें मोटार उभी केली आणि तीं दोघें खालीं उतरलीं.

"अशींच चालत या वाटेनें बागेंत जाऊं या—"

रोज बगीचाकडे जाणाऱ्या उतरणीवरील वाटेकडे वळून म्हणाली.

"अं हं. बगीचांत मोटारनं जाऊं मागाहून. मी टॉर्च सुद्धां घेतलेला नाहीं आज बरोबर. नुकताच पाऊस पडून गेलेला असल्यामुळं साप बीप निघायचा पायांखालीं एकादे वेळीं--"

"पाऊस पडत असतांना सुद्धां किती तरी वेळां गेलों आहोंत आपण या वाटेनं! आज तर चांगलं चांदणं पडलंय--"

"बरं, जाऊं या—"

आणि एकमेकांना हातांनीं लपेटून त्यांनीं बगीचाकडे जाणाऱ्या रस्त्यानें हळुहळू पावलें टाकावयाला सुरवात केली.

दोहों बाजूंच्या उंच झाडांची दाट सावली आणि वाळलेल्या पानांचा खच त्या रस्त्यावर पडला होता.

"रोज, तुला आठवतं? याच रस्त्यानं आपण जात असतां सळसळ आवाज झाल्याबरोबर तूं भीतीनं मला बिलगलीस आणि मी तुझ्या गालाचं ओझरतं चुंबन घेतलं! तुझ्या सुखस्पर्शाचा पहिला अनुभव तो! त्या आनंदाची मजा कांहीं पुन्हा अनुभवायला मिळणार नाहीं आतां या जन्मांत—"

"असं का म्हणतां तुम्ही?—"

तिनें थबकून त्याच्याकडे पहात विचारलें.

चांदण्याचे कवडसे त्याच्या श्रांत मुखावर पडले होते. त्याचे डोळे भरून आल्यासारखे तिला दिसले.

"अपेक्षा आणि उत्कंठा यांचा जो धडधडता आतुर आनंद त्या पहिल्या स्पर्शांत असतो, तो नंतर कधींहि अनुभवायला मिळत नाहीं. फार वेळ हातांत ठेवलेलीं फुलं जशीं चोळवटून कोमेजून गेल्यामुळं नकोशीं वाटतात, तसंच होतं स्पर्शसुखाचं पुढं मग!--"

"म्हणजे मी नकोशी झालें आहे का आतां तुम्हांला?—"

"तशा अर्थानं म्हटलं नाहीं मी. प्रणयपूर्तीनंतर स्त्री जी पुरुषाला प्रिय राहते, ती सहचरी म्हणून, त्याच्या सुखदुःखाची भागीदार म्हणून! पण आज या जागेवर पाऊल ठेवतांच मला त्या पहिल्या स्पर्शसुखाची आठवण झाली आणि--"

तिनें आपले दोन्ही हात त्याच्या गळयाभोंवतीं टाकले--

त्याबरोबर तिचें तोंड दोन्ही हातांनीं वर उचलून त्यानें तिच्या हनुवटीला हळूच, अगदीं हळुवारपणें दंश केला आणि अत्यंत आर्ततेनें म्हटलें--

"–माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले आणि वाटलं कीं, पुन्हा कांहीं या आपल्या प्रणयमीलनाच्या जागीं येण्याचं भाग्य मला लाभणार नाहीं!—"

त्याच्या डोळयांतले इतका वेळ आवरून धरलेले अश्रु गालावर ओघळले.

पण, ते तिच्या लक्षांत येऊं नयेत म्हणूनच कीं काय, त्यानें तिच्या डोळयांचें, कपाळाचें, केशकलापाचें आणि त्या ओल्या उष्ण ओष्ठकलिकांचें पुनःपुन्हा अतृप्ततेनें चुंबन घेतलें---

आपण कुठें उभे आहोंत याचा त्यांना पूर्ण विसर पडला होता.

तोंच मोटारीचा आवाज झाला आणि प्रकाशाचे झगझगीत झोत झाडांच्या पानांतून त्यांच्या अंगावर पडले.

तत्क्षणींच रोज बाजूला झाली.

तेव्हां तो तिचे दोन्ही हात धरून तिला जवळ घेत म्हणाला––

“ रस्त्यानें जाणाऱ्या मोटारीचा आवाज आहे तो! त्याला भिऊन तूं दूर होऊं नकोस माझ्यापासून. खरोखरी आपल्याला आज या स्थितींत इथंच मरण येईल तर किती छान होईल, रोज!––”

त्याचे ते विलक्षण शब्द तिला आठवले आणि तिच्या डोळ्यांतून अश्रूंचा पूर लोटला.

गेल्या दोन दिवसांत त्याचें पत्र नाहीं. काय अर्थ समजावयाचा या प्रकाराचा? असें कधींहि घडलें नव्हतें पूर्वीं––

––पण तिला शंका आली. आपण पत्रें घाईघाईनें बघितलीं. त्या घाईत त्याचें पत्र कदाचित् आपल्या नजरेंतून निसटलें असेल. म्हणून ती उठली आणि पुन्हा एकवार तिनें तें सर्व टपाल काळजी-पूर्वक तपासलें.

तेव्हां एका हिंदी दैनिकाच्या वेष्टनांत अडकलेलें फिकें निळें पाकिट तिला सांपडलें.

खात्रीनें मोहनचेंच पत्र तें!

पांढऱ्या गोकर्णीचा किंचित् निळी छटा असलेला रंग त्याला फार आवडत असे. त्याच रंगाचीं पाकिटें आणि नोटपेपर तो नेहमीं वापरावयाचा––

––खात्रीनें त्याचेंच पत्र होतें तें.

तिनें हर्षभरानें तें पत्र फोडून झरझरा वाचलें––

––पण तिच्या हातांतून तें गळून पडलें.

त्या पत्रांत मोहननें लिहिलें होतें––

रोज,

मी आज जात आहें, तुझ्या आयुष्यांतून कायमचा नाहींसा होत आहें. जगांत उजळ माथ्यानें नांदणें यापुढें शक्य नाहीं, अशी पुरेपूर खात्री झाल्यामुळेंच मी नाहींसें व्हावयाचें ठरविलें. काल रात्रभर माझ्या जिवाची अतोनात तळमळ झाली. क्षणोक्षणीं वाटत होतें कीं, तुला सगळें कांहीं सांगून टाकावें. पण धीर झाला नाहीं. आणि शेवटच्या क्षणींहि तुला फसवून मला घराबाहेर पडावें लागलें. माझें सारें जीवन प्रतारणा करण्यांत गेलें. बापूंपासून तो तुझ्यापर्यंत आपल्या साऱ्या आवडत्या माणसांना मी फसवीत आलों. अशा या अप्रामाणिक, भ्रष्ट माणसानें जर एक गोष्ट तुला आज कायमची सोडून जातांना सांगितली, तर ती तूं खरी मानशील का? रोज, मी आजवर अनेक स्त्रियांच्या मोहाला बळी पडलों आणि त्यांचाहि बळी घेतला. पण तुझ्याविषयीं मला जें आकर्षण वाटलें, तें या सर्व अनुभूतींहून अगदीं निराळें, कांहीं तरी अलौकिक असें होतें. मला अद्याप त्याचा उमज पडलेला नाहीं. तुला अशा रीतीनें सोडून जातांना माझ्या मनाला ज्या दारुण यातना होत आहेत--रोज, तुला त्या खऱ्या वाटतील का?

मेलेल्या माणसाची आपण कधीं चौकशी करीत नाहीं, त्याचा कधीं शोध घेत नाहीं. पण प्रेमानें त्याची आठवण मात्र ठेवतों. रोज, माझी तूं आठवण सुद्धां ठेवूं नकोस. मला विसरून, अगदीं पूर्णपणें विसरून जा--

मोहन

रोजनें पुन्हा एकदां तें पत्र उचललें आणि त्यांतलें प्रत्येक अक्षर न् अक्षर काळजीपूर्वक वाचलें.

वाचतां वाचतांच तिला आपल्या डोळ्यांपुढलीं अक्षरें दिसेनाशीं झालीं--

आणि तिचें मन कसलीहि वेदना, कसलीहि संवेदना होण्याच्या पलीकडे गेलें.

सुंगणी दिलेल्या माणसाला आपलें शरीर चिरलें जात आहे हें जसें समजत नाहीं, तशी तिची अवस्था झाली.

त्या आघातानें तिच्या मनाच्या सगळ्या हालचाली बंद झाल्या, त्याला एकदम निश्चेष्टता आली.

त्या निश्चेष्ट मनःस्थितींत ती कांहीं वेळ राहिली असती तर, तर---

तोंच वसंता सनीची शिकवणी आटोपून नेहमींप्रमाणें आंत आला.

कोचावर ती तशी अस्ताव्यस्त पडलेली; हातांत तें पत्र; दृष्टींत ती शून्यता---

त्याला कसेंसेंच वाटलें आणि तो जवळ आला---

तरी ती उठली नाहीं; कसलीहि हालचाल तिनें केली नाहीं.

तेव्हां त्याला अत्यंत भीति वाटली आणि तो कातर वाणीनें उद्गारला--

"रोजबाई, तुम्हांला काय होतंय ? अशा काय पहातां तुम्ही ? ममीला बोलावून आणूं का मी ?—"

त्याच्या त्या केविलवाण्या उद्गारांनीं तिला एकदम जाग आला, त्या निश्चेष्टतेंतून तिचें मन दचकून बाहेर पडलें—

आणि तिच्या तोंडून उद्गार फुटला---

"वसंता, ते मला सोडून गेले रे !—"

आणि त्या शून्य डोळ्यांतून एकदम अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या.

"कोण? कोण सोडून गेले तुम्हांला ?—"

"मोहन ! मला पुन्हा कधींच का भेटायचे नाहींत ते ?--"

तिचा तो दीनवाणा प्रश्न त्याच्या काळजाला भेदून गेला.

पण ती जें सांगत होती, त्याचा नीटसा बोध मात्र त्याला झाला नाहीं.

कांहीं तरी विलक्षण, कांहीं तरी भयानक घडलें आहे, एवढेंच फक्त तो समजला.

तो स्तब्ध उभा होता.

ती रडत होती. मघांशीं निश्चेष्ट असलेलें तें तिचें शरीर आतां हुंदक्यांनीं सारखें हादरत होतें.

अखेर तो तिच्या पायांशीं बसला आणि त्यानें तिला विचारलें--

"ममीला बोलावून आणूं का मी ?--"

"नको, नको ! वसंता, तूं माझ्याबरोबर वर्ध्याला चल आतांच्या आतां. त्यांनीं वर्ध्याहून पत्र लिहिलंय हें. कदाचित् शेगांवलाच असतील ते. वर्ध्याला गेल्यावर कुणा ना कुणाकडून तरी पत्ता लागेल त्यांचा. तूं टांगा घेऊन ये--"

"घरून मोटार आणूं का ?--"

"छे, छे ! आपण टांग्यानंच स्टेशनवर जाऊं. घरीं समजतां कामा नये यांतलं कांहीं सुद्धां. त्यांच्या मानी स्वभावाला आवडायचं नाहीं यांतलं कांहीं पपांना न् ममीला समजलेलं--"

वसंता मुकाट्यानें उठला आणि बाहेर पडला.

तिच्या डोळ्यांतले अश्रु आटले होते आतां. पण मनांत आठवणींची आणि विचारांची गर्दी उसळली होती.

परवां, याच वेळीं याच खोलींत त्यांनीं माझा शेवटचा निरोप घेतला होता. त्या वेळचीं तीं चुंबनें ! त्यांचा स्वाद आणि उन्माद, त्यांची ओढ आणि अतृप्ति !--त्यांच्या जिवाची सगळी तडफड त्या थरथरणाऱ्या आतुर ओंठांनीं व्यक्त केली होती; पण कळली नाहीं आपल्याला ती हृदयाची भाषा ! आसवांनी भरलेल्या आपल्या डोळ्यांचें चुंबन घेतांना त्यांच्याहि डोळ्यांत आंसवें आलीं; पण कळला नाहीं आपल्याला त्या आंसवांचा अर्थ ! त्यांनीं आपल्या अंगुलींना, कानांच्या पाळ्यांना, हनुवटीला हळुवारपणानें दंश केला आणि म्हटलें,

"रोज, पुन्हा नाहीं कधीं असा त्रास देणार मीं तुला !--"

पण कळला नाहीं आपल्याला त्या करुण उद्गारांतला ध्वनि !

"मला विसरून, अगदीं पूर्णपणें विसरून जा !—"

मोहन, कसे हो लिहवले तुम्हांला ते शब्द ? आपल्या प्रेमाचा साक्षीदार महिन्या दीड महिन्यानें जन्माला येईल. आणि मी तुम्हांला विसरून जाऊं ?—

मोहन, मोहन, तुम्ही कुठें असाल ?—

तिला वाटलें, आपल्या हृदयांतली सगळी आर्तता, आपल्या प्रीतीचें सगळें बळ एकवटून मोठ्यानें आक्रंदावें—इतक्या मोठ्यानें कीं, मोहन असतील तिथें त्यांना तें आक्रंदन ऐकूं येऊन त्यांनीं आपल्याकडे धांवत यावें !—

मोहन, तुम्ही कसे हो मला सोडून गेलांत ? जिथें असाल तिथून धांवत या !—

पण तिच्या पिळवटलेल्या हृदयांत तळमळत उठलेली ती हांक कांहीं बाहेर पडली नाहीं.

आणि डोळ्यांतून मात्र अश्रूंचा पूर लोटला.

# शेगांव

पार्लमेंटरी कमिटीच्या अध्यक्षांनीं पचमढीहून वर्ध्याला पोंचल्या-बरोबर जें पत्रक तिथून काढलें, तें वाचून प्रियदर्शन थक्क झाला.

त्या पत्रकांत असें म्हटलें होतें कीं, "मध्यप्रांतीय मंत्रिमंडळांतील बेबनाव आपसांत मिटला, हें जाहीर करण्यास कमिटीला समाधान वाटत आहे. असेंब्ली कांग्रेस पक्षानें जरी मुख्य प्रधानांवर बहुमतानें विश्वास व्यक्त केला, तरी त्यांनीं प्रसिद्ध केलेल्या कार्यक्रमाविषयीं मात्र पक्षांत मतभेद आणि असंतोष दिसून आला; व त्या दृष्टीनें राज्यकारभार अधिक सुरळीत चालविण्यासाठीं कमिटीनें मंत्रिमंडळाला जरूर त्या सूचना केल्या आहेत."

प्रियदर्शननें तें पत्र जेव्हां उत्तमरावांना दाखविलें, तेव्हां ते हंसून उद्गारले, "डोहांतल्या सुसरी बाहेर आल्या म्हणायच्या अखेर! आपल्या इथल्या मुक्कामांत अध्यक्षांनीं निरनिराळ्या गटांच्या मुखंडांचं मनोमंथन

करून हें हलाहल बाहेर काढलं! तुमच्याकडे असलेली खाती काढून घ्यायची पूर्व तयारी आहे ही प्रियदर्शन—"

"मी त्यांना शेवटच्या मुलाखतींत स्पष्ट सांगितलं होतं कीं, माझा कार्यक्रम तुम्ही पक्षापुढं ठेवा. पक्षानं जर तो मान्य केला नाहीं तर मी ताबडतोब राजीनामा देईन—"

"पण पक्षांतलं बहुमत तुमच्याविरुद्ध जाणार नाहीं अशी खात्री आहे त्यांची! म्हणूनच तुमच्या कार्यक्रमाचा प्रश्न धसाला न लावतां त्यांनीं मुद्दामच हें मोघम पत्रक काढून तुमच्याविरुद्ध पक्षांत असंतोष उत्पन्न झाला असल्याचा डांगोरा जगभर पिटला आहे—"

"पण त्यांना जर मी नकोसा झालों असेन, तर त्यांनीं तसं मला स्पष्ट सांगावं. मी ताबडतोब राजीनामा देऊन त्यांच्या वाटेतून बाजूला होईन!—"

"त्यांना तुम्ही नकोसे झालां आहांत, यांत शंकाच नाहीं. पण तुम्हांला विनाकारण राजीनामा द्यायला सांगितल्यानं जो गवगवा साऱ्या देशभर होईल आणि हुकूमशाही गाजविल्याचा जो आरोप स्वतःवर येईल, तो करून घेण्याची इच्छा नाहीं त्यांची. म्हणून कांग्रेसच्या तत्त्वा-नुसार तुमचं वर्तन नसल्यामुळं पक्षाच्या मनांतून तुम्ही उतरलां आहांत असं भासवायला सुरवात केली आहे त्यांनीं अशा रीतीनं—"

"पण त्यांची इच्छा नसली, तरी मी हा प्रश्न धसाला लावल्या-शिवाय राहणार नाहीं, उत्तमराव! मी महात्माजींना जाऊन भेटेन. त्यांना ही सगळी परिस्थिति समजावून सांगेन—"

"आणि ते तुमच्या बाजूनं मत देतील असं तुम्हांला अजूनहि वाटतं का, प्रियदर्शन? गांधी पक्षपाती आहेत, आपल्या विश्वस्त गणांच्या अरेरावीचं तें समर्थन करतात हें गेल्या नऊ दहा महिन्यांत तुमच्या अनुभवाला आलेलं नाहीं का? तुम्ही खरोखरीच विषाची परीक्षा पहाताहांत असं वाटतं मला—"

"त्या परीक्षेंत माझा बळी पडला तरी हरकत नाहीं, उत्तमराव! पण टिळकांच्या शाठ्यनीतीला नांवं ठेवून न् तिच्यावर वाद माजवून ज्यांनीं सत्याच्या न् अनत्याचाराच्या पायावर राजकारणाची पुनर्घटना करण्याचं कंकण हातीं बांधलंय, त्यांचं खरं स्वरूप तरी एकदा चवाट्यावर येईल माझ्या या प्रयत्नामुळं! महात्माजींच्या भोंवतालची प्रभावळ कशीही असो. ते स्वत: चांगले आहेत, बोलण्याप्रमाणं वागणारे आहेत, असं अजूनहि वाटतं मला; न् म्हणून त्यांच्याकडे जाऊन न्याय मागायचं ठरवलंय मी--"

आणि खरोखरीच त्यानंतर चार दिवसांनीं प्रियदर्शन गांधीजींची भेट घेण्यासाठीं शेगांवला गेला.

तो शेगांवला पोंचला, त्या वेळीं संध्याकाळ होऊन गेली होती.

सूर्य बराच खालीं आला होता; व पश्चिम क्षितिजावर सांचलेल्या वळवाच्या काळ्या ढगांनीं त्याचें बिंब झाकून टाकलें होतें. पावसाची एक धांवती सर नुकतीच पडून गेली होती. अजूनहि एकाद दुसरा टपोरा थेंब मधून मधून अंगावर पडत होता. प्रखर उन्हानें होरपळून गेलेल्या जमिनींतून गरम, गंधयुक्त वाफारा दरवळत होता. त्या सतेज, सगंध वातावरणांतून दूरवर पाहिलें म्हणजे एकाद्या शिंदीच्या झाडाभोंवतीं निळसर, सूक्ष्म लाटा तरळल्यासारखा भास होई. वातावरण इतकें स्तब्ध आणि निश्चल होतें कीं, क्षितिजाच्या कडेला असलेलीं झाडें पडद्यावरील चित्रांसारखीं दिसत होतीं. ओहोळांतील नुकत्याच भिजलेल्या वाळक्या उंच गवतांत बसलेला एकादा बगळा आपले जड पंख झापावून जेव्हां क्वचित् मंदपणानें उडे, तेव्हां तें सारेंच मूक चित्र क्षणमात्र हलल्यासारखें वाटे. तो उष्मा आणि ती स्तब्धता! —संतप्त सृष्टीचें विशाल हृदय जगुं आंतल्या आंत गुदमरून जडमूढ झालें होतें.

प्रियदर्शन मोटारींतून उतरला आणि आश्रमाच्या आवारांत

शिरल्याबरोबर प्रथमच लागणाऱ्या प्रशस्त झोंपडीच्या पायऱ्या चढून गांधीजींच्या खोलींत गेला.

गांधीजींच्या मस्तकाला ओला फडका गुंडाळलेला होता; व त्यांच्या शेजारीं बसलेली एक तरुण मुलगी त्यांना ताडपंख्यानें वारा घालीत होती.

प्रियदर्शननें आंत येतांच त्यांना वाकून अभिवंदन केलें.

त्याबरोबर गांधीजींनीं त्याच्याकडे बघून जें स्मित केलें, त्यांत जणुं असा भाव व्यक्त झाला कीं, 'तूं आज कां आला आहेस हें लक्षांत आलंय माझ्या !'

प्रियदर्शन लीनतेनें त्यांच्या समोर बसला.

तेव्हां गांधीजी ज्या तक्याला टेकून बसले होते, त्याच्या उजव्या बाजूला भिंतीवर टांगलेला एक फलक त्याच्या दृष्टीस पडला.

त्या फलकावर रस्किनचें पुढील सुभाषित लिहिलेलें होतें--

The essence of lying is in deception not in records. A lie may be told by silence, by euivocation, by the accent on a syllable, by a glance of the eye, by attaching a peculiar significance to a sentence. And all these kinds of lies are worse and baser by many degrees than a lie plainly worded.

तें सुभाषित वाचून प्रियदर्शनच्या मनांत आलें, असत्य जर इतक्या सूक्ष्म आणि विविध रूपांनीं प्रकट होत असेल, तर सत्य ही चीज किती दुर्मिळ असली पाहिजे !

"तूं कां आलास आज एवढ्या उशिरा ?"

"आपला सल्ला विचारण्यासाठीं, बापू ?--"

"राजकीय बाबतींत सल्ला विचारायचा असेल, तर पार्लमेंटरी कमिटीच्या अध्यक्षांकडे गेलं पाहिजे तुला--"

"त्यांचा सल्ला मला पटत नाहीं. म्हणून मी आपल्याकडे आलों–"

"माझ्याकडे येऊन काय उपयोग? तूं राष्ट्रपतींकडे जायला हवं होतंस. मी सल्ला देऊं शकत नाहीं तुला––"

"पण आपण माझी बाजू तर ऐकून घ्याल?––"

"आनंदानें! पण माझी फिरायला जायची वेळ झाली आहे आतां. तूं चालतांचालतांच सांग मला जें काय सांगायचं असेल तें––"

आणि ते लगेच उठून बाहेर आले.

प्रियदर्शनहि त्यांच्याबरोबर बाहेर पडला.

गांधीजी पायऱ्या उतरतात न उतरतात, तोंच काळ्या किनारीची शुभ्र रेशमी साडी नेसलेली आणि पायांत मखमली सँडल्स घातलेली एक प्रौढ, सुकुमार स्त्री त्यांच्याजवळ आली आणि मोरपिसें लावलेल्या आपल्या हातांतील सुंदर ताडपंख्यानें त्यांना वारा घालावयाला तिनें प्रारंभ केला.

ती स्त्री दृष्टीस पडतांच गांधीजींचे डोळे जणूं वात्सल्यानें ओथंबून आले आणि त्यांच्या गंभीर, श्रांत, सुरकुतलेल्या चेहऱ्यावर एकदम निर्भर हास्याचा प्रकाश पसरला.

आश्रमाच्या आवारांतून ते बाहेर पडत असतां दहाबारा माणसांचा परिवार त्यांच्याभोंवतीं गोळा झाला.

त्यांच्या डाव्या बाजूला ती प्रौढा चालत होती. तिच्या पलीकडे त्याच दिवशीं सकाळीं लाहोरहून आलेला एक धिप्पाड शीख पुढारी होता आणि उजव्या बाजूला प्रियदर्शन एकटाच हळुहळू त्यांच्याशीं बोलत चालला होता.

पाठीवर वेणीचा शेपटा सोडलेल्या एका बारा तेरा वर्षांच्या मुलीच्या खांद्यावर गांधीजींनीं आपला एक हात ठेवला होता; व दुसऱ्या हातांत असलेली त्यांच्याहिपेक्षां हातभर उंच काठी त्यांच्या जर्जर शरीराला आधार देत होती.

त्या मुलीच्या खांद्यावर हात ठेवल्यामुळें किंचित् कललेली ती गांधीजींची क्षीण शरीरयष्टि पाहून असें वाटे कीं, अवघ्या मानव-जातीच्या उन्नतीच्या चिंतेचें ओझें वाहून शिणलेला हा महात्मा त्या मुग्ध कौमार्याच्या उमलत्या शक्तींचा आसरा घेण्यासाठीं, सूर्यप्रका-शाच्या दिशेला झुकणाऱ्या वृक्षाप्रमाणें, किंचित् विनम्र झाला आहे.

क्षीणतेज झालेले अवतारी पुरुष स्पर्शानें दुसऱ्याचें तेज आपल्या-कडे खेंचून घेत असत, अशी कल्पना पुराणांतून आढळते. युवयुवतींच्या साहचर्याविषयीं गांधीजींना वाटणारी ही आसक्ति अशा प्रकारची तर नसेल ?

गांधीजींच्या मागल्या रांगेंत भगव्या रंगाची भगभगीत साडी नेसलेली एक राठ युरोपियन स्त्री एका लुंगी नेसलेल्या काळ्या मद्रासी गृहस्थाशीं इंग्रजींत आणि हिंदींत सारखी कुजबुजत होती.

—दूर अंतरावरून पडघम वाजवल्यासारखा चर्मवाद्याचा आवाज आणि ॐच्या उच्चाराची आठवण देणारा चमत्कारिक शब्द सारखा कानांवर पडत होता—

गांधीजी झपाझप चालत होते आणि प्रियदर्शन हळुहळू त्यांच्याशीं बोलत होता.

त्यांनीं त्याचें सर्व बोलणें मुकाट्यानें ऐकून घेतलें.

ते स्वत: मात्र एक शब्दहि बोलले नाहींत.

गांधीजींचें फिरणें संपून ते परत निघाले, त्या वेळीं अंधार पडत चालला होता.

प्रियदर्शनला सारखें वाटत होतें कीं, इतक्या सगळ्या गोष्टी आपण सांगितल्यानंतर तरी गांधीजी स्वत:चें मत व्यक्त करतील.

पण, ते मधून मधून आपल्या बरोबरच्या मुलांची थट्टा करण्या साठीं जें एकाद दुसरें वाक्य बोलत, तेवढेंच! त्यानें सांगितलेल्या हकिकतीविषयीं ते एक अवाक्षरहि बोलले नाहींत.

शेवटीं प्रियदर्शननें स्वतःच त्यांना विचारलें, "आपण काय सल्ला देतां मला ?--"

"माझा सल्ला ? मला वाटतं, सगळ्या गोष्टी अगदीं स्पष्ट आहेत. तुझा कार्यक्रम कांग्रेसच्या तत्वांशीं सुसंगत नाहीं हें पार्लमेंटरी कमिटीच्या अध्यक्षांनीं तुला सांगितलेंच आहे. कमिटीचा विचार न घेतां तो कार्यक्रम आगाऊ प्रसिद्ध करण्यांत तुझी चूक झाली यांतहि कांहीं शंका नाहीं !--"

"पण माझा कार्यक्रम जर पक्षांतील बहुमताला पसंत पडला तर ?–"

"पक्षाचं बहुमत घेण्याचा प्रश्नच मुळीं उद्भवत नाहीं. पार्लमेंटरी कमिटीला जो कार्यक्रम नापसंत आहे तो पक्षापुढं मांडण्याचंच मुळीं कारण नाहीं. मंत्रिमंडळ आणि पक्ष हीं दोन्ही कांग्रेसच्या हुकमती-खालीं आणि तिला जबाबदार आहेत—"

"हा शुद्ध फासिझम नव्हे का, बापू ?—"

"फासिझम ? छे ! हा जर खरोखरीच फासिझम असता, तर कांग्रेसचा आदेश मोडणाऱ्या इसमाचं डोकं धडावर शिल्लक राहिलं नसतं, प्रियदर्शन ! तुला मुख्य प्रधान करतांना जो विश्वास कांग्रेसनें तुझ्यावर टाकला, त्याला तूं पात्र नाहींस असं सिद्ध झालंय या तुझ्या वर्तनामुळं–"

"माझ्या सहकाऱ्यांचं वर्तन आपल्याला योग्य वाटतं का ?—"

"त्यांच्या वर्तनाचा प्रश्नच उपस्थित होत नाहीं मुळीं ! त्यांचं वर्तन जर गैरशिस्त असेल तर त्याचीं फळं ते भोगतील—"

हें वाक्य गांधीजींच्या तोंडून बाहेर पडतें न पडतें, तोंच त्यांच्या-पासून थोडया अंतरावर एक मोटार येऊन उभी राहिली.

आणि त्या मोटारींतून उतरलेल्या स्त्रीनें धांवत धांवत पुढें येऊन त्यांचे पाय धरले.

त्यांनीं खालीं वाकून तिला उठवली आणि तिच्याकडे पाहून आश्चर्यानें म्हटलें—

"कोण रजनी ?—"

"हो. माझे पति नाहींसे झाले—"

"होय. आतांच मला कळलं यांच्याकडून—"

गांधीजींनीं प्रियदर्शनकडे वळून म्हटलें.

"त्यांना अभयवचन देऊन परत आणणं शक्य नाहीं का ?"

"अभयवचन कसं देणार ? त्यानं पळून जाऊन उलट आणखी जास्त गुन्हा केला आहे. मला जेव्हां तो परवां भेटला, तेव्हां जर मला ही सगळी हकीकत माहित असती, तर मी लगेच स्वाधीन केला असता त्याला पोलिसच्या !—"

रोज कांहीं बोलली नाहीं.

तिच्या डोळयांतून अश्रु वाहूं लागले.

प्रियदर्शनच्या मनांत आलें, मोहन बेपत्ता झाला, हा तर त्याचा गुन्हा खराच. पण, वॉरंट निघणार असल्याची बातमी त्याला आगाऊ कळवून, ज्यांनीं त्याला निसटून जावयाला साह्य केलें, त्यांना गांधीजी कोणतें शासन करणार आहेत ? स्वतःच्या पुत्रांचीं दुष्कर्मं पोटांत घाल-णाऱ्या आंधळया धृतराष्ट्रासारखेंच हें सारें वर्तन नाहीं काय ?

गांधीजींच्या मुद्रेवरील प्रसन्नता आतां अगदीं मावळली होती. त्यांचा चेहरा किंचित् उग्र आणि त्रस्त दिसत होता.

त्या अप्रसन्न मनःस्थितींतच, नंतर विशेष कांहीं न बोलतां, ते आश्रमांत परत आले.

आकाशांत पसरलेले वळवाचे ढग आणि क्षितिजाजवळ असलेले धुक्याचे थर यांमुळें अष्टमीचें चांदणें झांकोळून गेलें होतें.

गांधीजी आल्याबरोबर तडक आपल्या झोंपडींत गेले.

झोंपडीच्या ओवरींत बसलेले दोन दाढी वाढलेले मध्यम वयाचे व्रती तंतुवाद्यें लावीत होते. झोपडीसमोरच्या पटांगणांत चटया घालून प्रार्थनेची तयारी करण्यांत येत होती.

तें दृश्य पाहून प्रियदर्शनला आठवण झाली.—गेल्या वर्षी याच दिवसांत मुख्य प्रधानपद मिळाल्यावर तो गांधीजींच्या सायंप्रार्थनेला हजर राहण्यासाठीं मुद्दाम शेगांवला आला होता. तो दिवस आणि हा दिवस! आपल्या हृदयांतील अत्यंत पवित्र, अत्यंत कोमल भावनांचा कसल्या तरी जबर आघातानें चक्काचूर होत आहे असें त्याला वाटलें आणि छातीवर दोन्ही हात ठेवून तो ओसरींतील एका खांबाला ओठंगून उभा राहिला.

आश्रमाच्या आवारांतले स्त्रीपुरुष आतां हातांत कंदील घेऊन प्रार्थनेसाठीं येत होते. गांधीजींच्या आसनासमोर बऱ्याच अंतरावर ते दोघे व्रती तंतुवाद्यें घेऊन बसले. प्रियदर्शनहि गांधीजींच्या डावीकडील पुरुषांच्या रांगेंत येऊन बसला.

दोन रांगांच्या मधोमध ठेवलेल्या आसनावर गांधीजी येऊन बसतांच प्रार्थनेला सुरवात झाली. त्यांच्या समोर कंदील ठेवलेला होता. पण त्यावर कागदाचें आच्छादन घातलेलें असल्यामुळें त्यांचा चेहरा स्पष्ट दिसत नव्हता. खादीचें शुभ्र वस्त्र अंगाभोंवतीं गुरफटून घेतलेली त्यांची ती मूर्ति त्या अंधुक चांदण्यांत गंभीर दिसत होती.

तें धुरकटलेलें चांदणें, तें शांत वातावरण, काष्ठासनावर बसलेली ती गांधीजींची चिंतनमग्न मूर्ति, त्यांच्या दोहों बाजूला बसलेले ते स्तब्ध स्त्रीपुरुष, तंतुवाद्यांच्या तारा छेडणारे ते जटिल व्रती!–प्रियदर्शनच्या मनांत आलें, बुद्धविहारांतील सांघिक प्रार्थनेचें दृश्य असेंच असेल काय?

तोंच चर्मवाद्याच्या ठेक्यावर ॐ मंत्राचें आवाहन करीत हिंडणारा तो उघडाबंब जपानी जती गांधीजींच्या समोर एक पांढरें वस्त्र पसरून त्यावर वज्रासन घालून बसला; व आपलें मस्तक जमिनीवर टेकून त्यानें खडया सुरांत प्रार्थना म्हटली.

त्या प्रार्थनेचा अर्थ कोणालाच कळला नाहीं. पण, एकादें उंची वस्त्र जसें टरकावून वेडेंवाकडें फाडावें, तसा त्याच्या त्या कर्कश आवाजामुळें त्या रमणीय शांततेचा एकदम भंग झाला.

तो जती बाजूला होतांच त्या दोघा व्रतींच्या शेजारीं बसलेल्या एका धवलवसना श्यामलेच्या कंठांतून संस्कृत प्रार्थनेचे कोमल सूर बाहेर पडले; व लगेच त्यांत हजर असलेल्या मंडळीच्या तोंडून निघालेला बेशिस्त आवाज मिसळला. ती प्रार्थना संपल्यावर गीतेच्या दुसऱ्या अध्यायांतील स्थितप्रज्ञाच्या लक्षणांचे श्लोक म्हणावयाला त्या श्यामलेनें सुरवात केली.

प्रियदर्शन किती तरी वेळां त्या प्रार्थनेला हजर राहिला होता. पण त्या श्यामलेनें चालविलेलें गीतेंतल्या श्लोकांचें तें अशुद्ध वाचन ऐकून त्याच्या सुसंस्कृत मनाला आज उबग आल्याशिवाय राहिला नाहीं. आतांपर्यंत त्या प्रार्थनेंत त्याचें मन रमलें नव्हतेंच. पण स्थितप्रज्ञाच्या लक्षणांचा तो अशुद्ध पाठ ऐकून विरसलेल्या त्याच्या मनांत विचारांचें काहूर उठलें. विशेषतः 'वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते' हा श्लोकार्ध ऐकत असतां त्याला थोड्या वेळापूर्वीं गांधीजींशीं झालेल्या आपल्या संभाषणाची आठवण झाली.——इतकीं वर्षें गांधीजी हा गीता-पाठ ऐकत आहेत. पण त्यांचें मन एकाद्या सामान्य राजकारणी माणसा-इतकेंच पक्षपाती आणि अभिनिविष्ट असावें हें नवल नव्हे का ? सांज-सकाळ चालणाऱ्या या प्रार्थनेचा जर मनावर कांहींच परिणाम होत नसेल, तर लहान मुलांच्या संध्येसारखी ती एक निव्वळ कवाईतच नव्हे का ? किंवा, कांहीं कम्युनिस्ट म्हणतात त्याप्रमाणें, हिंदुस्थानांतील श्रद्धाळु बहुजनसमाजाला झुलविण्यासाठीं हें जाहीर प्रार्थनेचें प्रदर्शन गांधीजी रोज सकाळसंध्याकाळ भरवितात ?

तत्क्षणींच त्याच्या मनांत आलें कीं, गांधीजी ईशचिंतनांत निमग्न असतां आपण त्यांच्यासमोर बसून त्यांना ढोंगी ठरवीत आहोंत——

आणि तो विचार मनांत येतांच, अनुतापाची डागणी बसल्या-सारखी होऊन, त्याच्या संभ्रांत मनानें एकदम पलट खाल्ली--

गांधीजी ढोंगी? सगळ्या दुनियेला आपलें हृत्कपाट खोलून दाखविणारे, सगळ्या जगासमोर आपलीं स्खलनें मुक्तकंठानें कबूल करणारे गांधीजी ढोंगी? मग सत्याला जगांत थारा तरी कुठें राहिला?

पण सत्य—सत्य म्हणजे तरी काय? जगांतल्या इतर साऱ्या वस्तूं-प्रमाणें सत्य हें सुद्धां सापेक्षच नसतें कां? पाहणाऱ्याची दृष्टि जशी असेल, वृत्ति जशी असेल, संस्कार जसे असतील, तसें सत्य त्याला दिसतें. दुसऱ्याला तें सत्य वाटेलच असें नाहीं. येशू ख्रिस्ताला ज्यांनीं हट्टानें सुळावर दिला, त्यांनीं तो, आपल्या कल्पनेनुसार, सत्याच्या अभि-निवेशानेंच दिला आणि येशू ख्रिस्त जो आनंदानें सुळावर गेला, तोहि, त्याच्या कल्पनेनुसार, सत्याच्या प्रवर्तनासाठींच गेला! म्हणून मी सत्या-चरणी आहे अशा अभिमानानें कोणीहि दुसऱ्याची पायमल्ली करावयाला प्रवृत्त होऊं नये.

पण गांधीजी—गांधीजी ज्या ईर्ष्येनें, ज्या आग्रहानें दुसऱ्याला दोषी ठरवितात, सत्याचा, सत्याग्रहाचा आणि सत्यासत्यनिर्णयाचा सगळा मक्ता ज्या आत्मविश्वासानें आपल्याकडे घेतात, तो त्यांचा आत्म-विश्वास!—तो अहंकार नव्हे का निव्वळ? त्या अहंकारानें ग्रासलेलें, अवलिप्त झालेलें त्यांचें मन!— छे, ते कदाचित् जाणूनबुजून अन्याय करीत नसतील; पक्षपातानें वागत नसतील; सत्याला उचलून धरीत नसतील. पण त्यांचा तो आत्मविश्वस्त अहंकार, आपल्या स्वतःच्या अंतःकरणप्रवृत्तीशिवाय जगांतील अन्य कोणत्याहि विवेकशवतींचा कौल न मानणारा हिमालयाएवढा प्रचंड अहंकार—त्या अहंकारानें त्यांना अगदीं अंध आणि अमानुष बनवून सोडलें आहे! स्वतःच्या प्रमादांचा आणि स्खलितांचा डांगोरा स्वतःच्या तोंडानें जगभर पिटणें हें सुद्धां त्या अहंकाराचेंच चेष्टित आहे एक!

तीं कल्पना मनांत येतांच, अमृतसर कांग्रेसच्या वेळीं माँटफोर्ड सुधारणा समाधानकारक ठरविण्यासाठीं टिळकांबरोबर घातलेल्या वादापासून तों पुणें करारासाठीं येरवडयाच्या तुरुंगांत केलेल्या प्रायोप्रवेशनापर्यंतचें गांधीजींचें सगळें लहरी, अहंनिष्ठ राजकीय चारित्र्य त्याच्या डोळयांपुढें उभें राहिलें आणि त्याला वाटलें, मी आणि माझें तत्त्वज्ञान यांच्या पलीकडे ज्याला जग नाहीं, असा हा स्वयंकेंद्रित आणि स्वतःप्रमाण महात्मा !— हा जरी स्वतःला अहिंसावादी म्हणवीत असला, तरी त्याची ती अहिंसा जगांतल्या कोणत्याहि अत्यंत हिंस्र शक्तीइतकीच जुलमी आणि आततायी नाहीं का?

अशा प्रकारचे विरोधी विचार त्याच्या मनांत थैमान घालीत असतांनाच ती प्रार्थना संपली, हें तंतुवाद्यांचा गोड, सांत्वनकारक झंकार थांबतांच त्याच्या लक्षांत आलें आणि त्यानें चमकून वर पाहिलें.

तों त्या प्रौढेचा हात धरून गांधीजी आसनावरून उठत असल्याचें त्याच्या दृष्टीस पडलें.

त्यांची कष्टामुळें वाकलेली ती शरीरयष्टि, ते रोड लटपटणारे पाय, त्या कानशिलांवरच्या फुगलेल्या शिरा आणि चिंतेचा भार असह्य झाल्यामुळेंच कीं काय किंचित् अवनम्र झालेलें मस्तक !—तें पाहून प्रियदर्शनच्या मनांत आलें, गांधीजी कसेहि असले, तरी आज त्यांच्याच प्रभावानें या दुबळ्या परतंत्र देशाला हातांत शस्त्र धरल्याशिवाय अत्यंत बलाढ्य साम्राज्यशाहीशीं झुंज देण्याचें अवसान आलें आहे आणि त्यांच्या या अभिनव राजकारणामुळें तो सगळ्या जगाच्या कौतुकाचा विषय होऊन बसला आहे, यांत शंका नाहीं.

आणि, गांधीजी हळुहळू पायऱ्या चढून आपल्या झोंपडींत जात असतां, एक प्रकारच्या भक्तिभावानें तो त्यांच्याकडे बघत होता.

ते खोलींत जाऊन आपल्या आसनावर बसतात न बसतात, तोंच प्रियदर्शन आंत गेला.

आणि त्यांना अभिवादन करून लीनतेनें म्हणाला —

"मी आपला निरोप घ्यायला आलों आहे—"

"मग काय ठरवलं आहेस तूं ?—"

"मी राजीनामा द्यायचं ठरवलंय—"

"तुझ्या नुसत्या राजीनाम्यानं भागणार नाहीं, प्रियदर्शन ! तूं आपली चूक जाहीर रीतीनं कबूल करून राजीनामा दिला पाहिजेस. आपण आतांच मसुदा तयार करूं या तुझ्या राजीनाम्याचा !—"

"पण माझ्या हातून कांहीं चूक झाली आहे असं वाटत नाहीं मला, बापू !—"

आपल्याला अत्यंत जिव्हाळयानें संबोधून मृदु आवाजांत उच्चारलेल्या त्या वाक्यांत प्रकट झालेल्या निश्चयाची कठोरता गांधीजींना जाणवल्याशिवाय राहिली नाहीं; व आपले विस्फारलेले डोळे त्याच्यावर रोखून त्यांनीं विचारलें—

"मग तूं राजीनामा का देतोस ?—"

त्या डोळयांतील आव्हानाचा स्वीकार तितक्याच निर्भय नेत्रांनीं करून त्यांच्या दृष्टीला दृष्टि देत प्रियदर्शननें अगदीं शांतपणानें उत्तर दिलें—

"पार्लमेंटरी कमिटीची आगाऊ संमति न घेतां आपला कार्यक्रम प्रसिद्ध करण्यांत माझ्या हातून कांहीं गैरशिस्त वर्तन घडलंय असं समजूनहि मला वाटत नाहीं. प्रांताचा कारभार प्रांताच्या विशिष्ट गरजा लक्षांत घेऊन चालवण्यापुरतं तरी स्वातंत्र्य मुख्य प्रधानाला आहे, असं गृहीत धरून मी चाललों होतों. पण माझा हा समज आपल्या सर्वांच्या शिस्तीच्या कल्पनांशीं विसंगत आहे असं आतां माझ्या अनुभवाला आलं आहे. मला आशा होती कीं, आपण तरी माझ्या कार्यक्रमाला मान्यता द्याल आणि प्रांतांतील दलित वर्गांना दिलेलीं आश्वासनं पूर्ण करण्याचं भाग्य मला लाभेल. पण, ज्या अर्थीं आपल्याला माझं वर्तन

आणि कार्यक्रम हीं दोन्ही पसंत नाहींत, त्या अर्थी आपल्या कृपेनं प्राप्त झालेलं मुख्य प्रधानपद सोडून देणं हेंच माझं कर्तव्य ठरतं !—"

त्यानें अत्यंत सावकाश उच्चारलेल्या त्या वाक्यांत जी स्वाभिमानाची दीप्ति भरलेली होती, तिनें गांधीजी दिपल्यासारखे झाले.

पण क्षणभरच.

त्या वाक्यांत गर्भित असलेल्या निषेधानें डिवचलेला त्यांचा विराट् अहंकार लगेच फुसफुसत उठला.

आणि ते उपरोधानें स्मित करून उद्गारले—

"मी तुला अन्याय केला अशी अजूनहि तुझी समजूत आहे तर! तूं अशा रीतीनं पदत्याग करावास याबद्दल मला खेद वाटतो. मला आशा आहे कीं, तुला आपली चूक केव्हां ना केव्हां तरी कळून येईल आणि मी किंवा कांग्रेसनें आपल्याला अन्याय केला असल्याचा हा जो तुझा समज आहे तो दूर होईल—"

प्रियदर्शन यावर कांहीं बोलला नाहीं.

तो पुन्हा एकवार त्यांना नमस्कार करून त्या झोंपडींतून बाहेर पडला.

आश्रमाच्या आवाराबाहेर तो येतो न येतो, तोंच आपल्यामागून कोणीतरी झपाझप येत आहे असें त्याला वाटलें.

तो चपापून मागें वळला.

तोंच अत्यंत लीनतेनें उच्चारलेले शब्द त्याच्या कानांवर पडले—

"रोजबाईंना आपल्याशीं कांहीं बोलायचंय, साहेब!—"

"तूं कोण आहेस? आणि त्या बाईचं काय काम आहे माझ्याशीं?—"

"मी वसंता, विठोबाजींचा मुलगा—"

"काय, विठोबाजींचा मुलगा?—"

त्या अंधुक चांदण्यांत त्याच्याकडे न्याहाळून पाहण्याचा प्रयत्न करीत प्रियदर्शन कुतूहलानें उद्गारला.

त्या उद्गारांतील जिव्हाळा वसंताला जाणवला आणि त्याचें अंतःकरण भरून आलें.

तो सद्गदित आवाजानें म्हणाला, "मघाशीं ज्या बाई महात्माजींच्या पायां पडल्या, त्या माझ्या भगिनी आहेत. त्यांची आपल्याला एक प्रार्थना आहे—"

"मला प्रार्थना करून कांहीं उपयोग नाहीं आतां, वसंता!—"

"असं कसं म्हणतां? आपण मुख्य प्रधान आहांत. आपण मनांत आणलं तर—"

"मघाशीं मी मुख्य प्रधान होतों. आतां नाहीं. आणि म्हणूनच मला प्रार्थना करून कांहीं उपयोग नाहीं!"

वसंतानें गोंधळून त्याच्याकडे पाहिलें.

क्षणभरानें तो म्हणाला—

"आपण थट्टा करतां माझी गरिबाची—"

"नाहीं वसंता! मी तुला अगदीं खरं सांगितलं. मघाशीं मी मुख्य प्रधान होतों. आतां नाहीं. आणि मुख्य प्रधान असतों तरीहि माझा उपयोग झाला नसता तुम्हांला! महात्माजींनीं मघाशीं जें सांगितलं, तें अगदीं बरोबर आहे—"

"न्यायाच्या दृष्टीनं महात्माजींचं म्हणणं बरोबर असेल कदाचित्. पण जगांतले सगळे व्यवहार काय न्यायानेंच चालतात का, साहेब? कांग्रेसच्या ताब्यांतल्या सगळ्या प्रांतांतून आज जे किसान न् कामगार यांचे झगडे चालू आहेत, त्यांच्या मुळाशीं अन्याय नाहीं असं महात्माजी म्हणूं शकतील का? आम्ही आपल्याकडे आलों ते न्याय करून घ्यायला नव्हे; तर केवळ दयेची भिक्षा मागायला—"

न्याय आणि दया! मोहनवर जो नापत्ता होण्याचा प्रसंग आज ओढवला, तो काय केवळ त्याच्या एकट्याच्या दोषामुळें? छे! सध्याच्या

या दांभिक राजकारणाचा मोहन हा एक प्रतीक, एक प्रसव आहे. मग त्याचा एकट्याचाच नाश काय म्हणून होऊं द्यायचा? आपल्या स्वार्थ-साधनासाठीं ज्यांनीं त्याचा उपयोग करून घेतला आणि ज्यांनीं त्याला निसटून जाण्याचीहि संधि दिली, ते आपल्या उच्च पदावर अढळ आहेत! आणि एकटा मोहन तेवढा उजळ माथ्यानें जगण्याचा हक्क गमावून बसला. या प्रकाराला न्याय कसें म्हणावें?

हे विचार त्याच्या मनांत उसळत असतांनाच वसंता पुन्हा त्याला काकळुतीनें म्हणाला--

"साहेब, मग रोजबाईंना आणूं का मी आपल्या भेटीला?--"

"माझ्या भेटीला?--"

स्वतःच्या विचारांत चूर असलेल्या प्रियदर्शननें दचकून विचारलें.

"नको वसंता! मी तुला सांगितलं ना मी आतां मुख्य प्रधान नाहीं म्हणून!--"

आणि त्याला नमस्कार करून तो झपाट्यानें त्या अंधुक प्रकाशांत नाहींसा झाला.

# एकाकी

"प्रियदर्शन, तुम्ही विनाकारण घाई केलीत इतकी! आपला कार्यक्रम पक्षाच्या सभेपुढं ठेवून आणि त्यावर त्याचा निर्णय घेऊन मग राजीनामा द्यायला हवा होता तुम्ही! म्हणजे कांग्रेसचे वरिष्ठ अधिकारी किती सुलतानी आणि असहिष्णु वृत्तीचे आहेत, हें जगाला कळलं असतं सगळ्या!—"

उत्तमराव आपल्या चहांतली साखर ढवळीत उद्गारले.

"पण महात्माजी माझ्या कार्यक्रमाला प्रतिकूल आहेत असं कळल्यावर पक्षानं त्याला मान्यता दिली असती असं वाटतं कसं तुम्हांला, उत्तमराव? इतकी स्वतंत्र बुद्धि नू धैर्य आज कांग्रेस पक्षांत आहे का?—"

"पण शेगांवला जाऊन जशी ती एक विषाची परीक्षा तुम्ही पाहिलीत, तशी ही दुसरी परीक्षा पाहिल्यानं काय बिघडत होतं? आपलं राजीनामा द्यायचं तर ठरलंच होतं. पण तो देतांना कांग्रेसमधल्या या

अरेरावांचं खरं स्वरूप चवाठ्यावर आणायला काय हरकत होती?—"

"हरकत होती तर! गांधीजी माझ्या कार्यक्रमाच्या विरुद्ध आहेत असं समजल्यानंतरहि जर मी स्वतःच्या अधिकारांत पक्षाची सभा बोलावून त्याच्यापुढं आपला कार्यक्रम ठेवला असता, तर गांधीजी आणि पार्लमेंटरी कमिटी या दोघांचीहि मी जाणून बुजून अवज्ञा केल्यासारखं झालं असतं; व सत्तेच्या लोभानं आपण गैरशिस्त वर्तन केलं असा दोषारोप आपल्यावर आला असता. तसा कोणताहि डाग आपल्या राजकीय चारित्र्याला लावून घेण्याची माझी इच्छा नव्हती. पक्षाचा पाठिंबा आपल्या कार्यक्रमाला मिळण्याचा संभव नाहीं असं ज्या क्षणीं मला समजलं, त्याच क्षणीं लोकशाहीच्या तत्त्वानुसार राजीनामा देणं हें कर्तव्य ठरलं माझं!—"

"लोकशाही! लोकशाही! जगांत खरोखरीच कुठं लोकशाही आहे का, प्रियदर्शन? कमाल, मुसोलिनी, हिटलर, स्टालिन हे सारेच सुरवातीला लोकशाहीचे पुरस्कर्ते होते. पण तेच आज झोटिंग होऊन लोकशाहीच्या उरावर बसले आहेत. सत्य, अहिंसा, अस्तेय वगैरे नीतिशास्त्रांतलीं श्रेष्ठ तत्त्वें जशीं अव्यवहार्य ठरलीं आहेत, तसंच राज्यनीतिशास्त्रांतलं लोकशाहीचं परमोच्च तत्त्वहि अखेर अव्यवहार्य ठरणार अशी भीति वाटते मला! रशियांतले कम्युनिस्ट म्हणतात, वर्गविहीन समाजरचना अस्तित्वांत येईपर्यंत आम्ही अरेरावी सत्ता गाजविणार! आणि इटलींतले फॅसिस्ट म्हणतात, आमच्या राष्ट्रीय आकांक्षा तृप्त होईपर्यंत आम्ही सुलतानी हैदोस घालणार! मिळून दोन्ही प्रकारच्या राजवटींत बिचाऱ्या लोकशाहीचं मात्र मरण! पुरेशी सत्ता हातीं येतांच प्रत्येक राजकीय पुढारी सर्वाधिकारी बनतो आणि संक्रमण-काळाचें निमित्त सांगून खुशाल लोकशाहीच्या नरडीला नख लावतो. अहिंसेचे प्रवर्तक म्हणून विश्ववंद्य ठरलेले महात्माजी सुद्धां जगांतल्या या नव्या राजनीतीला अपवाद नाहींत. फक्त त्यांचे मार्ग तेवढे दिसा-

यला मोठे सात्त्विक आणि सोज्वळ आहेत. त्यांच्या नेतृत्वाखालीं कांग्रेस पक्षाच्या हातीं जी चत्कोर सत्ता आली, तिच्या जोरावर त्यानीं देशांतल्या साऱ्या अग्रगामी पक्षांचा तेजोभंग केला. प्रियदर्शन, तुम्हांला ज्यांनीं पदभ्रष्ट केलं, त्यांना आपण आपल्या या वर्तनानं खुद्द गांधींना पदभ्रष्ट करीत आहांत, हें समजलं नाहीं. तुमच्या पदभ्रष्टतेमुळं सत्य, अहिंसा आणि अंतःशुद्धि यांचा बडेजाव माजविणाऱ्या महात्म्याच्या तोंडावरला साधुत्वाचा मुखवटा निखळून पडला आणि त्याचं राजकीय चारित्र्य किती हीणकस आहे, हें जगाला कळून चुकलं! तुम्ही ज्या क्षणीं पदभ्रष्ट झालांत, त्याच क्षणीं गांधींच्याहि पदभ्रष्टतेला प्रारंभ झाला, गांधीयुगाच्या अंताची सुरवात झाली !––"

"पण नुसता गांधीयुगाचा अंत होऊन आपला काय फायदा आहे, उत्तमराव? त्या युगाचा अंत झाल्यावर जर देशांत निव्वळ बौद्धिक अराजक माजणार असेल, तर त्यापेक्षां तें युग आणखी थोडं लांबलेलं बरं असं मी म्हणेन—"

"चांगलं अन्न मिळेपर्यंत शरीराला अपाय करणारं वाईट अन्न खात रहावं असं म्हणण्यासारखाच युक्तिवाद आहे हा तुमचा, प्रियदर्शन! ढोंगी आणि अरेरावी अशा या गांधीयुगाची हयात वाढण्यापेक्षां देशांत अराजक माजलेलं पुरवेल मला! त्या अराजकांतूनच प्रगतीचा मार्ग निघेल–"

उत्तमराव कदाचित् आणखीहि कांहीं वेळ बोलत राहिले असते. पण, काल रात्रीं शेगांवहून परतल्यापासून तों या वेळेपर्यंत सतत लिहीत किंवा बोलत राहिल्यामुळें, प्रियदर्शनला आतां इतका कांहीं थकवा आला होता कीं, त्यानें तो वाद अधिक न वाढवतां कामकाजाच्या जरूर त्या गोष्टी बोलून उत्तमरावांना निरोप दिला.

रात्रीं गांधीजींना आपला राजीनामा देण्याचा निश्चय सांगून तो जो शेगांवहून निघाला, तो नागपुरास न जातां वर्ध्याला सर्किट हाऊसमध्यें येऊन राहिला; व एका क्षणाचीहि विश्रांति न घेतां, त्यानें,

राजीनामा देण्याच्या दृष्टीनें, निरवानिरव करावयाला सुरवात केली.

शेगांवहून निघतांना त्याचा पहिला विचार सरळ नागपूरला जाण्याचाच होता. पण, वाटेंत त्याच्या मनांत अशी शंका आली कीं, नागपूरला गेल्यावर आपल्या इच्छेप्रमाणें आपल्याला ताबडतोब राजीनामा देणें कदाचित् शक्य होणार नाहीं. उत्तमराव, प्रियंवदा आणि दाजीसाहेब या तिघांचीहि आपल्याला भीड पडेल. म्हणून त्यानें राजीनामा रवाना केल्यावरच नागपूरला परत जावयाचें असें ठरविलें; व रात्रीं सर्किट हाऊसमध्यें मुक्काम केला.

मुख्य प्रधानपद आणि त्याबरोबरच असेंब्ली कांग्रेस पक्षाचें नेतृपद या दोहोंच्याही राजीनाम्याचीं पत्रें त्यानें तयार केलीं; व ना. गव्हर्नर यांना पाठवावयाच्या राजीनाम्याच्या पत्राचा मसुदाहि त्यानें निश्चित केला. गांधीजींना राजीनाम्याच्या बाबतींत जें उत्तर त्यानें दिलें होतें, त्या उत्तराला धरूनच त्यानें पार्लमेंटरी कमिटीच्या अध्यक्षाला पाठवावयाचें पत्र तयार केलें. ना. गव्हर्नर यांना लिहिलेल्या पत्रांत मात्र, या अंतर्गत मतभेदांचा उल्लेख न करतां, मुख्य प्रधानपद आणि नेतृपद यांचा राजीनामा आपण देत आहोंत, एवढेंच फक्त त्यानें लिहिलें होतें.

हीं मुख्य पत्रें तयार झाल्यावर त्यानें हरिजन सेवकसंघ, ऑल इंडिया कांग्रेस कमिटी, प्रांतिक कांग्रेस कमिटी यांचें सदस्यत्व आणि कांग्रेसच्या क्षेत्रांतील इतर सर्व अधिकाराच्या जागा यांच्या राजीनाम्याचीं पत्रें लिहिलीं; व नंतर अगदीं जरूरीच्या फायली निकालांत काढून पहांटे तीनच्या सुमारास तो अंथरुणावर पडला.

सकाळी उठल्याबरोबर त्यानें आपले राजीनामे पार्लमेंटरी कमिटीचे अध्यक्ष आणि ना. गव्हर्नर यांच्याकडे रवाना केले; व वृत्तपत्रांचे जे प्रतिनिधि त्याला भेटावयाला आले, त्यांनाहि जरूर ती सर्व माहिती त्यानें मोकळ्या मनानें दिली.

तेव्हां मुंबईच्या एका अँग्लोइंडियन पत्राच्या प्रतिनिधीनें त्याला विचारलें, "आपल्या या साऱ्या राजीनाम्यांचा अर्थ आपण राजकारणांतून कायमचे निवृत्त होत आहांत असाच होतो नव्हे का?––"

"का बरं? असा अर्थ करण्याचं काय कारण? मी जरी कांग्रेसच्या ताब्यांतल्या सर्व संस्थांतील अधिकारपदांचे राजीनामे दिले असले, तरी अद्याप तिचा प्राथमिक सभासद आहेच; व याचा अर्थ कोणीही असाच करील कीं, मी कांग्रेस किंवा राजकारण हीं दोन्हीहि सोडलेलीं नाहींत––"

"मग आपण सगळ्या अधिकाराच्या जागांचा राजीनामा का दिला?––"

"कांग्रेसमधील आजच्या अधिकारारूढ गटाशीं यापुढें माझें जमण्याची शक्यता नसल्यामुळं! पण गांधीगटाशीं संबंध तोडणें म्हणजे कांग्रेस किंवा राजकारण यांच्याशीं फारकत करणें नव्हे. कांग्रेसमध्यें आजपर्यंत अनेक पक्ष उत्पन्न झाले आणि कांहीं काळ सत्ता भोगून मागें पडले–"

"म्हणजे गांधीगट लवकरच मागं पडेल अशी आपली समजूत आहे?––"

"हो. कांग्रेसनें राज्यसूत्रें हातीं घेतल्यापासून तिच्या कारभाराबद्दल असंतोष आणि निराशा सारखी वाढत आहे; व कांग्रेसचे सध्यांचे धुरीण आणि धोरण हीं दोन्हीहि लवकरच बदलतील, अशी मला खात्री वाटते. विशेषतः युरोपांत जर युद्ध सुरू झालें, तर हिंदी राजकारणाचें सारेंच स्वरूप अजिबात बदलून जाईल. हिंदुस्थानाचं भवितव्य हें आमच्या स्वतःच्या प्रयत्नापेक्षां युरोपांतल्या घडामोडींच्या प्रभावावर जास्त अवलंबून आहे––"

"गांधींच्या नेतृत्वाची उपयुक्तता संपली असं आपलं मत आहे का?––"

"त्यांच्या तत्वज्ञानाचें स्वरूपच मुळीं असें आहे कीं, कांहीं एका मर्यादेपलिकडे त्यांच्या नेतृत्वाचा उपयोग होणें शक्य नाहीं. आजच्या

शास्त्रीय जगांत जीविताकडे पाहण्याची त्यांची जुनाट अशास्त्रीय दृष्टि आणि त्यांचें आत्मनिष्ठ, लहरी राजकारण यांचा निभाव लागणें अशक्य आहे. गेल्या वीस वर्षांत महात्माजींनीं हिंदी बहुजनसमाज सगळया बाजूंनीं जागृत आणि संघटित करून त्याची झगडण्याची शक्ति वाढविली, यांत शंका नाहीं. पण आज पुन्हा वीस वर्षांनीं जग क्रांतीच्या मार्गावर येत आहे; व या क्रांतीच्या काळांत हिंदुस्थानाला योग्य दिशा दाखविण्याचें सामर्थ्य महात्माजींच्या प्रतिगामी तत्वज्ञानांत आहे असं मला वाटत नाहीं—"

"अहिंसेवर आपली श्रद्धा नाहीं काय?—"

"हा प्रश्न मला आपण का विचारतां?—"

"आपल्या कार्यक्रमांतील लष्करी शिक्षणाची योजना अहिंसेच्या तत्वाला विसंगत असल्यामुळं आपण गांधीजींच्या मनांतून उतरलांत, अशी बोलवा आहे. म्हणून आपल्याला हा प्रश्न मी विचारला—"

"अहिंसेवर माझी श्रद्धा नाहीं. मला ती अत्यंत अव्यवहार्य वाटते; व हिंदी लोकांना आज गत्यंतर नाहीं म्हणूनच त्यांनीं जगांतल्या हिंस्र आणि हत्यारबंद राष्ट्रांच्या चढाओढींत निरुपायानं अनत्याचारी रहायचं आहे. अहिंसेचा राजकीय प्रयोग हिंदुस्थानांत पूर्वी होऊन गेला आहे; व अशोकाच्या वैभवशाली साम्राज्याचा त्या प्रयोगापायीं विध्वंस झाला आहे. तेव्हां महात्माजींच्या या प्रयोगांत माझ्या दृष्टीनं कांहींच अपूर्वाई नाहीं."

"गांधीजींच्या जीवितकार्याविषयीं आपल्याला कांहींच आदर उरलेला नाहीं काय?—"

"गांधीजींविषयीं कोणत्या भारतीयाला आदर वाटणार नाहीं? त्यांच्या जीवितकार्याविषयीं जर मला आदर नसता, तर गेलीं दहा वर्षे त्यांचा अनुयायी म्हणून मी राजकारणांत खचित नांदलों नसतों. गांधीजींच्या तत्वज्ञानांत दोष आणि उणीवा असतील; पण सूर्याच्या बिंबावरल्या डागांनींसुद्धां कधींकधीं जगाचा फायदाच झालेला आपण पहात नाहीं

का? त्यांच्या अहिंसेच्या शिकवणुकीची गरज आज जर सर्वांत जास्त कोणाला असेल, तर ती पाश्चात्य राष्ट्रांना. निःशस्त्र आणि निःसत्व हिंदुस्थानाला अहिंसेचे पाठ देणें म्हणजे त्याला मानसिक अवनतीच्या मार्गाला लावण्यासारखं आहे!"

वृत्तपत्रांचे प्रतिनिधि गेल्यावर तो स्नान करून जेवावयाला बसणार, तोंच नागपूरहून फोन आला.

तो फोन प्रियंवदेचा होता. तिनें विचारलें—

"तूं राजीनामा दिल्याची बातमी येथील 'लोकहित' पत्रानं जादा अंक काढून प्रसिद्ध केली आहे. ती खरी आहे का?—"

"हो—"

"तूं इथं केव्हां येणार?—"

"मी आतां जेवल्याबरोबर निघतोंय—"

त्यानें उत्तर दिलें.

आणि, नागपूरला गेल्यावर आपल्याला कोणत्या वादळाला तोंड द्यावें लागेल, याचा विचार करीत तो जेवावयाला बसला.

जेवण आटोपल्याबरोबर थोडा वेळ विश्रांति घेऊन तो मोटारनें नागपूरला यावयाला निघाला.

दुपारीं तीनच्या सुमारास जेव्हां तो नागपुरला येऊन पोंचला, तेव्हां 'सागर व्हिला'च्या प्रशस्त पटांगणांत ठिकठिकाणीं लोकांचे थवे चिंतातुर मुद्रेनें आपली वाट पहात उभे आहेत, असें दृश्य त्याच्या नजरेस पडलें.

त्याची मोटार कमानीखालीं थांबतांच उमाकांत आणि दाजीसाहेब पुढें आले.

दोघांचेहि चेहरे अगदीं गंभीर होते.

"माझ्या राजीनाम्याची बातमी केव्हां कळली दाजीसाहेब आपल्याला?—"

"आम्ही 'लोकहितां'त वाचली प्रथम आणि तिच्यावर मुळींच विश्वास बसेना आमचा!--"

"तसं होणं स्वाभाविक आहे अगदीं--"

प्रियदर्शननें हंसून म्हटलें.

"पण आपण कोणाचा सल्ला घेतला नाहीं आणि एकदम राजीनामा दिला हें कसं काय झालं?--"

"मला वाटतं, उत्तमरावांना कल्पना होती--"

"त्यांचा असा फोन आलाय मघाशीं प्रिया, कीं इतर सगळी मंडळी तुला भेटून गेल्यावर निवांतपणा मिळाला म्हणजे त्यांना फोन करून बोलावून घ्यायचं आपण--"

"ठीक आहे. मी एकदां सगळ्यांशीं थोडंथोडं बोलतों आणि मग करूं या फोन त्यांना--"

त्यानंतर व्हरांड्यांत आणि पटांगणांत जे अनेक लोक जमले होते, त्यांच्या प्रश्नांना त्यानें थोडक्यांत शांतपणानें उत्तरें दिलीं आणि त्यांना वाटेला लावलें.

तरी सुद्धां सारखी नवी नवी मंडळी येतच होती.

आणि येणारा प्रत्येक माणूस हा त्याच्या पदच्युतीमुळें इतका कांहीं क्षुब्ध आणि संतप्त झालेला असे कीं, त्याच्या क्रोधाविष्ट मनाचें सांत्वन करतांना प्रियदर्शनला किती तरी वेळां आपल्या विचित्र परिस्थितीचें हंसू आलें असेल.

स्वतःला प्राणांतिक जखम झालेली असावी, पण ती जखम पाहतांच घेरी येऊन बेशुद्ध पडलेल्या माणसाला सावध करण्याचा प्रसंग आपल्यावर यावा, तसा विचित्र प्रकार होता तो!

हा प्रकार संध्याकाळीं पांच वाजेपर्यंत चालला होता.

शेवटीं उमाकांतानें कंटाळून त्याला म्हटलें, "प्रिया, माई तुला आंत बोलावताहेत जरा--"

त्याबरोबर तो लगेच उठून आपल्या अभ्यासिकेंत आला.

प्रियंवदा त्याची वाट पहात खुर्चीवर बसली होती.

त्यानें तिच्याकडे पाहिलें मात्र--

—तिच्या डोळयांतले आवरलेले अश्रु एकदम ओघळले.

दोघेंहि क्षणमात्र अगदीं स्तब्ध होतीं.

काल रात्रीं गांधीजींजवळ राजीनामा देण्याचा निश्चय व्यक्त केल्यापासून आतांपर्यंत तो सारखा विचार करीत, लिहीत किंवा बोलत होता. त्यामुळें आपल्या अधिकारत्यागाचा परिणाम आपल्या भोंवतालच्या माणसांवर काय झाला असेल, याचा विचार करावयाला त्याला उसंत मिळाली नव्हती.

पण प्रियंवदेचे ते अश्रु पहातांच आपलें हृदय भरून येत आहे, असें त्याला वाटलें.

तिच्या डोळयांत अश्रु आलेले त्यानें पूर्वी फक्त दोनच वेळां पाहिले होते.

आणि, ते म्हणजे सर महादेव आणि कांता यांच्या मृत्यूनंतर ती जेव्हां तुरुंगांत त्याला भेटावयाला आली होती, त्या वेळीं—

त्या दोन्ही प्रसंगीं तो समोर येऊन उभा राहतांच तिच्या तोंडून शब्द फुटेना—

फक्त डोळयांतून अश्रु तेवढे घळघळां वाहूं लागले.

त्यानंतर आज पुन्हा तिला अश्रु गाळतांना त्यानें पाहिली.

पण त्यानें आपल्या दुःखाचा कढ निग्रहानें गिळला आणि तिला म्हटलें--

"माई, आपण चहा घेऊं या आतां. मी आज फार थकलोंय—"

प्रियंवदा कांहीं न बोलतां मुकाट्यानें आंत गेली.

प्रियदर्शनला वाटलें, ती जर चार शब्द एकदां बोलून गेली असती, तर तिच्या आणि आपल्या मनावरला भार एकदम हलका झाला असता—

आणि, त्याच्या मनांत काय आलें कोण जाणे, त्यानें टेबलावरला रिसीव्हर उचलून उत्तमरावांना ताबडतोब येण्याविषयीं फोन केला.

आज आपल्या कोणत्याही आवडत्या माणसाबरोबर एकांतांत रहावयाचें नाहीं, एकट्यानें बोलण्याची संधि येऊं द्यावयाची नाहीं, असा जणुं निश्चय झाला होता त्याच्या मनाचा.

बाहेर सतत येत असलेल्या पृच्छकांना कांहीं तरी सांगून वाटेला लावण्याच्या उद्योगांत उमाकांत गुंतला होता.

त्याच्यापेक्षांहि प्रियंवदेशीं बोलणें त्याला अधिक अवघड, अधिक नाज़ूक होतें.

आणि तो प्रसंग टळावा म्हणून त्यानें तातडीनें उत्तमरावांना फोन केला.

चहा तयार होऊन येण्याच्या पूर्वींच उत्तमराव आले; व प्रियंवदा आणि उमाकांत यांच्यासमक्ष त्यांनीं राजीनामा देण्याच्या बाबतींत घाई केल्याबद्दल प्रियदर्शनला दोष दिला. त्यानंतर त्यांचें जें संभाषण झालें, तें त्या दोघांनीं निमूटपणानें ऐकलें. पण, प्रियंवदा काय किंवा उमाकांत काय, स्वतः मात्र एक शब्दहि बोललीं नाहींत.

घरांत मृत्यु झाला असतां ज्या गंभीरपणानें आणि निःशब्दतेनें जाणतीं माणसें त्या प्रसंगाला तोंड देतात, तशा प्रकारचें वर्तन होतें त्यांचें तें.

त्यांची ती स्तब्धता आणि तें गांभीर्य! प्रियदर्शनला वाटलें, हीं दोघें जर एकदां पांच दहा मिनिटें मोकळ्या मनानें बोलतील, तर किती बरें होईल!

पण त्यांनीं एक अवाक्षरहि काढलें नाहीं आणि अखेर उत्तमरावांना त्यानें निरोप दिला.

ते गेल्याबरोबर तो बाहेर आला आणि कमानीखालीं उभ्या असलेल्या मोटारजवळ गेला--

त्याबरोबर उमाकांतानें त्याच्या खांद्यावर हात ठेवून विचारलें--

"कुठं निघालास तू प्रिया आतां --"

प्रियदर्शन कांहीं बोलला नाहीं.

मुकाट्यानें मोटारींत बसून त्यानें चाकावर हात ठेवला.

"प्रिया, मी येतों तुझ्याबरोबर---"

उमाकांतानें त्याच्या हातावर हात ठेवून म्हटलें.

"नको उमा! मी घरीं जातोंय. तासाच्या आंत परत येईन-"

त्यानें ते शब्द अशा रीतीनें उच्चारले कीं, उमाकांत मोटारीपासून ताबडतोब बाजूला झाला—

तोंच—

"ताता, ताता! कुठं चाललांत तुमी? मी येतों तुमच्याबलोबल-"

हे धांवत धांवत मोटारीजवळ आलेल्या अशोकानें उच्चारलेले शब्द प्रियदर्शनच्या कानांवर पडले.

"तुमच्या मोटालीचा आवाद झाल्याबलोबल मी ओळखलं तुमी आल्याचं! पण मा न् आत्या मला येऊंच देईनात इकले—"

त्यानें कपाळावरले केंस मागें सारीत गडबडीनें म्हटलें.

प्रियदर्शन ताबडतोब खालीं उतरला आणि अशोकला उचलून त्यानें जवळ घेतलें.

क्षणभरच, अगदीं क्षणभरच त्याला वाटलें कीं, अशोकला हृदयाशीं घट्ट धरून त्याच्या मस्तकावर मनसोक्त अश्रु गाळावेत.

पण तो हसला आणि अशोकला म्हणाला—

"मी कीं नाहीं कामाला जातोंय बाहेर—"

"फिलायला नाई दात?--"

"नाहीं--"

"मग पलत आल्यावर पत्ते खेलाल माझ्याशीं?--"

"हो, हो! आज भरपूर वेळ आहे खेळायला--"

त्यानें अशोकला खालीं ठेवून हंसत हंसत म्हटलें आणि लगेच मोटारींत बसून गाडी सुरू केली.

'सागर व्हिला'मध्यें रहावयाला आल्यापासून त्याचा असा नियम होता कीं, आठवड्यांतून एकदां कांताच्या मृत्यूच्या दिवशीं ठाकूरभवनांत येऊन तासभर आपल्या खोलींत किंवा अशोकाच्या झाडाखालीं येऊन बसावयाचें. आणि तेंहि अगदीं एकट्यानें.

पचमढीला किंवा अन्यत्र मुक्काम असतांना या नियमांत काय खंड पडला असेल, तेवढाच. एरवीं दर आठवड्याचें त्याचें हें एकांत-चिंतन कधीं चुकलें नाहीं.

तो मोटारींतून उतरला आणि तडक आपल्या खोलींत गेला.

त्या खोलींत त्याच्या लिहावयाच्या टेबलासमोर भिंतीवर सर महादेवांचें रंगचित्र लावलेलें होतें आणि टेबलावर कांतेचा बैठा फोटो ठेवलेला होता.

आपल्या आवडत्या खुर्चीवर अंग टाकून त्यानें त्या दोन्ही फोटोंकडे पाहिलें--

आणि इतका वेळ दाबून ठेवलेल्या त्याच्या हृदयांतील त्या मानहानीच्या दुःखाला आतां आसवांची वाचा फुटली.

त्याच्या मनाला जें विलक्षण दुःख आज झालें, तें अधिकाराचा त्याग करावयाला लागल्यामुळ नव्हे; तर प्रतारणेमुळें आणि मानहानीमुळें झालें. स्वतःच्या चारित्र्यावर भिस्त ठेवून गांधींवर जो विश्वास त्यानें टाकला, तो व्यर्थ ठरला; व अत्यंत अपमानास्पद परिस्थितींत त्याला अधिकारपद सोडावें लागलें. त्याच्या मानी मनाची होरपळ झाली, ती फक्त या दोन कारणांमुळें.

पण मानहानीच्या त्या दुःखाला एकांतांत वाचा फुटलेलीहि त्याला सहन झाली नाहीं.

आणि तो तिथून उठून बाहेर अशोकाच्या झाडाखालीं चौथऱ्यावर येऊन बसला.

याच चौथऱ्यावर सहा वर्षांपूर्वी याच दिवसांत कांता त्याला कायमची सोडून गेली होती.

अशोकाच्या पानांतून चांदण्याचे शुभ्र कवडसे त्या चौथऱ्यावर पडले होते.

जणूं कांहीं त्याला बसण्यासाठीं कृष्णाजिनच घातलें होतें त्या चौथऱ्यावर!

तो त्या चौथऱ्यावर बसला आणि त्याच्या मनांत आलें--

आज कांता असती, तर माईप्रमाणें तिच्याहि डोळयांत अश्रु आले असते का? कीं आपल्या आयुष्यांतील या विलक्षण आपत्तीच्या प्रसंगीं तिनें आपल्याला धीर दिला असता? माईंना सार्वजनिक जीवनाची गोडी असली, तरी ती संसाराचीच ती एक अधिक वभवशाली बाजू आहे या दृष्टीनें. सार्वजनिक जीवन म्हणजे त्यांच्या दृष्टीनें जास्त पैसा, जास्त अधिकार, जास्त मानसन्मान मिळविण्याचें साधन! प्रांताचें मुख्य प्रधानपद ठाकूर घराण्यांत रहावें, यापलिकडे त्यांना दृष्टि नाहीं, आकांक्षा नाहीं. उलट सार्वजनिक जीवनांतल्या धकाधकीचा आणि झटापटींचा जरी गंभीर प्रकृतीच्या कांताला कंटाळा होता, तरी जीविताला पूर्णता आणणारीं विशाल ध्येयें आणि त्यांच्या सिद्धतेसाठीं करावा लागणारा घोर आत्मयज्ञ यांचें सौंदर्य, यांची उदात्तता आकलन करण्याचें सामर्थ्य तिच्या प्रगल्भ बुद्धींत निस्संशय होतें.

आठ वर्षांपूर्वीचे सारे रोमांचकारी प्रसंग त्याच्या डोळ्यांपुढे उभे राहिले. कायदेभंगाच्या चळवळींत आपण भाग घेऊं नये म्हणून आपली मनधरणी करण री कांता आपल्या वतीनें दद्दांशीं युक्तिवाद करावयाला

कशी गेली, आपल्याला अटक झाल्यावर तिचें वर्तन किती बाणेदारपणाचें झालें आणि दद्दांच्या मृत्यूनंतर राधामोहनच्या दुष्टाव्याला तिनें कसा धैर्यानें शह दिला—ते सारे सारे प्रसंग त्याला एकामागून एक आठवले—

छे! कांता आज असती, तर तिच्या डोळ्यांत अश्रु दिसले नसते. मानहानीच्या दुःखानें पोळलेल्या आपल्या मनाला तिनें धीर दिला असता आणि दोन्ही हात आपल्या खांद्यांवर टेवून ती म्हणाली असती—

"प्रिया, तुम्हांला मुख्य प्रधानपद सोडावं लागलं, यांत तुमची मानहानि नाहीं. उलट गौरवच आहे. स्वतःच्या तत्त्वांसाठीं तुम्ही अधिकारपदावर लाथ मारलीत आणि भारताच्या आधुनिक इतिहासांतला जो सर्वांत भीषण लढा, या अहिंसेच्या युगाचा अस्त झाल्यानंतर, वडून येणार आहे, त्या लढ्याच्या अग्रगामी दलाचे सेनानी होण्याचा हक्क तुम्ही आपल्या लोकोत्तर तत्त्वनिष्ठेनं संपादन केलात!—"

या कल्पना त्याच्या मनांत आल्या आणि त्यानें आपलें मस्तक त्या चौथऱ्यावर टेंकलें.

आणि अत्यंत आर्त वाणीनें तो उद्गारला—

"कांता, कांता, तूं कुठं आहेस? हें एकाकी जीवन आज अगदीं असह्य झालं आहे मला!—"

प्रारंभ
१० फेब्रुवारी १९४०

समाप्ति
११ आक्टोबर १९४०

